# पुनर्मीलन

( स्वतंत्र सामाजिक कादंबरी )


लेखक

वि. श्री. जोशी बी. ए.

प्रस्तावनालेखक

ग. त्र्यं. माडखोलकर



डिसेंबर ]  मूल्य ४ रुपये  [ १९४९

# प्रस्तावना



श्री. वि. श्री. जोशी यांची ही कादंबरी मुख्यतः राजकीय असल्यामुळेंच तिला प्रस्तावना लिहिण्याची विनंति मला करण्यांत आली असावी असें वाटतें. श्री. जोशी यांची ही पहिलीच कादंबरी दिसते. व ही गोष्ट जर खरी असेल, तर तिच्या रचनेंत त्यांनी वाखाणण्यासारखें कौशल्य प्रकट केलें आहे यांत संशय नाहीं. त्यांची भाषा जोरकस, वर्णनें चारकाव्यानें केलेलीं आणि कथानक चटका लावणारें आहे.

मराठी कादंबऱ्यांच्या एकंदर पद्धतीप्रमाणे या कादंबरींतील नायक आणि नायिका हीं कॉलेजांतील विद्यार्थी असून, त्यांचें प्रणयमीलन हा कादंबरीचा प्रधान विषय आहे. राजकीय कादंबरींत रहस्यजन्य चमत्कृति उत्पन्न करावयास क्रांतिकारक चळवळ उपयोगी पडते. प्रस्तुत कादंबरींतही क्रांतिकारकांचा कट घातलेला असून, जुळया भावांतील रूपसादृश्याची मदत घेऊन त्या कटाचा शेवट सुखकर केला आहे. मला कथानकांतील ही घटना सर्वच दृष्टींनीं आक्षेपास्पद वाटली. ग्लीसन्‌सारख्या बड्या युरोपिअन अधिकाऱ्याचा खुनी खालच्या कोर्टांत मॅजिस्ट्रेटकडून दोषमुक्त ठरून सुटणें ही गोष्ट सर्वथैव अशक्य आहे. दुय्यम दर्जाच्या न्यायाधीशांवर नोकरशाहीचें वर्चस्व फार असतें; व त्यामुळें राजकीय स्वरूपाच्या खटल्यांत तो निःपक्षपातानें न्याय देऊं शकत नाहीं, हा नेहमींचा अनुभव आहे.

खुनी तरुण अजय याला सोडविण्यासाठीं त्याचा जुळा भाऊ विजय याच्या रूपसादृश्याचा जो उपयोग श्री. जोशी यांनीं केला आहे, तोही मला समर्पक वाटत नाहीं. त्यापेक्षां या जुळया भावांतील रूपसादृश्याचा उपयोग करून, अजय फरारी होतो आणि त्याच्याऐवजीं विजय पकडला जाऊन खटल्याचा गोंधळ उडतो व अशा रीतीनें अखेर पोलीस फजित पावून विजय सुटतो, अशी कांहीं कलाटणी जर श्री. जोशी यांनीं कथानकाला दिली

असती, तर मला वाटतें, रूपसादृश्याचा तो उपयोग अधिक मार्मिक आणि चमत्कृतिजन्य झाला असता; व गणूच्या साक्षीवर अत्याचारी अजय सुटल्याची असंभाव्य घटना घालण्याचा प्रसंग टळला असता.

श्री. जोशी यांची भाषा आणि वर्णनें हीं दोन्ही सामान्यतः चांगलीं आहेत. व 'स्वातंत्र्याची तळमळ व ओढ्याची खळखळ कधीं थांबली आहे कां ?' अशा प्रकारचें सुंदर सुभाषित किंवा नायिकेच्या हंसऱ्या मुखाला दिलेली 'जणूं कांहीं जास्वंदीच्या टवटवीत ताज्या फुलाच्या लाल पाकळ्याच विलग झाल्या नि त्यांतील शुभ्र दंवबिंदुच चमकले ओळीनें !' अशा प्रकारची मोहक उपमा मनाला आल्हाद देते. त्याबरोबरच 'सुवासिक व प्रलोभनीय पुष्पसमूहाच्या बाजूला हारित पर्णसमुच्चय फक्कत असावा, त्याप्रमाणेंच शोभनेच्या मुखमंडळाच्या समतात् वाऱ्याच्या झोतांत तरंगणाऱ्या तिच्या पातळाच्या पदराचा परिवार होता' असलीं क्वचित् आढळणारीं वाक्यें बोजड वाटतात.

तथापि कादंबरीचें कथानक चित्तवेधक आणि भाषा जोरकस असल्यामुळें तिचें वाचन मनाला ओढ लावतें; व श्री. जोशी यांची ही पहिली कृति त्यांच्या भावी कृतींविषयीं वाचकाच्या मनांत निःसंशय मोठ्या आशा उत्पन्न करील.

शांतानिवास, नागपूर
१।९।३९

ग. त्र्यं. माडखोलकर

ज्यांच्या लेखनांतील राजकीय स्वातंत्र्यलालसेचे पडसाद मला विशेष मोहवितात त्यांनीं—सुविख्यात कादंबरीकार श्री. माडखोलकर यांनीं—कादंबरीला प्रस्तावना देऊन मला कायमचें उपकृत केलें आहे.

माझे अत्यंत निकटवर्ती स्नेही श्री. आत्माराम जोशी यानीं प्रारंभापासून आतापर्यंत हार्दिक मित्रभावाने जे बहुमोल कष्ट घेतले त्याविषयींची मला पूर्ण जाणीव आहे. परन्तु, त्यांचे येथें औपचारिक आभार मानून मी त्यांच्यात परस्थपणा आणू इच्छित नाहीं. ”

या कादंबरीचें स्वागत त्यानतर चांगलें झालें. पण पुढे सहा सात महिन्यांतच त्या वेळच्या परकीय सरकारनें ती जप्त केली ! यानंतर भारत स्वतंत्र होऊन तिची दुसरी आवृत्ति निघण्यास अपेक्षेप्रमाणें बरीच वर्षे लागली. आणि १९४६ मध्यें ती जेव्हां सध्यांच्या मुंबई सरकारनें स्वतंत्र भारतांत बंधमुक्त केली, तेव्हा तिची दुसरी आवृत्ति काढण्याची व्यवस्था करावी कीं नाहीं हा एक प्रश्नच माझ्यापुढे होता. परंतु मित्रांच्या उत्तेजनामुळें ती पुन्हा प्रसिद्ध होण्यास प्रत्यवाय नाहीं असा शेवटीं मी निर्णय घेतला. कारण, एक तर ती माझी पहिली कृति म्हणून मला तिचेविषयीं एक विशेष जिव्हाळा आहे नि दुसरें म्हणजे पारतंत्र्यात जप्त झालेलें वाङ्मय स्वतंत्र भारतांत पुन्हा प्रसिद्ध होण्यात एक विशेष औचित्यहि आहे.

या कादंबरीचें वाङ्मयीन मूल्य टीकाकार ठरवतीलच. पण त्यासाठीं मी तिच्या पहिल्या स्वरूपात नांवावाचून कोणताहि फरक मात्र हेतुतःच केलेला नाहीं. कारण अगदीं पहिली कलाकृती जी दहा वर्षांपूर्वी आपण कॉलेजांत असतानाच लिहिली तिचें अस्सल स्वरूप कसें कां असेना, तें त्या स्थितींत पाहाणें यांतही मोठाच आनंद नाहीं काय ?

या कादंबरीची दुसरी आवृत्ति श्री. समर्थ बुक डेपोचे उत्साही धनि श्री. रामभाऊ देशपांडे यांच्या परिश्रमानेंच प्रसिद्ध होत असल्यामुळें त्यांचा मी मनापासून आभारी आहे. इतकेंच सांगून ‘ पूनर्मीलन ’ पाहाण्यापूर्वी वाचकांना थांबवून धरणारा हा अल्पसा प्रस्ताव पुरा करतों.

‘ सुकृत ’ मुंबई २८<br>दि. डिसेंबर १९४९

वि. श्री. जोशी

ज्यांच्या लेखनांतील राजकीय स्वातंत्र्यलालसेचे पडसाद मला विशेष मोहवितात त्यांनीं—सुविख्यात कादंबरीकार श्री. माडखोलकर यांनीं—कादंबरीला प्रस्तावना देऊन मला कायमचें उपकृत केलें आहे.

माझे अत्यंत निकटवर्ती स्नेही श्री. आत्माराम जोशी यानीं प्रारंभापासून आतापर्यंत हार्दिक मित्रभावाने जे बहुमोल कष्ट घेतले त्याविषयींची मला पूर्ण जाणीव आहे. परन्तु, त्यांचे येथें औपचारिक आभार मानून मी त्यांच्यांत परस्थपणा आणू इच्छित नाहीं. "

या कादंबरीचें स्वागत त्यानंतर चांगलें झालें. पण पुढें सहा सात महिन्यांतच त्या वेळच्या परकीय सरकारनें ती जप्त केली ! यानंतर भारत स्वतंत्र होऊन तिची दुसरी आवृत्ति निघण्यास अपेक्षेप्रमाणें बरीच वर्षे लागली. आणि १९४६ मध्यें ती जेव्हां सध्यांच्या मुंबई सरकारनें स्वतंत्र भारतांत बंधमुक्त केली, तेव्हा तिची दुसरी आवृत्ति काढण्याची व्यवस्था करावी कीं नाहीं हा एक प्रश्नच माझ्यापुढें होता. परंतु मित्रांच्या उत्तेजनामुळें ती पुन्हा प्रसिद्ध होण्यास प्रत्यवाय नाहीं असा शेवटीं मी निर्णय घेतला. कारण, एक तर ती माझी पहिली कृति म्हणून मला तिचेविषयीं एक विशेष जिव्हाळा आहे नि दुसरें म्हणजे पारतंत्र्यात जप्त झालेलें वाङ्मय स्वतंत्र भारतांत पुन्हा प्रसिद्ध होण्यात एक विशेष औचित्यहि आहे.

या कादंबरीचें वाङ्मयीन मूल्य टीकाकार ठरवतीलच. पण त्यासाठीं मी तिच्या पहिल्या स्वरूपात नावावाचून कोणताहि फरक मात्र हेतुतःच केलेला नाहीं. कारण अगदीं पहिली कलाकृती जी दहा वर्षांपूर्वी आपण कॉलेजांत असतानाच लिहिली तिचें अस्सल स्वरूप कसें का असेना, तें त्या स्थितींत पाहाणें यांतही मोठाच आनंद नाहीं काय ?

या कादंबरीची दुसरी आवृत्ति श्री. समर्थ बुक डेपोचे उत्साही धनि श्री. रामभाऊ देशपांडे यांच्या परिश्रमानेंच प्रसिद्ध होत असल्यामुळें त्यांचा मी मनापासून आभारी आहे. इतकेंच सांगून 'पूनर्मीलन' पाहाण्यापूर्वी वाचकांना थांबवून धरणारा हा अल्पसा प्रस्ताव पुरा करतों.

'सुकृत' मुंबई २८<br>
दि. डिसेंबर १९४९

वि. श्री. जोशी

आपल्या वात्सल्यपूर्ण आशीर्वादाच्या कृपाछत्राखालीं
‘ पुनर्मीलन ’ लिहिण्यास आवश्यक असें स्वास्थ्य अन्
उत्तेजन देणाऱ्या वंदनीय पितृचरणीं

**सादर समर्पण—**

# अनुक्रमणिका

# पुनर्मीलन

## प्रकरण १ लें

## खडकीचा दैवयोग

मार्च महिन्याचे शेवटचे दिवस म्हणजे विद्यार्थ्यांना अभ्यासू वृत्तीची परिसीमा गांठण्याचा अचुक काळ होय! त्यांतून पुण्यासारख्या शिक्षणक्षेत्रांतील प्रमुख ठिकाणीं तो तसा नसेल तरच नवल! इतर वादग्रस्त प्रश्नांचे बाबतींत कांहीं का मत असेना परन्तु या एका बाबतींत तरी पुण्याचें महत्त्व वेररकरही मान्य करतील! त्यामुळें अलिकडे रस्त्यांतून हिंडतांना नि इतर ठिकाणीं जेव्हां विद्यार्थ्यांचे घोळके परिक्षेतील संभाव्य प्रश्नांची चर्चा करतांना दिसत तेव्हां विजयास वाटे "काय मजेत आहों आपण! निदान या वर्षी तरी ही ब्याद नाहीं आपल्या पाठीमागे!" कारण एम्. ए. च्या शेवटच्या परीक्षेला तोंड देण्याचा विचार, कार्यव्यापामुळें त्यानें सध्यां लांबणीवर टाकला होता.

अशा वेळीं सकाळसायंकाळ परीक्षा नसलेले त्याच्यासारखे विद्यार्थी बरेंच लांबवर फिरण्याचीच मौज लुटीत असत. परन्तु विजयाला मात्र कांहीं वेळां सभांना जायचें असल्यामुळें नि कांहीं वेळां त्याच्या ग्रामोद्धाराविषयींच्या कार्यमग्नतेमुळें वरील सौख्यास आंचवावें लागे; मात्र आज बरेच दिवस आग्रहाचें बोलावणे चालू असल्यामुळें नि आपल्या एका सहृदय मित्राच्या मित्रत्वाचा लाभ बऱ्याच वेळा अनुभवूनही तृप्ति न झाल्यामुळें खडकीला कसेंही करून सायंकाळीं जाण्याचें विजयानें ठरविलें होतें.

साबणाची पेटी हातांत घेऊन तोंड धुण्याकरितां विजय आतां सायंकाळीं स्नानगृहांत गेला तो दिवसभर सूर्यराजानीं टाकलेल्या प्रतापी तेजानें तळप-

णाऱ्या वायुमानाच्या उष्णतेनें कंटाळलेला असाच! मात्र तो सर्व कंटाळा जाऊन त्याच्या दुप्पट उत्साहाचा वेळ आपल्याला लाभणार म्हणूनच कीं काय स्नानगृहांत पाऊल टाकतांच त्यानें कोणत्या तरी एका गाण्याची लकेर मारली अन् पायांतील खडावांचा खाड् खाड् आवाज करीत तो स्नानगृहांतील आरशाजवळ थबकला. खांद्यावरील सरकलेला टॉवेल डाव्या हाताने परत सारखा करून स्वतःच्याच प्रतिबिंबाकडे पाहून तो मोठ्यादा हंसला.

मनुष्य संगतीचा भोक्ता तर खराच, परन्तु एकान्तांतही कांहीं प्रसंगीं विशेषच सुख वाटत असतें त्याला! अशा प्रकारच्या आनंदांतच पाण्याची एक ओंजळ भरून घेऊन त्याचा थंड फवारा आपल्या तोंडावर मारला विजयाने; जवळच्याच खिडकींतून येणाऱ्या सायंकाळच्या सुखकर वाऱ्याच्या झोतानें त्या त्याच्या शीतलतेला दुजोरा दिला. जेव्हां वाऱ्याचा जोर जास्त झाला तेव्हां "का रे, बाबा! आज इतक्या जोरांत आहेस?" असें म्हणत त्यानें खिडकी अर्धवट बंद केली.

तोंड धुतल्यावर आपल्या मुद्रेवरील प्रसन्नतेचें परत एकदां अवलोकन करीत, तोंडावरून टॉवेल फिरवून तो छातीशीं दोन्ही हातांनीं थबकून धरीत, त्यानें थोडा वेळ घालविला नि तोंड कोरडें झाल्याची ग्वाही, त्याच्या त्या नादिष्टपणांतही खऱ्या मनानें देतांच त्याने स्नानगृह सोडलें. खोलींत आल्यावर साबणाची पेटी उजव्या हातानें जागेवर ठेवून डाव्या हातानें दार लोटून टेबलापुढेंच केस वळविण्यासाठीं त्यानें कंगवा उचलला.

थंड वायुलहरी अनिर्बंधपणें भरकटत होत्या. भिंतीवरील दिनदर्शक त्यामुळें फडफडत होते. विजयाच्या केसांचीं स्वैर झुलपें हालत होतीं. तशांतच भिंतीवरील फळीला लावलेले भरेचसे कागद निखळून खालीं पडले. विचलित केस हातानें मागें धरीतच त्यानें ते सर्व कागद पटापट नीट जुळवून ठेवले न् केस वळवून कोट चढविण्यास सुरवात केली.

पुष्कळ वेळां याच वेळेला कॉलेजच्या आखाड्यात इतर कार्यक्रम नसल्यास व्यायामांत विजय दंग असे; त्यामुळें आजचा हा बदलत

कार्यक्रम त्याला मजेचा वाटला. फिरायला कधीं कधीं तो जाई तोही खडकीच्या बाजूला नव्हे. त्यामुळें कॉलेजवरून पुढें गेल्यावर दिसणारीं ठराविक दृश्येंच त्याच्या दृष्टीपथांत येत; रस्त्यावरून दुचाक्या पटापट धांवत असतांना त्याला दिसत; जरा पुढें गेल्यावर उजवे बाजूस चाललेली स्वयंसेवकांची कवायत, डावे बाजूस पत्र्याच्या तुकड्यांतुकड्यांची गरीब पण चैतन्ययुक्त घरें, त्याचेच जरा पुढें काठ्यांचे घोडे करून धुरळा उडवीत धांवणारीं लहान खेळकर मुलें, नि वडाच्या उंचच उंच पारंब्याप्रमाणें झाडाला बांधलेल्या दोरखंडाच्या झोळींत झोके घेणारीं त्यांच्यापैकीं कांहीं प्रौढ मुलें, हीं सर्व दृश्यें तो नेहमीं पाहात असे; इतकेंच काय तो जावयाच्या वेळेला, बहुधा न चुकता, आपलीं म्हसरें घेऊन जाणारा एक गुराख्याचा मुलगाही नियमानें त्याला भेटे. वरील सर्व दृश्यें त्याच्या नित्य परिचयाचीं, नि म्हणूनच आज कंटाळवाणीं झालीं होतीं त्याला! कारण विविधता आयुष्याचा उत्तेजक आत्मा आहे असें कोणीसें म्हटलें आहे ना!

खडकीला रमाकांताच्या घरीं तो पोहोंचला त्या वेळेस रमाकांताची (विजयाच्या मित्राची) खोली बंद होती; मात्र दाराला कुलुप नव्हतें. खोलीजवळ जाताच विजयानें केलेली दारावरील टक्टक् आंत असणाऱ्या रमाकांताला ऐकू जातांच त्यानें हातांतील पुस्तक मिटलें नि जवळच्याच लहान टेबलावर तें ठेवीत त्यानें विचारलें,

“कोण आहे? या, आंत या! Come in.” आणि त्याच्या या उद्गारांवर दार उघडलें गेलें.

दारांत विजयाला पाहातांच रमाकांताला आश्चर्यमिश्रित आनंद झाल्याचें दिसत होतें. “ओ हो हो ऽ ऽ! वा!” आंत येत असलेल्या विजयाचा हात दाबीत तो उद्गारला “Have that chair!” आणि असें म्हणून विजयापुढें एक खुर्ची सरकाविली रमाकांतनें.

“काय महाराज! बरीच लहर लागली म्हणायची! आतां मला हें नीट लक्षांत ठेवलं पाहिजे हं!”

"तें काय?" खुर्चीवर बसतांबसतांच विजयानें उभ्या असलेल्या रमाकांताकडे पाहिलें.

"कीं, तुमच्यासारख्या मोठ्या माणसांचे कार्यक्रम एक वर्ष आधीं ठरत असतात. कारण, गेल्या वर्षीं तुला बोलावलं तेव्हां आतां तुम्ही मिळूं शकलांत! बरं तें जाऊं द्या! काय म्हणते आहे परीक्षा आपली?"

"परीक्षा? परीक्षा काय म्हणणार? मीच म्हणणार काय तें! यंदा बसलोंच नाहीं परीक्षेला मी!" खुर्चीच्या हातावर उजवा हात आपटीत विजय हंसला.

"किती दिवसांनीं भेटतों आहों, असं वाटतं आहे मला!"

"हो! गेल्या वर्षींच शेवटचे भेटलों होतों नाहीं? तू परीक्षेत यशस्वी झालास अन् लागलीच हॉस्पिटलमध्यें टेंपररी फिजिशिअन्शिप्चा चान्स मिळाला तुला, त्या वेळेस; त्या दिवसाची सायकाळ आठवते ना मुंबई-तील? फिरलों काय, मोटारींतून यथेच्छ भटकलो काय, समुद्रकिनाऱ्यावर किती गप्पा मारल्या होत्या आपण, अन् घरीं किती उशीरा परतलों होतों आपण त्या सायंकाळीं! बरं मुंबईला परत कधीं जाणार तू?"

"आहे अजून एक दोन दिवस रजा शिल्लक; अन् तूं पण आहेसच इथें; तेव्हां म्हटलं—"

"कोण मी? छे रे, बाबा! उद्या संध्याकाळच्या गाडीनें प्रयाण करणार आहे मी; म्हणूनच आज इथे आलों आहें; कालच पत्र मिळाल आहे मला!"

"कुणाचें? तुझ्या त्या खेडवळ चळवळयांचं असेल नाहीं का? कसला ग्रामोद्धार करतो आहेस विजय? या अडाणी लोकांच्या नादीं लागून एम्. ए. ची परीक्षा हुकवलीस यंदा! वेड आहे झाल हें एक—"

"वेड? खरच आहे तुझ म्हणण! परंतु या वेडानच भुकेकंगाल लोकांच्या फ्रान्समध्यें क्रांति घडली, याच वेडानं रशियांत पुष्कळ सौख्य नांदूं लागल, अन् आज ना उद्या हिंदुस्थानांतही ही जी दारिद्र्याची परमावधि होत आहे, त्याची परिणति याच दिशेनें होणार! अन् आतां

परिक्षेविषयीं म्हणशील तर इल्लींच्या कॉलेजच्या नि युनिव्हर्सिटीच्या परीक्षा नुसत्या पुस्तकी ज्ञानाची विडंबनात्मक चांचणी आहे! प्राध्यापकांच्या हाताखालीं आपण शिकतों पण त्यांची मजल वर्गाबाहेर शिकवितांना पहातील तेवढ्यापुरतीच बाहेरच्या जगांत पोचूं शकते. परवां एक आमचा मित्र एका प्रोफेसरमहाशयांकडे गेला. त्याला त्यांनीं इंग्लंडला जायचा उपदेश केला; 'सिव्हिल सर्व्हिसमध्यें शिरा, पैसा कसा मिळेल हें ध्येय असूं द्या' असा त्यांच्या बोलण्याचा निष्कर्ष होता. मला त्या मित्रानें विचारलं असतं तर सांगितलं असतं त्याला, कीं पैसा हेंच कांहीं जीवनसर्वस्व होऊं शकत नाहीं. विशेषतः परतंत्रतेंतील हिंदुस्थानच्या तरुणांचं तर नाहींच नाहीं!"

"आणि हो!" खोलींतच येरझारा घालीत रमाकांतानें सुरुवात केली, "तुझा तो फ्रेड! परवां भेटला होता. आपले फुगीर गाल व उंच मान झुकवीत म्हणाला—"Wish to meet Vijay!" असें म्हणून फ्रेडची इतकी हुबेहुब नक्कल केली रमानें कीं विजयाची हंसता हंसता पुरेवाट झाली.

"कुठं भेटला? परेडला गेला होतास की काय? बाकी कांहीं म्हण, एखाद् वेळेस असलीं लष्करी दृश्यं पाहिलीं कीं वाटतं, असेच देखावे सर्वत्र आपल्या देशांत दिसूं लागतील तो दिवस किती भाग्याचा!"

"सैन्यातील सुख फ्रेडलाच विचार तुझ्या. फारच लाघवी दिसतो तो, नाहीं? त्या दिवशीं पोहण्याच्या चढाओढींत आपल्या कौशल्यावर खूष झाली स्वारी. अन् तेव्हापासून वेळोवेळीं तो किती जिव्हाळ्यानं वागतो आहे! इंग्लिशमन् असूनहि तुझ्यासारख्या देशभक्ताशीं मैत्री जमली त्याची यांतच त्याच्या स्वभावाचं वैशिष्ट्य आहे."

यानंतर बऱ्याच गप्पा मारून जाण्याच्या तयारीनें विजय म्हणाला,

"मला गेलंच पाहिजे रमा आता! सव्वासात झाले पहा! एका ठिकाणीं जायचं आहे अजून इथून गेल्यावर!"

"बैस रे!" त्याला खुर्चीत बसवीत रमाकांतनें म्हटलें, "कधीं काळीं येतो आहेस अन् तोही जणूं कांहीं घोड्यावर!"

" हल्लींच्या काळांत सायकलीचा घोड्यासारखाच उपयोग आहे नाहीं तरी–" या त्याच्या वाक्यावर, दाराबाहेर आचाऱ्याला कांहीं फराळाचें आणण्याकरितां सांगण्यासाठीं गेलेला रमाकांत हंसला अन् विजयानेंही खोलींत त्याचाच प्रतिध्वनि काढला. आचाऱ्याला निरोप सांगून खोलींत परत आल्यावर विजयाचा खांदा दोन्ही हातांनीं हलवून रमाकांतनें विचारलें,

" दोन दिवस थांबलास तर चालणार नाहीं का ?"

" चालायचं म्हणजे काय रमा ? वास्तविक यदा आठ एक दिवस उशीरच झाला आहे ! रात्रीचा वर्ग घेतों मी इनामगांवच्या शेतकऱ्यांचा, माहीत आहे ना ? खेडेगावांतील अज्ञ जनतेला साक्षर करण्याचं कार्य जरी माझ्या हातून झालं तरी पुष्कळ ! आणि माझ्याच गांवाविषयीं म्हणशील तर तिथें आता अशिक्षित समाजांतील प्रत्येक घरात एक तरी मनुष्य चांगला लिहावाचायला लागला आहे."

" Is it ? A good achievement ! हें बरोबर. असं कांहीं तरी व्हायला पाहिजे. नाहींतर नुसते डबे वाजवून नि झेंडे नाचवून स्वराज्य निदान येत्या शंभर वर्षांच्या आत तरी मिळणार नाहीं आपल्याला."

आचाऱ्यानें आणलेल्या खाद्यपदार्थांचें ताट एक स्टूल ओढून त्यावर तें विजयापुढें ठेविलें रमाकांतनें आणि म्हटलें,

" विजा, एक दोन आठवडे मुंबईला ये ना रे ! माझी नोकरीही सहा सात महिनेच उरली आहे; तेवढ्या अवधींत—"

" एक दोनच काय, चांगले दोन महिने येईन वेळ आली तर !" तांब्यांतून भांड्यांत पाणी ओतीत विजय उद्गारला. थोड्याच वेळांत फराळ संपल्यावर विजयानें जेव्हा रमाकांताचा निरोप घेतला त्या वेळेस पूर्ण अंधार पडला होता.

पश्चिम दिशेला दिव्य म्लानता चढलेली होती. सूर्याच्या सहवासांत पश्चिम दिशेवर चढलेली आरक्त छटाच होती ती; क्वचित् एखादुसरा ढग चकचकीत कडांसह आकाशाच्या विस्तीर्ण साम्राज्यांत प्रतापी स्वाराप्रमाणें पटापट धांवत होता. मंद मंद वारा वाहात होता. त्याच्या जोरानें उडणारे

केस विजयाच्या विशाल कपाळावर जणूं कांहीं आनंदानें झोके घेत होते. दुचाकीच्या द्रुततर गतीमुळें वाहणाऱ्या वाऱ्यानें उडणारा विजयाच्या गळ्याभोंवतालचा गरम पट्टा एकसारखा अधांतरी हेलकावे खात होता नि तो वेळोवेळीं लपटून घेण्यांत विजयाच्या हाताचीहि हालचाल होई.

समोर लांबच लांब रस्ता पसरलेला होता. एखादी मोटार भर्रकन् निघून जाई नि ती जरा लांब जाताच डांबरी रस्त्यावर तिच्या चाकांची चट्चट् ऐकूं येई. त्याच वेळेला रस्त्याच्या कडेचा धुरळा उडून वातावरण अंधुक होई नि थोडा वेळ जाताच तें पुन्हां निवळून जाई. त्या नादांत व दुचाकीच्या साखळीच्या सळसळ आवाजांत विजय एखादा मैल गेला असेल! ज्या ठिकाणीं नदीला आडवे दोनतीन पूल घातले आहेत त्याच्या पलीकडे जी गर्द झाडी आहे तीहि त्याला दिसूं लागली. मुंबईहून पुण्याला जाणाऱ्या गाडीला जरा उशीर झाल्यामुळें सिग्नल बॉक्सचा दिवाही अजून तांबडाच होता.

नदीवरील पुलाचें प्रतिबिंब उथळ परंतु संथ जलविस्तारांत पडलें होतें. पलीकडील कांठावर असलेल्या गर्द झाडीची पडछाया किंचित् काळसर दिसत होती. बवळच असलेली गुराख्याची झोंपडी, पाण्याच्या तुटवड्यामुळें उघडे पडलेले कांठाजवळचे खडक अन् कांठाकांठानें असेलळीं हिरवीं झुडपेंही उठून दिसत होतीं. इतक्यांत विजय झाडींत शिरला. मार्गावरील दुबाजूंच्या झाडीमुळे अंधार गुडुप झाला. झाडांझाडांतून निःपर्णराजीच्या मोकळ्या जागेतून चंद्रप्रकाशाचे शीतल किरण हळूच डोकावून पहात होते, तेवढाच काय तो प्रकाशमान भाग होता.

विजयाला चंद्रप्रकाश क्षणभर मिळे न् लागलीच अंधाराचे ठिपके त्याचे अंगावर उमटत. आयुष्यांतही अशीच सुखदुःखांची सरमिसळ असते. छायाप्रकाशानें चित्र, तसे अपघात नि आनंद यांनीं जीवन रंगविलें जातें. याच वेळेस समोर रस्त्यावर कोणीं दोघेंजण बोलत असल्याचा भास झाला विजयाला नि कांहीं वेळानें तो त्या ठिकाणापासून वीस हातांवर पोंचला तेव्हां तो भास खरा ठरला.

मुसलमानी गोंड्याची टोपी त्या दोघांपैकीं एकानें घातली होती. त्याचे कपडे तर कांहीं विचारायलाच नकोत. बरेच दिवसांत पाण्याशीं गांठ न पडल्यामुळें बिचारे लाजेनें काळे पडले होते नि ती लाज अनावर झाल्या-मुळेंच कीं काय, जागजागीं त्यांच्या अंगाच्या चिंधड्या झाल्या होत्या. वरील कपडा प्रथम पांढरा होता हें सांगण्यास एखाद्या इतिहाससंशोधकाचें डोकेंही अपुरें पडलें असतें.

हा प्रकार कांहींतरी निराळाच आहे असें विजयाला वाटूं लागलें. कारण त्यापैकीं दुसरी व्यक्ति स्त्री होती, अन् तिच्या वेषभूषेवरून ती चांगल्या उच्च कुळांतील होती असेंच वाटलें विजयाला! त्यानें डोळे विस्फारिले आणि सायकलचा वेग त्यानें बराच कमी केला तोंच त्याला पुढील संवाद ऐकूं आला.

"वा रे मेरी चिडियॉं!" असें हिंदुस्थानींत म्हणत तो मळक्या कप-ड्याचा गृहस्थ (!) त्या स्त्रीजवळ सरकला. तिनें त्याला झिडकारिलें नि ती त्वेषानें ओरडली,

"हं! दूर हो! हा रस्ता म्हणजे एकादा मुसलमानी मोहला वाटला तुला?"

"मोहला वाटला असता तर एवढी वाट पाहिली नसती!"

"वाटच लागेल चांगली तेव्हां कळेल! थोबाड फोडून हातावर देईन!"

"अरे, एकदां तुमारी मूँह मेरे हातमें आ जाय् तो मेरा मूँहभी तुमारेही—" असें म्हणून त्यानें तिचा हात ओढला. तिच्या हातांतील लेडी फॅशन् सायकलच्या रस्त्याचे बाजूलाच धाडकन् आवाज झाला. "धावा, कोणीतरी सोडवा होऽऽ अग आई गऽऽ" असा घाबरट नि अस्पष्ट आवाज एकूं आला. विजयानें दोन पावलें चटकन् उचललीं. ती स्त्री आपला हात सोडवून घेण्याची पराकाष्ठा करीत होती. तें पाहून विजयाला राहावेना! त्यानें सायकल बाजूला टाकली, पटापट चार पांच लांब टांगा टाकल्या नि प्रथम त्या मवाल्याच्या कंबरेजवळचा सदऱ्याचा भाग खसकन् ओढला.

आपल्याला ऐनवेळीं अडथळा करणारा हा कोण असें मनांत म्हणत तो मवाली आपलें तोंड फिरवीत विजयाला हिसका देऊं लागला. "इसीका मूँह

तुमकू चाहिये ना ! ले ऽ !" असे म्हणत विजयानें त्याच्या फाडकन् एक तोंडांत चढविली. त्या धक्क्यानें त्याचें तोंड एका बाजूला, मान वांकविल्या-प्रमाणें वळलें; तों दुसऱ्या श्रीमुखांत तसलाच आवाज वाजविला विजयानें. अन् मग एखाद्या अगदींच कमजोर प्रतिस्पर्ध्यास थापटावें त्याप्रमाणें चांगल्या अर्धाडझन् चपराकांपर्यंत आपले हात विजयानें शिणविले. सर्व रस्ताभर, कां कुणास ठाऊक, एक चिटपांखरूही नव्हतें. शुकशुकाट होता आजूबाजूला ! त्याच्या प्रहारांची सरबत्ती चालू असतांच "पुरे ! पुरे बरं आतां !" असे उद्गार निघाले त्या तरुणीचे तोंडांतून. हळव्या हृदयाचा याहून दुसरा नमुना सांपडूं शकेल का ?

बाजूच्याच त्या तरुणीकडे पाहात अर्धवट शुद्धींतील त्या गुंडाला तेवढ्यां-तच विजयानें वर उचललें न् "काय करतां हो हें ऽऽ?" असे, कानावर हात ठेवून कातर उद्गार ती तरुणी काढते तोंच त्याला रस्त्याच्या कडेला मातींत बदकन् आपटलें विजयानें ! जणूं कांहीं आपल्या पराक्रमावर कळस चढवीत होता तो त्या कृतीनें.

त्या मवाल्याची चांगलीच दामटी वळली होती आतां ! तरीही सावध-गिरी म्हणून त्याच्याच मळक्या गळपट्ट्यानें, त्याचे हात विजयानें बांधले. 'न जाणो, कदाचित् लांब राहून दगडांचा वर्षाव करण्याची हौस भागवून घ्यायचा तो !' असा विचार केला त्यानें; कारण समोरासमोर टक्कर देणें अशक्य झालें तर लपून आडूनच आपला पराक्रम करण्याची प्रवृत्तीच असते मनुष्यांत !

त्या तरुणीबरोबर विजय चालूं लागला खरा आपली सायकल घेऊन, परंतु झाडी संपेपर्यंत त्या तरुणीची आकृति विजयाला विशेष स्पष्टपणें दिसली नाहीं. तिच्या चालण्याची आकर्षक ढब तिच्या नि कर्णमधुर वाणीचा अनुभव एवढेंच काय तें अनुभवूं शकला तो त्या वेळेपर्यंत. सडपातळ न् साधारण उंचच अशी तिची आकृति होती. तिच्या उजव्या बाजूला अस-लेल्या सायकलीवर तिचे दोन्ही गोरेपान हात विराजले होते. तिच्या त्या गौरवर्ण करकमलांचें तशाच तेजस्वी वस्तूंशीं साहचर्य मोठें गोड वाटलें

विजयाला. निळसर पातळाचा घोळ तिच्या शुभ्र पावलांवर रुळला होता नि पोटरीखालीं—बहुधा क्लिपूनेंच असावें—किंचित् आवळलेल्या पातळामुळें सुटसुटीतपणें ती चालत होती. झाडी संपतांच चंद्रप्रकाशांत तिच्या अप्रतिम मुखसौन्दर्याचें अवलोकन करीत असतां आल्हाददायक मनोहारित्वाची रम्य मूर्तिच वाटली ती त्याला! विपुल केशभाराचा तिने बांधलेला अंबाडा व त्यावरील पुष्पमाला यांचे जोडीलाच तिच्या डोळयांतील तेजस्विताही उपेक्षणीय नव्हती. पापण्यांच्या हालचालीमुळें तिची दृष्टि जरा वेळापूर्वीच्या भीतीचा अवशेष अजूनही तिच्यांत शिल्लक राहिला होता असेच दाखवीत होती. भुवयाशीं थोडी अरुंद असलेली तिची नासिका जिव्हणीपाशीं थोडी पसरट झाली होती. तिची किंचित् रुंदशीच जिव्हणी तिच्या त्या अल्पनत नासिकेला साजेशीच होती. या तिच्या अतुलनीय सौंदर्याला शशाङ्क आपल्या धवल किरणांनीं एक प्रकारची झूक देत होता. तिची मान बोलताना वेळोवेळीं विलोभनीय रीतीनें हालत होती आणि विजयाच्या एका कोटीवर ती हंसली त्या वेळेस तिच्या गालावर पडलेल्या खळया विजय विसरणें अशक्यच होतें.

"बरे बाई तुम्ही इथें आलांत!" अंबाड्यावरील फुलें चांचपीत न् दृष्टि कृतज्ञतापूर्वक वर फेंकीत ती म्हणाली. विजय हंसला आणि म्हणाला,

"पण तुम्ही इथें कशा आलांत तें मला काहींच कळलं नाहीं!"

"इश्श! कशी कसलें?" महाराष्ट्रीय महिलांच्या हुकाच्या उद्गारवाचक शब्दानें त्या तरुणीनें सुरुवात केली, "खडकीला गेलों होतों सगळयाजणी; ते स्टेशनमास्तर आहेत ना? त्यांच्याकडे ओळख आहे आमच्या आळींतील मुलींची."

"सगळयाजणी? आणि मग बाकीच्या लपल्या आहेत कीं काय त्याला घाबरून?"

"लपायला काय झालंय? त्या मागाहून येणार आहेत मोटारींतून. सायकल होती माझी; म्हटलं जावं आपण पुढें!"

"हो! अन् आयतं हातांत सांपडावं तसल्या लोकांच्या!"

"विजयाच्या या मनमोकळ्या भाषणानें तिच्या मनाला बरें वाटलें असावें. कारण मग तीही मनमोकळेपणानें म्हणाली,

"पुढें काय होईल तें मला असं आधीं कळलंच होतं! वास्तविक मी एव्हांना घरींच पोंचलें असतें. पण हें चाक पंक्चर् झालं अन् इथेंच गाडी अडली आमची!"

विजयानें खडखडणाऱ्या चाकाकडे पाहिलं. फुरंगटून बसल्याप्रमाणें तें तोच तोच आवाज पुन्हां पुन्हां करीत होतें.

थोडा वेळ तसाच गेला विरळ विरळ ढग स्वच्छंदपणें अल्पगतीनें आकाशांत सरकत होते. आकाशांतील असंख्य तारका निळसर पातळावरील जरीच्या पुंजक्याप्रमाणें चमकत होत्या. चंद्रप्रकाश अमृताच्या तुषारांशीं साम्य दाखवीत होता. ढगांच्या गतीमुळें चंद्रच उलट दिशेला पळत आहे कीं काय अशी लहानपणची कल्पनाही पुन्हां एकदां विजयाच्या मनांत येऊन गेली तेवढ्या वेळांत!

"तुमची मोटार आली तर जा तुम्ही! अं?"

"आणि मग माझी सायकल्?"

"कॅरिअरवर बांधूं ना? हो, माझ्याजवळ नको उगीच!" हातानें आविर्भाव करीत विजय म्हणाला.

"तें कां?"

"नाहीं, मी तुमची सायकल पोंचवायला म्हणून तुमच्या घरीं यायचा आणि तुमच्या हरवलेल्या सायकलचा चोर म्हणून पकडला जायचा!" आपल्या विनोदावर तो हंसणार तोंच "वा! म्हणून कांहीं बाहेरच्या बाहेर पसार होऊं नका बरं का!" या तिच्याच प्रतिविनोदावर तो जोरानें हंसला नि मग तीच पुढें म्हणाली, "पुरंदऱ्यांच्या वाड्यांत हं! शोभना आहे का म्हणून विचारा; अन् नक्की या. मी वाट पाहात असेन तुमची." शेवटचें वाक्य आपण बोलायला नको होतें असें शोभनेला वाटलें खरें; परंतु विजयाच्या चर्येवर त्याचा तसा परिणाम कांहींच दिसला नाहीं तिला; कारण, आकस्मिक रीतीनें कळलेलें तिचें तें नांव मनांतल्या मनांत परत उच्चारण्यांतच

विजय गुंग होता. तिला तें शेवटीं विचारायचें म्हणून त्यानें निश्चय केलाच होता नाहीं तरी !

हें त्यांचें संभाषण चालू असतांच एक मोटार मागाहून आली अन् त्यांच्याजवळच येऊन थांबली. शोभनेला त्या मोटारींतील तिच्या मैत्रिणींनीं ओळखलें होतें.

"हें काय ग शुभा ?" मोटार थांबतांच त्या मोटारींतील एक मुलगी म्हणाली, "मला वाटलं घरीं जाऊन आमची वाट पाहात बसली असशील तूं !" यावर "अगऽऽ, इथेंच वाट सांपडल्यावर ती घरीं कशाला जाते ?" हें दुसरीचें बोलणें न् "ह ! त्यांना ऐकूं जाईल !" असें तिसरीचें दटावणेंही विजयाला ऐकूं आलें. सायकल बांधून मोटार चालू झाल्यावर "बरं ! या हं नक्की !" या शोभनेच्या याचनेवर "हो ! तरऽऽ !" हे विजयाचे उद्गार मोटारच्या घरघर आवाजांतच विरून गेले.

"शुभा, हें काय प्रकरण आहे ?" मोटार चालू होतांच पहिल्या मुलीनें विचारलें.

"अगऽऽ ? प्रकरण काय ? कादंबरी म्हण हवी तर !" दुसरीनें साथ केली.

"मी सांगू का ?" असें म्हणत ती पहिली दुसरीच्या कानाजवळ तोंड नेऊन उगीचच हसली. शोभनेच्या तोंडाकडे आळीपाळीनें पहात त्या हंसत नि चिमटे घेत होत्या; तें असह्य होऊन शोभना म्हणाली,

"काय ग सुमे ! फारसे ढेकूण झाले आहेत तुझ्या मोटारींत !"

"कां ? बाईसाहेब ? एवढ्या हुळहुळया अंगाच्या कधींपासून झालांत ?"

"मग काय थट्टा चालविली आहे तुम्हीं ?" या स्वतःच्या प्रश्नावर शोभना स्वतःच हंसली न् मोटारींत एकच हंशा पिकला. त्यामुळें चमकून गाडीहाक्यानें मागें वळून पाहिलं तों त्याच्या मोटारवाल्या 'बाईसाहेबच' त्यांत प्रामुख्यानें भाग घेत होत्या हें त्याला दिसलें. 'हं !' त्यानें मनांत म्हटलें न् मोटारचा पोंगा उगीचच वाजविला. कारण, तो हंसण्याचा प्रकार नेहमींचाच असल्यामुळें त्यांत त्याला कांहीं विशेष वाटलें नाहीं. सातत्य आणि नावीन्य यांचें प्रमाण नेहमींच व्यस्त असतें.

शोभना गेल्यावर विजयाच्या मनाची मोठी विचित्र स्थिति झाली.

थोड्या वेळापूर्वी घडलेला सारा प्रकार त्याला परत साद घालूं लागला. शोभनेच्या भेटीची त्याला विशेष आतुरता वाटत होती असें नाहीं; परंतु ती घेण्याचें त्यानें त्या रात्रीं चुकविलें नसतें एवढें निश्चित. "मी वाट पहात असेन हं!" हे तिचे शब्दही त्याच्या कर्णरंध्रांत पुनः घुमून गेले. त्यामुळें पुण्याला गांवांत शिरतांच कोणीतरी त्याच्या नांवानें हांक मारल्याचें त्याला ऐकूं आलें, तेव्हां तो जरा सुन्न मनःस्थितींतच होता. तो वळून सर्व बाजूला पहात होता न् आतां मागें वळून हांक आलेल्या दिशेच्या मोटारकडे वळणार तोंच—

"हॅलो विजय!" या उद्गारांनीं, फर्र्र्र् आवाज करीत विजयाच्या जवळच रमाकांतनें आपली मोटार थांबविली. नंतर मोटारींतून खालीं उतरून विजयाच्या पाठीवर थाप मारीत रमाकांत म्हणाला,

"असा आहेस तूं! म्हणे 'एके ठिकाणीं जायचं आहे; उगीच उशीर नको!" काय थाप मारलीस!"

"कोणीं मी? आपणच आतां माझ्या पाठीवर थाप मारलीत कीं महा-राज!" खाद्यावरून पाठीवर हात लांबवीत विजय म्हणाला.

"हें पहा, उगीच वेळ लावूं नको! बाबा मघाच्याच गाडीनें मुंबईहून आले. शामचा निरोप आहे. तो उद्या सकाळीं नागपूरला जाणार आहे. तेव्हां लागलीच आपण भेटण्यास जावं त्याला, असं म्हणण आहे त्याचं. जर आपण चुकविलं तर ऽ—स्वारीचा राग माहीतच आहे तुला."

"कोण! शाम? वा; दोन वर्षांनीं भेटतो आहे; पण ऽ ऽ"

"पण काय? कांहीं काम आहे का जरूरीच!"

"अं? छे! छे! तसं कांहीं नाहीं! सायकल घरीं टाकू अन् निघूं लागलीच जेवून."

"अच्छा! पण भोजनाला आमच्या घरींच चल म्हणजे बरं एकदम निघायला;" असें म्हणून रमाकांतने मागील बाजूस बसलेल्या शोफरला सांगितलें,

"याकूब ! मोटार इसके कंबरेके सामने ले जाव. मै आता हूं अबी !"

शोभनेच्या भेटीमध्यें हें नसतं विघ्न आलें असेंच थोडेंसें विजयाला वाटलें. मात्र जरा वेळापूर्वीच आपल्या मनांतील ती उत्सुकता अपूर्ण राहाणार म्हणून त्यीनें केलेली लपवालपवी त्यानें रमाकांतास मुळींच कळूं दिली नाहीं.

मोटार गेल्यावर रमाकांताबरोबर पायींच विजय खोलीवर पोंचला नि रात्रीचे गाडीनें ते दोघेही, मुंबईला, रवाना झाले.

प्रकरण २ रें

## सूड कोणावर ?

विकासपूरच्या उत्तरेस सात आठ मैलांवरच आनंदस्वामींचा मठ होता. ठेकाण मोठें रम्य होतें खरेंच. रानवट जमिनीच्या गवताळ प्रांगणावरील आटोपशीर अशी ती झोंपडीच होती म्हणा ना ! मठांत कांहीं संतमहंतांचे ने आश्रमवासिनी किंवा जोगिणी यांचे परमपवित्र (!) आचार नव्हते. कारण, नठांत राहाणारे असे काय ते वरील आनंदस्वामीच होत. आश्रमाच्या ागील बाजूसच झुळझुळ वाहाणारा लहानसा ओहोळ होता. त्याच्या ालीकडील तीरावर गर्द हिरव्या रंगाची झाडी दिसे. त्याच्या मागें थेट एका हाकेवर असणाऱ्या डोंगराच्या उतारापर्यंत पसरलेला हिरव्या गवताचा ाट्टा पावसाळ्यात एखाद्या मध्ययुगीन सरदाराच्या दालनांतील गालीचाच ाटला असता. सायंकाळच्या समयीं पश्चिमेकडील आरक्त छटा त्या ोंगराच्या वरील बाजूस असलेल्या आकाशाच्या भागावर पसरली म्हणजे या विचित्र पण रम्य अशा छटांचा एक पडदाच तयार होई ! कोवळे ोवळे कोंब सर्वत्र आपलें अस्तित्व दाखवीत असत वर्षा ऋतूभर. ोसाट्याच्या पावसांतील त्या प्रवाहाचा खळखळाट सुरू होई आश्रमाच्या ागील बाजूस तेव्हां. स्वैरविहारी पक्षाचे विभिन्न पण श्रुतिमंजुळ आवाज, ागनचुंबी पर्वतशिखरावर क्षणभर विश्रांतीसाठीं थांबणाऱ्या कृष्णमेघांचा ाडगडाट, उन्हाळ्यांतील वाऱ्यासर हलणाऱ्या पानांची सळसळ, या सर्व ाकारच्या निनादांनीं ती डोंगरी न् आजूबाजूचा मुलूख दुमदुमून जाई. ाजूबाजूच्या खेड्यांतून येणारे लांकुडतोडे, क्वचित् प्रसंगीं शशशावकांच्या ाकारीसाठीं, प्रवाहाच्या दिशेंत तीन एक फर्लांगावर असलेल्या माळावरील

आळशा कुटणारे पारधी, ताज्या गवतावर धष्टपुष्ट झालेलीं गुरें, त्यांच्याच मागील तो गुराखी, त्याच्या खांद्यावरील कांबळें नि हातांतील शिदोरी हींच नेहमीं दिसणारीं त्या भागांतील दृश्यें होत ! त्याच वेळीं मग रानफुलांचा वास सुटे; उन्हाळ्यानंतर पहिल्या पर्जन्यसिंचनानें उठणारा तप्त भूमीचा सुवास नि एखाद् वेळेस मेलेल्या गुरांचा फडशा पाडण्याकरितां जमलेल्या गिधाडांचा असह्य दर्प यांचीही त्यांत भर पडे. रानकेळींवरील केळफुलें नि केळीं, रसाळ फळें, महत्प्रयासानें पाडलेल्या नि सात्विक निष्ठेनें भूमिजनांनीं आणून दिलेला कडेपटारावरील मोहोळांतील मधुर मध न् याच्या जोडीला ठराविक नित्याहार हाच स्वामींचा एकंदर आहार होता.

अजयाचें नि स्वामींचें वस्तुस्थितींत कोणतें नातें होतें, किंबहुना तें तसें होतें किंवा नाहीं, कोणास माहीत. परंतु तो त्याना मामा म्हणे नि स्वामी जया किंवा जय या नांवानें त्याला संबोधीत हें मात्र खरें. विकासपूरच्या सरसीमेच्या नजिकच असलेल्या या आश्रमाविषयीं अजयास जी कांहीं माहिती होती ती इतकीच कीं स्वामींच्या आयुष्यांतील एका दुष्ट घटनेमुळें, न् जी घटना त्यानीं आतांपर्यंत कोणासच सांगितली नव्हती अशा घटनेमुळें, स्वामींना हा निवास स्वीकारावा लागला होता.

स्वामींच्या धीरगंभीर नि तेजस्वी मुद्रेप्रमाणेंच त्याची भरगच्च आणि शुभ्र दाढी, मस्तकावरील वळलेल्या आदरणीय जटा, गोरीपान व कमावलेली देहयष्टी, ओजस्वी अंगकांति, विशाल छाती आणि मध्यम उंची यामुळें त्यांच्या व्यक्तिमत्वाची छाप चटकन् कोणावरही बसत असे. या सर्वांवरही, त्याची रसाळ वाणी, त्यांच्याशीं एकदा संबंध जडलेल्या मनुष्यालाही चिरमित्र करून सोडी; आनंदस्वामींच्या सांगण्यावरून अजयाला हेंही कळलें होतें कीं, स्वामींनीं भारतांतील बऱ्याच प्रांतांची भ्रमन्ति केली होती; अन् तो स्वतः विकासपूरला ज्याचेकडे राहात असे ते गृहस्थही स्वामींचे बालपणचे निकटवर्ती स्नेही होत. विकासपूरच्या त्याच्या निवासांतून स्वामींच्या आश्रमांत नियमितपणें वेळोवेळीं राहण्यास अजय येई तो सात आठ वर्षांपासूनच, हें तर अजयाच्याच चांगलें आठवणींतच होतें.

विश्वविद्यालयाच्या प्रवेशपरीक्षेपर्यंतचें अजयचें शिक्षण विकासपूरलाच झालें होतें पुढें मात्र कॉलेजमध्यें न जाण्याचेंच स्वामींच्या मताप्रमाणें त्यानें ठरविलें होतें. आणि विकासपूरलाच बालमित्रांच्या सहाय्यानें त्यानें एक यशस्वी व्यायामसंस्था काढली होती. स्वामींच्या रहस्यमय वैराग्याचें कारण जरी अजयास आतांपर्यंत समजूं शकलें नव्हतें तरी त्यांच्या वेळोवेळच्य उद्गारांवरून तें कारण संसारी नसून निराळेंच होतें हें त्यानें ओळखिलें होतें. परंतु अज्ञानाचा अंधार तर्कांच्या क्षणदृष्ट विद्युत्प्रकाशानें थोडाच कायमचा नाहींसा होणार ?

आजही असेंच झालें. सकाळीं उठून आश्रमापुढील झाडांचीं फुलें खुडून त्यानें आणलीं; तेव्हां स्वामी म्हणाले,

"जया काय पाऊस पडतो आहे आज !"

ढगांच्या गडगडाटांचा ध्वनि उमटत होता. विजा तडकत होत्या नि आश्रमापुढील पाण्यांत पागोळ्यांचा चुबुक् चुबुक् असा आवाज होत होता.

"हो. फारच झोड उडविली आहे ! पण मामा, या सर्व वादळाप्रमाणेंच तुमचीही विचलित मनःस्थिति इतके दिवस अजून अप्रकट अशीच आहे."

"परत तुझं आपलं तेंच !" त्याच्याकडे स्वामींनी पाहिलें न् त्यांचे शुभ्र दांत त्यांच्या मिशांमधून हास्यामुळें डोकावले. "सांगितलं ना ? तसं कांहीं नाहीं म्हणून ?"

"मामा, मिटलेलं फूल शेवटीं प्रफुल्लित होतंच बरं कां ?"

"अन् तोंपर्यंत तें तसं रहाणंच इष्ट नसतं का ?"

"म्हणजे ? कांहींतरी गुपित आहे एवढं निश्चित, असाच याचा अर्थ धरायचा का ?" अजयाला वाटलें, "परंतु तें तसंच कांहींतरी असेल कीं जें सांगण्याची वेळ अजून आली नाहीं."

भोजनोत्तर स्वामी वामकुक्षीसाठीं लवंडणार तोंच व्यायामसंस्थेच्या वर्षदिनाच्या कार्यक्रम, स्त्रियांसाठीं निघणाऱ्या नवीन वर्गाची व्यवस्था इत्या-दींची चर्चा करून योग्य निर्णय ठरविला अजयानें ! बोलतां बोलतां

स्वामींनीं प्रश्न केला. "उद्यांच वर्षदिन नव्हे का तुझ्या व्यायामसंस्थेचा? हं मग माझ्यावर भाषणाचा भार असेलच!"

"हो. कारण, तो तर माझ्या मित्रांना व चहात्यांना हवा असलेला मुख्य कार्यक्रम!" अजयानें होकार दिला.

"तुझ्या संस्थेचें कार्य पाहून समाधान वाटतं मला जय! या सर्व शरीरसंपन्न सुशिक्षित तरुणांचा अंतिम राष्ट्रकल्याणाकरितां उपयोग झालाच पाहिजे; कारण व्यक्तींच्या थेंबांनींच राष्ट्राचं तळं भरत असतं!"

"पण या सरोवराची मालकी दुसऱ्याकडे असतां कामा नये; नाहीं तर ते जलबिंदु तो आपल्या स्वतःच्याच उपयोगांत आणणार!"

"तो पुष्कळ आणील, परन्तु संतप्त बिंदु भांड्यांत पडत नसतात. बाहेरील स्वच्छंद वातावरणांतच त्यांचं स्थान असतं! मात्र ही दिशा दाखविण्याकरितां कांहीं जलकण वाफेनें नाहींसेही होतात."

या स्वामींच्या उद्गारांनीं अजयाच्या तर्काला आणखीं एकदां उजाळा मिळाला. परन्तु कल्पना नि वस्तुस्थिति यांत बरेंच अंतर असतें; कल्पनेचीं प्रतिबिंबें हीं तर्काच्या दर्पणांत विकृतपणेंही तयार होतात कांहीं वेळां! त्यामुळें या प्रतिबिंबांवरून प्रत्यक्षाची ओळख चुकीची ठरण्याचा संभव नसतो का? अशा विचारानेंच स्वामींचें रहस्य एखाद्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या प्रसंगाशीं तर पोंचत नाहीं ना या तर्काचा शेवट केला अजयानें.

वर्षदिनाचा दुसऱ्या दिवशींचा महोत्सव म्हणजे अजयाच्या व्यायामसंस्थेतील चैतन्याचा संचारदिनच होता. सुरवातीस आपल्या मूठभर सहकाऱ्यानिशींच ही संस्था त्यानें स्थापिली होती. परन्तु नदीचा उगम लहान असला तरी विस्तार पुढें मोठा होतोच कीं नाहीं? कार्याचा विस्तारही वैयक्तिक भावनेनें व श्रमानें त्या सर्वांनीं असाच वाढविला होता. त्या पांचाचे पचवीस, पचविसाचे पंन्नास, असे होतां होतां आज सुमारें दोनशें सुशिक्षित व सुसज्ज विद्यार्थ्यांचें संचलन विकासपूरच्या मार्गामार्गांतून एका शिस्तींत, एका वेळेस, एकाच ध्येयानें प्रेरित होऊन जाणार होतें. या त्यांच्या एकेका पावलासरशीं स्वामींच्या हृदयांतील एका अतिशय खोल

व सुप्त खिन्नतेचा भार चाळविला जाणार होता—कमी होणार होता. कारण त्यांच्या ध्येयाशींच वरील कार्यक्रम बांव घेणार होता. तें दुःख त्यांनीं कोणालाही कळविलें नव्हतें नि पुढें घडणाऱ्या एका दैवी घटनेमुळेंच तें कळूं शकलें तरी अजयाच्या व्यायामसंस्थेतील आजचा उत्साह अपूर्व होता. राष्ट्राच्या शरीरसंपत्तीची जोपासना करणाऱ्या करुणांचा तो समूह होता! पारतंत्र्याच्या अवजड जोखडाखालीं राष्ट्रबांधवांचीं जुंपलेलीं शरीरें सोडविणें नि त्यांची दुबळी अवस्था नाहींशी करणें हें त्यांचें ध्येय होतें! युवक हेच राष्ट्राच्या विश्वासाचें विश्रामस्थान हें सत्य आपल्या कृतीनें सिद्ध करण्याचा त्या सर्वांनीं चंग बांधला होता. देशाच्या अवनत दशेंत ज्या अनेक उपांगांवर प्रहार झाले त्यांतील शरीरसंपन्नता हें तरी ताठ उभें ठेवण्याचे त्यांनीं ठरविलें होतें. लक्ष लक्ष बांधवांचे समूह जीवनाच्या रणसंग्रामांत स्वतःची सहृदताही विसरून गेले आहेत; फार काय, त्यांना दुसरा मार्गच नव्हता तसें करण्यावांचून. हें लक्षांत घेऊन कृतीनें सुप्त गर्जना ते करीत होते, कीं "बस्! झाली इतकी अवनति पुरे झाली. आतांपासून शक्य त्या त्या वेळेला, तशा तशा प्रकारें, आम्ही समूहानें उठणार नि राष्ट्राच्या उत्कर्षाचा प्रयत्न करणार; अनिर्बंध, अनवरत, भगीरथ यत्न करणार!" अन् या एका उपांगानें आपली सहृदता प्रस्थापिली कीं ओघानेंच सर्व राष्ट्राची स्वातंत्र्य-कायाच अधिक तेजानें भारावली जाणार नव्हती का? पण ते गुप्त हेतु होते. कारण कितीही उदात्त हेतु असले तरी प्रतिकूल परिस्थितीच्या व जुलुमाच्या झंझावातांत ते कधींच तग धरूं शकत नाहींत उघडपणें; प्रच्छन्नतेच्या बंद कोशांतच त्यांचें बीज जपून ठेवावें लागतें व अनुकूल परिस्थिति आणि योग्य संधि येतांच तें रुजवण्याचा उपक्रम करायचा असतो.

आपणांस न्यावयास आलेल्या अजयाजवळ आतां वाटेनें स्वामी जें बोलले तेंही वरील ध्येयच दृष्टिपथांत घेऊन.

"या तरुणांचा उद्देश काय अजया?"

"पराक्रम!" अजयानें चटकन् उत्तर दिलें.

" पराक्रम ! " खिन्नतेनें स्वामी हंसले व आपल्या हातानें त्यांनीं जटा मागें सारल्या. " तुमचा हा संयुक्त पराक्रम राष्ट्रस्वातंत्र्याकरितां पाहिजे. पराक्रम हें व्यक्तीचं भूषण आहे तर स्वातंत्र्य हें राष्ट्राचं रत्नभांडार आहे; सौंदर्य आहे; ऐश्वर्य आहे. पारतंत्र्याच्या कुंद जागेंत पराक्रमाचा प्रकाश पडत नसतो; स्वातंत्र्याच्या पटांगणांत तो तेजानें तळपतो. "

" खरंच, परतंत्रतेंत दुःखाचंच राज्य असतं ! "

" त्याचा अनुभव मला आहे ! "

" तें नाहींसं करण्याचा मार्ग नाहीं ? "

" आहेसा वाटतो न तो कांहींनीं आचरलाही. "

" झालं तर ! " असें म्हणून अजय दुसरीकडे पाहाणार तोंच स्वामींचा थोडासा निराश स्वर उमटला, " झालं काय ! काटा निघाला तरी त्याचा बोंच निघत नाहीं. एका दुःखाचा नायनाट झाला तरी त्याचा अपेशी परिणाम घडून आलाच ! त्याचंच दुःख होत आहे मला. "

त्यांच्या प्रत्येक वाक्यांत अजयाला अर्थपूर्णता वाटली. अन् त्यांच्या दुःखाच्या उगमाकडेच आपण जातों आहों असें वाटलें त्याला ! दुःख-निवारणाचा उपायही कळणार अशीहि आशा त्याला वाटली. आणि पुष्कळदां घडतेंही असेंच; आपल्या मनाला एखाद्या गोष्टीविषयीं जें जें संभाव्य वाटतें, तेंच अल्प काळांत सत्यसृष्टींत घडून आल्याचा अनुभव मिळतो.

व्यायामसंस्थेच्या दारापाशीं स्वामी आले तों तेथील थाट पाहून त्यांच्या मनांतील खिन्नता पार नाहींशी झाली. त्यांचा आनंद उचंबळूं लागला. शांतीनें सर्व जागा व्यापली नि अगतिकत्वाची जागा कर्तव्यतत्परतेनें पटकाविली. मिरवणुकीस प्रारंभ झाला तो प्रथम श्रेणींतील चार तरुणांनीं उच्च स्वरांत म्हटलेल्या स्वातंत्र्यभूपाळीनें ! पारतंत्र्याचा वीट येऊन, परमेश्वराची प्रार्थना टाहो फोडून ते युवक गात होते असेंच स्वामींना वाटलें. त्यांनींही डोळे मिटले अन् त्या प्रार्थनेला हळूच साथ केली.

गंभीर वातावरणांत प्रार्थनाभूपाळीचे स्वर उमटत होते—

रक्ष रक्ष ईश्वरा ! भारता प्राचीना जनपदा
भोगियिली बहु जयें एकदां वैभवसुखसंपदा ॥ धृ० ॥

सर्वजण तल्लीन होऊन भूपाळी म्हणत होते. त्या स्वातंत्र्यभूपाळीच्या त्या पवित्र स्वरोच्चारांत सर्वजण रंगून गेले होते. तोंच भूपाळी संपत आली. आणि शेवटल्या ओळी दुमदुमूं लागल्या—

रोमरंध्रीं चैतन्य खेळवी राष्ट्राच्या ईश्वरा।
सातसमुद्रांवरी फडकुं दे यशोध्वजा सुंदरा ॥ १ ॥

गोविंदाची ही स्वातंत्र्यभूपाळी ऐकतांना कोणाच्या अंगांत स्फूर्ति संचारणार नाहीं ?

पवित्रता सर्वत्र पसरली होती भूपाळी म्हणत असतांना !

प्रार्थना संपतांच संचलनगीताचे रणसूर निघूं लागले. मिरवणुकीच्या अग्रभागीं भगवा ध्वज डौलानें मिरवीत होता. त्याच्यामागें आपल्या कार्याच्या वैभवाचा उत्कट अभिमान बाळगणारा अजय न् त्याचें कौतुक करणारे आनंदस्वामी चालले होते. अधिकारपदावरील शिक्षक संचलनाच्या आज्ञा देत होते. स्फुरणदायी संचलनगीतांची तुतारी उत्तुंग स्वरांत फुंकणारे बिगुलवाले, अन् त्याच सुरांच्या शेवटीं हृदय हलविणारें तें गीत गाणारे दोनशें वीर तरुण, कांहींजण खांद्यावर खऱ्या बंदुका घेऊन व बाकीचे डमी गन्स घेऊन चालले होते. मिरवणुकीच्या ठराविक मार्गानें हा सर्व परिवार चालत गेला. त्यांचा शेवट गांवमैदानांत होणार होता.

दरवर्षीप्रमाणें यंदाही या सर्व मैदानांत लांबच लांब श्रोतृसमुदाय पसरला होता. स्वामींचें प्रवाही वक्तृत्व न् संचलनाची सलामी पाहण्याची अहमहमिका सुरू होती त्यांच्यामध्यें ! संस्थेचा वर्षदिन, आवेशयुक्त अशें स्वामींचें वक्तृत्व नि राष्ट्राभिमान उसळविणारें त्यांचे भाषण असा त्रिवेणी संगम झाल्यावर तेथें पर्वणीची गर्दी व्हावी हें अगदीं साहजिक होतें.

स्वामी भाषणास उभे राहिले. टाळयांचा प्रचंड कडकडाट झाला. तो हवेवर विरतो न विरतो तोंच स्वामींचा धीरगंभीर ध्वनि आपले पंख

उघडून हवेवर फिरूं लागला. त्यांचें वाग्विमान श्रोतृसमुदायास उंच उंच घेऊन चाललें होतें. स्वामी म्हणाले—

" मदेशबांधवहो;

विलासपुरांतील ही संस्था स्थापन होऊन आज पांचच वर्षे झालीं. पण तेवढ्या अवधींत झालेला संस्थेचा उत्कर्ष अभिनन्दनीय आहे. पूर्वी जिथें लाठी फिरवणंही वर्ज्य होतं, तिथें आज चारशें लाठ्या फिरताना दिसतात. लष्करी शिक्षणाचं नांवही काढणं हें जिथें पाप होतं, खांद्यावर बंदुक तर दूरच राहो परन्तु नुसती काठी टाकून शिस्तींत नुसेंत पाऊल टाकण्यासही बंदी होती, शरीरसौख्यासाठीं वैयक्तिक प्रयत्न हेच जिथें सरकारच्या तीक्ष्ण दृष्टीला सहन होत नसत, आखाड्यांची नि व्यायामसंस्थांची स्तुति करणें हाही राजद्रोह झाला असता, त्या ठिकाणींच आज दोन तपानंतर हीं दृश्यें दिसत आहेत. आणि हें चिन्ह निःसंशय आपल्या भाग्यदिनाचंच लक्षण आहे. स्वतःच्या कार्याचा दिमाख मिरविण्यास तसं काहीं तुम्ही केलंत का ? नाहीं तर एके काळीं शिवराय, महाराष्ट्रांतील मान्याचीं ठिकाणं, स्वातंत्र्ययुद्धांतील रक्षणस्थानं करण्यांत चूर असत तर हिंदुसम्राट रावबाजी अवघा हिंदुस्थान पराक्रमाच्या गरुडभरारीनं पादाक्रांत करण्याची यशस्वी पराकाष्ठा करीत असत. गतकाळच्या इतिहासाविषयीं बोलूं नका असं म्हणण्यात काहीं अर्थ नाहीं. वर्तमानाचं यश गतकाळातूनच प्रतीत होत असतं. अन् वरीलप्रमाणें म्हणणाऱ्या सद्गृहस्थानाही हेंच अंतर्यामीं पटत असतं ! इतिहासाचा साभिमान उल्लेख करूं नका म्हणणाऱ्यांनाही रायगड म्हटला कीं मराठ्यांच्या सुयशाची उठवणी आठवतच कीं नाहीं ? शनवारवाडा म्हटला कीं अटकेपार फडकत आलेला भगवा झेंडा दिसतोच कीं नाहीं ? चितोड म्हटलं कीं शूर रजपूत अंगनांचा त्याग, दिल्लीचं तख्त म्हटलं कीं मराठ्यांची दिल्लीवर स्वारी, हीं त्यांच्या मनाला आनंद देतातच ना ? तेव्हां इतिहासाला तुम्ही सोडूं म्हणून सोडूं शकत नाहीं. दोनशें वर्षांच्या इतिहासाचा अमेरिकेनें अभिमान बाळगावा तर मग दोन हजार वर्षांची परंपरा तुमच्यामागें उभी आहे तिकडे पाठ कां फिरवितां ? परकीय सत्तेशीं टक्करा देऊन पारतंत्र्याचा, असह्य जुलुमांचा,

नि दारिद्र्याचा डोलारा जमीनदोस्त करणाऱ्या वीरांचा तो काळ, अन् परकीय सत्तेच्या स्थैर्याला मदत करून त्यावर ऐश्वर्य भोगणाऱ्या त्यांच्याच वंशजांचा हा काळ, शत्रूला युद्धांत खडे चारून रणांगणांतून पिटाळणारे ते वीर व शत्रूकडून अर्जविनंत्यांनीं सनदा मिळवूं इच्छिणारे वेडेपीर, स्वत्व रक्षणासाठीं बलिदान करणारे तेव्हांचे सेनापति आणि स्वत्वाची राखरांगोळी करून व स्वतःच्या बलाची विस्मृति बाळगून नाहक तडजोडीची इच्छा बाळगणारे आजचे राष्ट्रपंडित यांतील फरक लक्षांत आणा. पारतंत्र्यामुळें माझ्या राष्ट्राची झालेली हानि मला आतां पहावत नाहीं. त्यांतील प्रत्येक उपांग आतां जीर्णोद्धार करून जिवंत करण्यास तुम्ही त्वेषानं लागलं पाहिजे. जुलमाची आणि अन्यायाची परिसीमा झाली आहे. मीही त्यांतलाच ! ज्याला झळ त्याला कळ ! इतरांना तितकं टोंचत नाहीं. आजच्या दिवशीं राष्ट्राचा गाडा पुढें नेण्याकरितां, करतां येण्यासारखं सर्व तुम्हीं केलं पाहिजे. शत्रूची काय छाती लागली आहे निःशंकपणें वावरण्याची यापुढें ? शस्त्रधारणेची पात्रता असणं अवश्य आहे. पापी दुनियेंत नि संधिसाधू जगांत साधुत्व टिकत असतं. अहिंसा हें दुर्बळांचं लक्षण ! प्रसंगीं साधन म्हणून वापरण्यास हरकत नाहीं पण साधन म्हणतां म्हणतां त्यालाच साध्य करून कसं चालेल ? हें लक्षांत ठेवा कीं, नुसत्या सद्गुणावर राष्ट्र जगत नसतात. राष्ट्राचं ऐश्वर्य त्याच्या तरवारीच्या अग्रभागीं वावरत असतं ! स्वातंत्र्याची तळमळ ही ओढ्यासारखी आहे. ओढ्याची खळखळ आणि स्वातंत्र्याची तळमळ कधीं थांबली आहे का ? आतां घरीं जातांना मनाशीं निश्चय करूत जा कीं आजपासूत मी प्रत्येक गोष्टींत माझ्या अंतिम ध्येयाला पोषक असंच धोरण ठेवीन. विशेषतः तुम्ही तरुणांनीं गजत उठलं पाहिजे कीं शस्त्रग्रहण हा आमचा हक्क आहे. "आर्तत्राणाय मे शस्त्रं" हें तुमचें ब्रीद असूंद्या ! भूमातेच्या पारतंत्र्याचें आर्तत्व नष्ट करण्याची प्रतिज्ञा करून ती पूर्ण करण्याचे प्रयत्नास लागाल तेव्हांच माझ्याप्रमाणें अन्यायाचें शल्य ज्यांना टोंचत आहे त्यांचं समाधान होईल !"

असा सारांश होता स्वामींच्या भाषणाचा ! आकाशाच्या मध्य आधारांत

गरुडानें भरारी मारावी तशी त्यांची वाचा स्वच्छंदानें भरारी मारीत होती. श्रोतृसमुदायाच्या भावना वाक्यावाक्यागणिक वरवर चढत होत्या. शेवटीं त्याची परमावधि होई नि टाळ्यांचा कडकडाट गर्जू लागे. भावनाप्रधान तरुणांच्या मनांतील चेतना निखाऱ्यामागून निखारे फुलवावे त्याप्रमाणें चेतविली जाई. अस्खलित वक्तृत्वाची स्वामींची हातोटी त्यांतील अंतःकरणाच्या जिव्हाळ्यानें सरळच उठून दिसे. सर्वत्र अंधार पडला असतां एखाद्या लांब दिसणाऱ्या दिव्याचा झोत जवळ आणून त्याचा प्रकाश पाडावा त्याप्रमाणें निश्चैतन्याच्या तमोमय मनोवृत्तीवर त्याचे विचारझोत एकदम प्रकाश पाडीत होते नि तिला प्रज्ज्वलित करीत होते. त्यामुळें सर्व सभाच स्तब्ध होऊन बसे तें ऐकतांना ! स्वामींच्या बोलण्यांत आरडाओरडा नव्हता, हातवारे नव्हते, बाह्यविष्काराचें नांवही नव्हतें. पण त्यांत जो विचारांचा निर्भयपणा होता तो इतका प्रभावी अन् त्याच्यामागें स्वामींची तपश्चर्या तीही इतकी आदरणीय कीं त्यांचा एखादा विरोधकही मुग्ध होऊन जावयाचा !

श्रोतृसमुदाय ओसरूं लागला. मैदानावर सर्वत्र तो पसरला. जणूं कांहीं स्वामींचा संदेशच शब्दाशब्दानें व विचाराविचारानें विस्तार पावत होता त्या ठिकाणीं !

आश्रमांत परत आल्यावर त्यांच्या व्याख्यानांतील एक वाक्य अजयानें स्वतःशींच उच्चारिलें,

" स्वातंत्र्याची तळमळ आणि ओझ्याची खळखळ कधीं थांबली आहे का ? " त्यावर स्वामी हर्षभरीत मुद्रेनें नि उल्हासयुक्त अंतःकरणानें म्हणाले,

" थांबली नाहीं तरी कमी मात्र होते हें निश्चित. "

" कशी ? " अजयानें जिज्ञासा दाखवली.

" प्रयत्नांच्या यशस्वितेनें ! "

" प्रयत्न ? "

" हो; ईप्सित यशस्वी करण्याचा प्रयत्न ! मात्र तसं करतांना अपयश

येऊन आपल्याला प्रतिक्रांतीचा चटका बसला तर त्याचा सूडही सावधपणें घेतला पाहिजे ! "

" सूड ! सूड कोणावर आणि कशाबद्दल ? "

" कोणावर अन् कशाबद्दल ! " तेच शब्द हताशपणें स्वामींनीं पुन्हा उच्चारले व ते एकदां खिन्नपणानें हंसले.

अजयानें पाहिलें. स्वतःच्या प्रश्नाचें उत्तर मात्र त्यांच्या मुद्रेंत त्याला कागलीच मिळालें नाहीं.

यानंतर अजयानें बराच विचार चालविला, परन्तु स्वामींच्या दुःखाचें कारण त्याला सांपडूं शकलें नाहीं त्या वेळेस !

प्रकरण ३ रें

# विजयाची कर्मभूमि

मुंबईला एक दोन दिवस राहून विजय इनामगांवाला आला, तो आतुरता नि उत्साह यांच्या भोंवऱ्यांत पूर्णपणें गुरफटलेला. रमाकांताच्या त्या दिवशींच्या आकस्मिक येण्यानें न् शामची मुंबईची भेट अपरिहार्य असल्या-मुळें शोभनेची भेट त्या दिवशीं तो घेऊं शकला नाहीं. स्वतःला तिच्या भेटीचा पुनर्लाभ मिळाला नाहीं, यापेक्षांही या आपल्या न जाण्यामुळें आपल्याविषयींचा तिचा ग्रह तितकासा दूषित होणार नाहीं ना अशी शंकाच त्याची आतुरता अधिक वाढवीत होती. वास्तविक शोभनेची व त्याची ती गांठ अगदीं अनपेक्षित होती. पण म्हणून जें घडलें त्यावर विचार करण्याचें त्याचें मन सोडून देईना! या त्याच्या आतुरतेच्या मनःस्थितीलाही दुसरी एक त्याच्या दुप्पट उत्साहाची अशी बाजू होती. कारण, आज जवळ जवळ सहा महिन्यांनीं तो आपल्या गांवीं येणार होता. त्यामुळें घरची ओढ आतां पूर्णपणें त्याला घराकडे ओढत होती. मातेप्रमाणें लहानपणापासून वात्सल्यानें व प्रेमानें आपल्याला जिनें वाढविलें ती वहिनी भेटणार नि यापेक्षांही, आपली कर्मभूमी किती प्रगत झाली आहे, हें कळणार म्हणूनही त्याला तसा उत्साह वाटणें साहजिक होतें.

कॉलेजमध्यें गेल्यापासून दोन वर्षांपूर्वी बी. ए. होईपर्यंत जगाच्या एका निराळ्याच बाजूचा विचार त्याचें मन करीत होतें. पुण्यास आल्यापासून कॉलेजमधील क्रीडायुक्त नि मोकळें अन् सुखलोलुप वातावरण त्याच्या मनावर विशेष छाप मारूं शकलें तरी त्यांत त्याला आकर्षण वाटेना; त्याचें मन त्याला सांगूं लागलें कीं, " पहा! तुझ्या खेडेगांवच्या आजूबाजूला

जी दुर्दशा तुला आढळते, त्याचा मागमूस तरी या आनंदी जीवनांत दिसतो आहे का? परन्तु तुझ्यासारख्या तरुणानें, कीं ज्याला ती दुर्दशा नि ही सुखलोलुप विद्यार्थिदशा या दोन्ही गोष्टी माहीत आहेत त्यानें विचार केला पाहिजे. या प्रकारच्या निष्काळजी जीवनांत तुझ्या दुःखग्रस्त देश-बांधवांची स्थिति सुधारण्याला तुला वाव आहे. जगांत काहींतरी करण्या-करिता तुझा जन्म आहे."

जगाच्या न् स्वतःच्या देशाविषयीं तो जों जों विचार करूं लागे तों तों त्याला आपल्या देशाची—या भारताची—अवनतीच अधिक दिसूं लागे. शेवटीं गेल्या वर्षी आपल्या गांवच्या नि आजूबाजूच्या अशिक्षित लोकांना सज्ञान करण्याचें कार्य त्यानें सुरू केलें होतें.

त्याच्या या कार्याचें काय मूल्य होतें तें त्याच्या आगमनाप्रसंगीं इनामगांवच्या गांवाबाहेरच्या चौकांत, जेथें मोटारी उतारूंकरिता थांबत होत्या, त्या ठिकाणीं जमलेला जनसमुदायच सांगूं शकला असता! तो उत्सुक समाज पाहून शोभेनेविषयींचे विचार विजयाचे मनांत तात्पुरते तरी नाहींसे झाले. स्वतःच्या कार्याची सफलता पाहून कोणाचें अंतःकरण भरून येणार नाहीं? त्या समुदायाच्या मनांतही, विजयाच्या आगमना-विषयीं किती कुतूहल निर्माण झालें होतें! त्यांना आपला नेता येणार असेंच वाटत होतें. लहानपणीं गावच्या चार पांढरपेशा पोरांचा दादा होता तो; पण आज? आज तो जनतेचा खरा हितचिंतक म्हणून जनताच तसें म्हणूं लागली होती. आपल्या या वर्षाच्या नव्या योजनेची मुहूर्त-मेढ तो रोवील, अधिक काहींतरी हिताची योजना तो या सुट्टींत सांगेल, आपल्या उद्धाराचा आणखीं एखादा मार्ग तो आपल्याला दाखवील, रम्य प्रासादाच्या मालकाच्या—इनामदाराच्या—कुळांत जन्म घेऊन दीन-दुबळयांच्या दरिद्री झोंपड्यांचें सुख साधण्याच्या तो जोराचा प्रयत्न करील असा त्यांचा विश्वास होता!

विजय मोटारींतून उतरतांच कोणी त्याची बॅग उचलली, प्रसार करण्या-करितां छापलेल्या पत्रकांचा गठ्ठा दुसऱ्यानें उचलला. एकानें आपल्या

घरामागील बकुळीची भरघोस नि सुवासिक पुष्पमाला प्रेमभरानें त्याच्या गळ्यांत घातली. अन् बाकीच्या सर्वांनीं एकत्र जयघोष केला त्याच्या नांवाचा ! तो ऐकून विजयानें हाताचें बोट वर करून म्हटलें, "नाहीं! राष्ट्रमाताची की जय!" तेव्हां तोहि ध्वनि उमटला नि हें सर्व दृश्य पाहून मोटारींतून पुढें दुसऱ्या गांवाला जाणाऱ्या उतारूंना विजयाबद्दल आदर वाटला तोही विलक्षणच !

गांवांतून जातां जातां विजयानें पाहिलें. तो सर्व रस्ते झाडून स्वच्छ केलेले त्याला आढळले. गांवांत शिरतांनाच लागणाऱ्या 'गावराना'चा धनि सहास्य मुद्रेनें तो सोहळा पाहात होता, त्याच्याकडे पाहून तो हंसला. जवळच दोन धर्मादाय विहिरी होत्या, त्यांवरील गरीब शेतकऱ्यांचीं गांवढळ बायकामुलें आपलीं गाडगीं—मडकीं घेऊन पाणी भरीत होतीं. विजय उतरल्यावर उडालेल्या गडबडीमुळें विस्मयानें चकित होऊन त्यांच्यापैकीं एकजण विजयाकडे पाहात उभा होता. कांहीं दिवसांपूर्वी या विहिरीवर गांवच्या अस्पृश्यांना पाणी देण्याचा घाट यशस्वी रीतीनें ज्याच्या साहाय्यानें विजयानें पार पाडला होता तोच होता तो ! एक दोन फर्लांगा-वर शेतकऱ्याची एक झोंपडी होती तेथून थोडें वळण घेतलें कीं मग लोकल-बोर्डाच्या शाळेची लाल रंगाची बैठी इमारत लागे. विजय या ठिकाणा-पर्यंत पोंचतांच शाळेच्या लोखंडी कुंपणाच्या गजावर चढलेला एक लहान मुलगा आपलें धुळीनें मळलेलें अंग घेऊन धांवत विजयाकडे आला. त्याचा बाप "अरे अरे, हें काय !" असें म्हणत असतांनाच त्या मुलाला विजयानें उचललें नि त्याचा एक गालगुच्चा घेऊन त्याला परत खालीं सोडून दिलें. दिवाळीच्या दिवसांत करमणूक नि चुरस या दोन्हीं हेतूंनीं ज्या ठिकाणीं गांवांतील जनावरांच्या झुंजी खेळविण्यांत येत असत, तो गोंड टाकून विजय त्याच्या वाड्याजवळ गेला. कुंपणाकरितां वाड्याच्या भोंवतीं घातलेले मातीचे सारवलेले ओटे न् लहानपणापासून वाढविलेलें स्वतःच्या आवडीचें मोगऱ्याचें झाड हें टाकून विजय घरांत शिरला तों झोंपाळ्यावरच वहिनी बसलेल्या त्याला दिसल्या. विजय दिसतांच झोंपाळ्या-

वरच जरा बाजूला सरकत नि हातानें जवळच बसण्यास विजयाला खुणावत त्या म्हणाल्या,

" भाऊजी ? परवांच येणार होता ना ! म्हणजे दोन दिवस उशीरच झाला म्हणायचा !"

" हो, परन्तु त्याचं असं झालं—" असें म्हणून नागपूरच्या शामला भेटण्याकरितां कसें जावें लागलें इत्यादि वृत्तांत त्यानें सांगितला.

" असं ! " उठतां उठतांच वहिनी म्हणाल्या. " बरं, कांहींतरी फराळाचं आणतें हो ! बाहेर जाऊं नका ! नाहींतर इथें आल्यावर थोडीसुद्धां उसंत नसते तुम्हांला. "

आणि झालेंही तसेंच ! कारण वहिनी घरांत गेल्यावर दोघे तिघे बे मित्र बाहेर विजयाला भेटण्याकरितां येऊन बसले त्यांच्याशीं बोलण्यांत वहिनींनीं फराळाची दोनदां आटवण दिली तरी विजयाला आंत येतां आलें नाहीं.

त्या मित्रांजवळ आपल्या कार्याविषयीं बरीच विचारपूस केली त्यानें.

" माझं पत्र मिळालंच असेल तुम्हांला ?"

विजयाच्या या प्रश्नावर त्यापैकीं एकजण उत्तरला,

" हो ! अन् त्याप्रमाणेच त्या गांवच्या लोकांना सांगितलं आम्हीं ! त्यांच्यापैकीं चारपांच जणांना या सुट्टींत शिकायला बौद्धिक वर्गांत बोलावलं आहे. उद्यांपासून येतील ते. म्हणजे मग दोन तीन महिन्यांनीं तेच त्यांच्या गांवीं वर्ग सुरू करतील शिक्षणाचा ! हो, अन् तुमचे ते मुंबईचे शेट ? त्यांच्याकडे जाऊन आलों परन्तु तूं म्हणालास तसंच झालं ! कांहीं न मिळतां हात हालवीत परत यावं लागलं ! "

" मी पहिल्यापासून तुम्हांला सांगत आलों, कीं ज्यांना या प्रांतांतल्या गरीब शेतकऱ्यांच्या दुर्दशेची कल्पना नाहीं ते, अन् कल्पना असूनही श्रीमंतीच्या डौलांत मिरवितात ते, यांच्यापासून मुळींच मदत व्हायची नाहीं आपल्याला. बरं, आज कुठं जमतां ? "

" मारुतीच्या ओट्याजवळ. "

" कां ? नेहमींची रात्रीच्या वर्गाची जागा आहे ना ? "

" म्हणजे, आजपासूनच वर्ग सुरू करणार आहेस कीं काय?" दुसऱ्या एकानें प्रश्न केला.

" छे! परन्तु मुहूर्त करून ठेवावा म्हणतों!"

" बरं आहे! नऊ वाजतां जमवितों सगळ्यांना!" तिसरा म्हणाला.

रात्रीं त्या जागेवर जो खेडुतांचा समुदाय जमला होता त्यांच्या वीतभर लंगोट्या, फाटक्या बंड्या, व जुनाट कांबळीं त्यांच्या होणाऱ्या पिळणुकीचा धडपणें डांगोराच पिटत होतीं जणू! जवळच्याच पिंपळाचीं पानें वाऱ्याशीं हितगुंज करीत होतीं, तीं जरा मोठ्यानेंच. त्या जागेवरील ओटा आणि त्यावरील जाजम हीं विजय अजून आला नसल्यामुळें मोकळींच होतीं. त्या वस्तूंनीं प्रथम येणारा क्षुल्लक छात्रगण पाहिला होता! संख्येकडे न पाहतां कार्याच्या उदात्ततेविषयींच निश्चिती ठेवण्याचा विजयाचा निश्चय त्यांना माहीत होता! विजयाची जबरदस्त मेहनत व कार्याची आवड हीं त्यांना प्रतीत झालीं होतीं. अन् आतां त्या कार्याची उपयुक्तता व गोड शेवटही अनुभवाला येत होतीं त्यांच्या!

विजय येण्यापूर्वी त्या जमलेल्या मंडळींतही गप्पागोष्टी चालू होत्या.

" विजयदादा आला म्हणजे कसं हायसं वाटतं!" त्यांच्यापैकीं एक उंच खेडुत म्हणाला.

" बरोबर आहे तें. अरे, एक वर्सापूर्वी पुस्तक म्हणजे डोस्कं उठायचं माझं! पन् आतां घडाघड वाचून दाखवितो. परवा गेलों ना त्या शेटजीकडे पैसे मागायला? आंगठा मागायला लागला तेव्हां सांगितलं, "शेट, सही करतों आणा." शेटजी चपापले. अन् जेव्हां सरकन् सही ठोकायला घेतली तेव्हां त्यांना वाटलं आपली लबाडी पचली! पण तो कागद वाचला अन् पहातों तों पंचवीसाचे पस्तीस घातलेले कागदांत! शेटजींना म्हटलं, हे मला दिलेले पैसे मोजा! करतो काय मग! हूँ हूँ करीत आंकडा बरोबर करून घेतला तेव्हां परतलों!"

" अन् हो! अरे, इथें देवळांत वर्तमानपत्र येणार आहे. कालच

म्हणाले ना आपले दादा. परत परत मास्तरला विचारायला नको आतां. मास्तर वाचून दाखवा पाहूं तेवढं म्हून!" दुसरा म्हणाला.

"अरे! एवढंच काय घेऊन बसला आहेस?" त्याच्या मांडीवर थाप मारून तिसरा म्हणाला, "आपला खंड भरला, कीं एक हातमाग पण सुरूं व्हायचा आहे इथें! अन् इथलं कापड मोठमोठ्या गांवांत विकायला जायचं आहे! आमच्या तुक्याला सांगितलं म्यां, म्हटलं "लेका, फार हिंडत व्हतास नव्हं का? आतां जा विजयदादाच्या पुढं अन् तो सांगेल तें आण विणून!"

असें त्यांचें बोलणें चाललें होतें तोंच विजय सभास्थानीं पोंचला. घरून निघतांना तो वाचीत असलेल्या प्रेमकथेचा भंग करून त्यानें पुस्तक दूर लोटलें आणि असें करतांना शोभनेची स्मृतिच आपण दूर लोटीत आहों असें त्याला वाटलें; इतका तो रंगून गेला होता त्या गोष्टीमध्यें! कारण, मनुष्याची अशी एक ठेवण आहे कीं, आपल्या परिस्थितीचें साम्य कोठेंहि दिसलें तरी तो तद्रूप होऊन जातो.

सभास्थानावर बोलण्यास उभें रहातांना मात्र त्याचे ते विचार पुन्हां मावळले! त्याचें भाषण चालू होतें.

"......पहिलाच दिवस म्हणून फार थोडें बोलणार आहें मी आज. बौधिक शिक्षणांत आपण सुरुवात केली. त्यांच्या अनुषंगानें तुमचं आरोग्य नि त्याचं महत्त्वही तुम्हांला कळूं लागलं, हें गांवांतील स्वच्छताच सांगेल! आज तुम्हांला मला इतकंच सांगायचं आहे कीं, आपल्या गांवाबाहेरचे पुष्कळ लोक त्यांच्या गांवाला वर्ग सुरूं करण्याबद्दल सांगण्यांकरितां बरेच वेळां येऊन जातात. त्याच्यापैकीं कांहींनीं इथें येऊन तयार व्हावं नि मग स्वतःच आपल्या गांवीं कार्याला सुरुवात करावी असं ठरवलं आहे आम्हीं. शक्य तितक्या वेळीं मी तुमच्या गांवांना भेटी देईनच. परन्तु सर्वच भार घेणंही अशक्यच आहे! मी आहें तोंपर्यंत पैशाचा अभाव नाहीं तुम्हांला. गांवकीच्या देवळांत किंवा एखाद्या मुद्दाम ठरविलेल्या खाजगी बागेंत जमत जा तुमच्या गांवीं. माहिती अन् कार्याची दिशा इथून मिळत

जाईल! संघटन म्हणजे काय हेंच आहे! फसव्या कबुलायति लिहून घेऊन तुम्हांला कोणी फसवणार नाहीं यापुढें! अल्प कर्जाबद्दल तुमचं सर्वस्व देऊनही उरेल असं कर्जाचं फुगलेलं ओझं लबाडीनें कोणी लादूं शकणार नाहीं तुमच्यावर! वेठीची गोष्ट तर दूरच राहो; पण साधा अन्याय झाला तरी त्याविरुद्ध उठण्याची जागृति झाली आहे तुमच्यांत. उद्यांपासून अधिक नेटानें कार्याला लागावचं एवढंच सांगायचं आहे मला..."

तो आदेश ऐकून घरीं जातांना सर्वांच्या मनांत एक नवीनच समाधान आणि अभयदान मिळाल्याचा आनंद भरला होता. स्वतःच्या हक्काच्या, मग तें झोंपडींत कां होईना, पण आपण सुखानें नांदूं शकूं, सौख्याच्या आवारांत आपण वैयक्तिक आवाक्याप्रमाणें भटकूं शकूं अन् या सर्व उपकारांची फेड म्हणून कृतज्ञतेनें विजयाविषयीं सदैव देवाप्रमाणें आदर दाखवूं, अशीच भावना होती सर्वजणांच्या मनांत.

नेहमींच्या कार्याविषयींचा वेळ सोडून देतां विजयाची वागणूक या सुट्टींत पहिल्याप्रमाणें राहिली नाहीं हें वहिनींच्या स्पष्ट ध्यानांत आलें होतें. सुटींत आल्यावर वहिनींशीं आईजवळ माराव्या त्याप्रमाणें तासन् तास गप्पा मारणारा विजय फावल्या वेळींही एखाद्या पुस्तकांत डोकें खुपसून बसत होता. कॉलेजमधील निरनिराळ्या गमती सांगून, 'कॉलेज म्हणजे दुसरं नंदनवनच आहे,' असें भासविणारा विजय पुष्कळवेळां एकटाच लांब फिरायला जाई. चांदण्या रात्रीं चमचमणाऱ्या तारकापथाखालून, थंड हवेंत वहिनींना दोनतीनदां तरी सुट्टींत फिरायला यावयास भाग पाडणारा विजयाचा आग्रह तर कुठें दिसतच नव्हता त्यांना. परन्तु त्यांनीं स्वतः विचारल्यावरही नकार देई तो! संभाषणांतही जेवढ्यास तेवढेंच उत्तर पुष्कळ वेळां तो देई अन् तेंही नादांत असल्याचें दर्शविणारेंच असे कांहीं वेळां!

त्यामुळें आतां जेवतांना कांहींतरी वाढण्याकरितां वहिनी आल्या त्या वेळेस असेंच झालें.

" हं " विजय म्हणाला.

" पुरे का ? " कांहीं न वाटतांच वहिनींनीं विचारलें.

तरीही ' हं ' असेंच उत्तर बाहेर पहात विजयानें दिलें.

हातांतील ताट सांवरत वांकून विजयाकडे पहातच वहिनी हंसल्या.

" विचार कसला चालला आहे तुमचा भाऊजी ? "

या वेळीं मात्र भानावर येऊन. " विचार ! कुठं काय ? कांहीं नाहीं ! " अशी चुळबूळ करीत टाळाटाळ केली त्यानें !

" पण भाऊजी, अशानं आपलीच शोभा करून घ्याल हं, एकाद्वेळेस " स्वयंपाकघरांत परततांना दारांतच वहिनींनीं हें वाक्य उच्चारलें.

त्यांतील शोभा शब्दानें विजयाचें मन त्या विचारांत अधिकच गुंतलें. ' आपलीच शोभाऽऽऽ ' जेवण आटोपल्यावर धुतलेले हात टॉवेलला पुसत तो म्हणाला.

थोड्याच वेळापूर्वीं आपल्या विचारग्रस्त मनाचा वहिनींना मिळालेला पुरावा खोटा ठरविण्याकरितांच वहिनींना मुद्दाम अंगणांत बोलावून गप्पा मारीत विजय बसला होता. प्रेमी मन कांहीं काळ चोरटें असतें खरेंच ! आपल्या प्रेमप्रवाहाचें चिंतन करण्यांत त्याला धन्यता वाटते. मात्र तें दुसऱ्यांना कळून त्यांनीं त्याबद्दल विचारणा करावी याची शक्यतो तें टाळाटाळ करीत असतें ! विजयही हीच सुसंगति खरी ठरवीत होता.

हवेंत किंचित् उष्मा वाटत होता. बागेंतील अर्धोन्मीलित पुष्पकोशांचा सुवास दरवळत होता. दुरून कोठूनतरी दोन आवाज तावातावानें बोलल्या-प्रमाणें ऐकूं येत होते. शंकराच्या देवालयाच्या मंडपांतील कट्टयावर गांवांतील मंडळीं मोठमोठ्यानें गप्पा मारीत होती आणि जवळच्याच रस्त्यावरून अंधारांत काठी आपटीत आपटीत कोणीतरी निघून गेलें !

" फार झोंप येते आहे वहिनी मला ! डोकं भणिभणारसं झालं आहे माझं या कामाच्या गर्दीनें ! खरंच वहिनी, मी अजून लहानच कां नाहीं हो राहिलो ? तुमच्याजवळच एकसारखं रहायला मिळालं असतं. तुमच्या मायेची पांखर मिळाली असती अन् आईप्रमाणें तुमची मायाळू वागणूक—ती मी

विसरणं कधींच शक्य नाहीं! लहानपणाप्रमाणेंच तुमच्या मांडीवर डोकं ठेवून स्वस्थ पडावंसं वाटतं कितींदा मला! कशाची काळजी नाहीं अन् काम नाहीं!"

उशाशींच बसलेल्या वहिनींनीं विजयाचे डोक्यावर हात ठेवीत म्हटलें,

"तुम्हांला कांहींतरी असमाधान वाटतं आहे, असं दिसतं मला!"

"मग काय! तीर्थयात्रेला जाऊं म्हणतां?" दिव्याचा त्रास सहन न होऊन त्यानें तो मालविला.

"तीर्थयात्रा!" वहिनींनीं एक निःश्वास टाकला. "त्या तीर्थयात्रेनेंच ही सर्व भानगड केली. अजयाची अन् तुमच्या आईची ताटातूट केली; तुम्हांला काय आठवणार? दीड दोन वर्षांचे होतां तुम्ही सारे त्या वेळेला! तुमच्यासारखाच हुबेहूब दिसे अजय, भाऊजी काय झालं असेल त्याचं! पण देवाची करणी अन्........! कोणीं सांगावं? अजूनही मजेत वाढत असेल स्वारी."

"झालं तें झालं वहिनी! झाल्या गोष्टी होऊन गेल्या; त्याचा उगीच त्रास कां घेतां आता?"

"तुम्हींच घेतां भाऊजी! करायचा आहे काय तो वर्ग स्वतःच्या प्रकृतीला त्रास होऊन? तुम्हांला देवदयेनें कशाची काळजी नाहीं! तरीही एवढी आटापीट करून सुट्टींतील आनंद हिरावून घेतां मात्र तुम्ही माझ्यापासून!"

"त्या विचारानीं नाहीं मला हा त्रास होत!"

"असं होय?" जें पाहिजे होतें तें मिळालें अशा आविर्भावानें वहिनी म्हणाल्या. "मग हरकत नाही!"

"तुम्ही काय म्हणतां मी नाहीं समजलो!"

"मी समजलें ना पण! काहीं गोष्टी तुम्हीं सांगायच्या नाहींत; अन् त्या तशा तुम्ही सांगत नाहीं म्हणूनच काय त्या आम्ही ओळखायच्या!" मान हालवीत वहिनींनीं उत्तर दिलें;

"पण जपून बरं का! नाहीं तर..."

"बरं, तें जाऊं द्या. मी काय म्हणणार होतों!" आपली सत्यस्थिति वहिनींनीं ओळखली हें जाणूनच विषय बदलण्याच्या हेतूनें विजय कांहींतरी बोलणार, तोंच वकयांच्या फाटकांतून कोणीतरी आंत आलें.

विजयाच्या गप्पा लांबल्या म्हणजे फारच लांबतात म्हणूनच वहिनीच तेथून आंत निघून गेल्या. मात्र आंत जातां जातां त्यांनीं विजयाला बजावलें,

"फार जागूं नका हं! आणखी त्रास करून घ्याल नाहीं तर!"

"विजयदादा! मी आलें आहे," हे उद्गार ऐकून कोण आलें तें पहाण्याकरितां पडल्यापडल्याच कॉटवरूनच विजयानें मान वळविली.

"कोण? राई? आतां रात्रीं? अन् एकटीच?" जरा मोठ्यानेंच विजयानें प्रश्न केला.

"हो!" केस सांवरीत राई उद्गारली. "दादा, लहानपणापासून तूं अन् मी कितीदां एकत्र खेळलं नाहीं? पन् पुढं माझी काय गत झाली तुला माहीतच आहे समदं!"

"हं! गणू त्या रात्रीं घरांतून निघून गेला अन् तेव्हांपासून तूं तुझ्याच घरीं परत येऊन रहाते आहेस होय ना? आमच्या घरचं काम तूं सोडलस, हें वहिनींनीं सांगितलंच मला."

"त्येंच सांगनार हाये मी!"

"बर! बैस ना! इथें बैस! कॉटवर शेजारीं तिला बसवून घेत विजय म्हणाला. त्याच्याजवळ ती निःसंकोचपणें बसली. अर्धेंच लुगडें नेसल्यानें उघडे पडलेले तिचे सावळे पाय मांडवाच्या बाहेरील चांदण्यांत काहीं भागापर्यंत प्रकाशीत होते. बाकी सर्व भाग काळोखांत होता तिच्या शरीराचा.

या वेळेलाच ओट्यालगतच्या रस्त्यावर बाहेर कोणाचीं तरी पावलें वाजल्याचा विजयाला भास झाला. परन्तु गार वाऱ्याच्या आवाजांत त्याच वेळेला रस्त्यानें सपसप् धावत गेलेल्या कुत्र्यांच्या पावलांच्या आवाजाचाच भास आपणांस झाला अशी समजूत होऊन तो स्वस्थ राहिला.

"दादा, तूं एवढं दादल्यानं शिकवलंस! आमच्या घरच्या मंडळींना

बी पढवलंस पन् माझी हालत नाहीं वळखलीस तूं! गणपत गेल्यापासनं मी कसंबसं इथेंच राहिलों चार वर्सं. पन् दुसऱ्याच्या जिवावर झाऊं म्हणून किती दिवस जगायचं? पाट भावायास दादा सांगत व्हता माझा! पर मला तें तवा पटलं नाय! पन् शंकरची माझी वळख झाली अन् आतां इचार मनांत येतु माझ्या! त्येच्याच गिरनींत काम बी देणार हाय तो मला. तेंच विचाराया आलुं ना मी!"

"गिरण! वाटते तितकी सोपी नाहीं गोष्ट ती राई? चांगलं सुखाचं हें गांव सोडून कोठें जाते आहेस तूं? मुंबईला जाऊन काय मिळणार तुला? वाटलं तर मी तुला ठेवतों माझ्या घरीं! थोडं फार काम करावं अन् खुशाल रहावं आनंदांत! शंकर शंकर म्हणते आहेस तूं! पण राई!" तिच्या पाठीवर हात फिरवीत विजय म्हणाला, "मजुरांच्या आयुष्याची दुर्दशा तुला कळणं शक्य नाहीं! सर्व तारुण्य मुंबईस फुकट घालवूं नको तूं. त्यांतून तुझं तूं बघ!"

"शंकर म्हनतो म्हून मी जात्यें! मी ऐकलंय ना कीं मुंबई लई मोठी आहे. पर मी एवढंच विचाराया आलुं, कीं तिथें कांहीं भीति नाहीं ना नोकरी कराया? न्हाइ तर एक करतां तिसरचं व्हायचं! चार पैसं मिळवूं अन् दोघं सुखानं राहूं!"

"माझी काय हरकत आहे? पण वेळ आहे! गरज लागली तर मी उद्यां पत्ता देईन त्यांच्याकडे जा! माझा मित्रच आहे तो! दवा लागला तर तिथेंच जा! अन् हें बघ, जरा कमी जास्त झालं तर मला कळव आणि लागलीच निघून ये! शंकरकरितां तूं जाते आहेस; पण तुझी प्रकृति पहा पहिल्यांदा!"

राई निघून गेल्यावर इतका वेळ घोंघावणारा वाराही कमी झाला.

ओट्यालगत कोणीतरी आल्याचा जो विजयाला भास झाला, तो खरा होता असें धरलें, तर त्या व्यक्तीला वाऱ्याच्या घोंघाव्यात पुढील त्रुटक संवाद ऐकूं आला असता, विजय राई यांच्या सर्व संभाषणापैकीं!

"बैस ना! इथं बैस." विजयाचा आवाज.

जवळचीच व्यक्ति कॉटवरच त्याचेजवळ सरकली असें दिसलें असतें तेथून पहाणाराला.

"...पन् माझी हालत नाहीं वळखलीस!...त्येच विचाराया आलु मी!" विजयाजवळच्या त्या दुसऱ्या व्यक्तीचा आवाज.

"मुंबईला जाऊन काय मिळणार तुला? वाटलं तर मी ठेवतों... थोडें फार काम......अन् खुशाल...आनंदांत!" या ऐकूं आलेल्या संवादावरच, जर मुळांत कोणी ओट्यालगत आलें असलें तर तें गेलें असावें; कारण राई गेल्यावर विजय जो ओट्यापाशीं जातो तों तेथें कोणीच नव्हतें; मात्र समोरच्याच घरांतून, त्याच घरांतील रामभाऊ मोठयानें एकदां खोकले, तें त्यानें ऐकलें!

विजयानें क्षितिजाचे बाजूला पाहिलें. चंद्रकोर क्षितिजावर टेंकली होती. वरील बाजूस तिची प्रभा फांकली होती. त्या करसमुच्चयानें आनंदित होऊनच कीं काय, जवळचेच ढग पटापट त्या ठिकाणीं गोळा झाले. चंद्र त्या ढगांआड झाला अन् काळोख पडला थोडासा! आकाशांत विधात्याच्या रत्नभांडारांतील रत्नांचा तारकापथावर पडलेला खच पाहातच विजयानें निद्रादेवीच्या आधीन आपलें शरीर केलें.

प्रकरण ४ थें

# दोन हृदयांची हुरहूर !

आदल्या दिवशीं ठरलेल्या गांवीं जाऊन आल्यावर तेथील कार्यक्रमाचा विचार करीत विजय पहाटे जो घरांत शिरतो, तों त्याचा मोठा भाऊ—दादा—व्यासपीठाप्रमाणें ओटीवरच तयार केलेल्या आपल्या बैठकीच्या जागेवरच कसल्या तरी कामाचे कागद पहात बसला होता. त्याच्यासमोरच जमिनीवर आपली घोंगडी टाकून त्यांचें एक शेतकरी कूळ बसलें होतें. नम्रतेचा भाव त्याच्या मुद्रेवर होता. दोन्ही हातांत एकेक पांढरें कडें होतें. काळी तुकतुकीत काया लंगोटीशिवाय सर्व उघडीच होती. त्याचें वय पंचेचाळीसच्या साधारण पुढें असावें नि तो बराच जुना खंडकरी होता विजयाकडचा !

विजय घरांत शिरतांच त्याला पाहून तो उभा राहिला. आपल्याविषयीं इतका आदर दाखविणाऱ्या त्या शेतकऱ्याला पाहून विजयानें त्याला बसण्यास सांगितलें आणि म्हटलें—

"कोण ? म्हादबा ? तूं रे केव्हां आलास ?"

"हा आलोंय नव्ह का आतांच ! झाला थोडा वखत."

"विजयदादा ! अर ऽऽऽ ! म्हाताऱ्यासनी इसरलासा व्हय ! हं; मोठं झालंत आतां तुम्ही; न्हाई का ?"

"असं बोलूं नकोस म्हादबा ! लहानपणीं तूं मला खेळवलंस; तुझ्या घरामागील झाडांचीं बोरं खाण्याकरितां दादाची दृष्टि चुकवून उन्हाचा सुद्धां मी येत होतों तें आठवत नाहीं का ? अन् त्या दिवशीं जत्रेला दादा जाऊं नको म्हणाला, तेव्हां तुझ्याच गाडीमागें बसून मी आलों होतों जत्रेला—

तेंही तुला एक दोन मैल जाईपर्यंत न कळवतां–तें विसरलास होय ! शिक्षण घेतलं तरी मी तुला नेहमीं लहानच आहें."

"असं म्हणतां ?" आपल्याविषयींची त्याची सहृदयता पाहून म्हादबाला बरें वाटलें. "बरं दादा ! बऱ्याच दिवसांत तुम्ही आलां नाहीं आमच्या प्रांताला. तवां म्हटलं, येऊन जाच ना यकदां ! तुम्ही आलांत तरच मंग मी म्हनंन, कीं दादा अजून मला लहानच हायेती म्हून !"

"येणारच आहें मी एक दोन दिवसांत ! मग तर झालं !"

"बरं ! येऊं मी ?" म्हादबानें काम संपलेंच असल्यामुळें उठतां उठतांच आदरानें निरोप घेतला विजयाचा.

तो गेल्यावर दादाला विजयानें विचारलें,

"कशाला रे बोलावलं होतंस याला ?"

"त्याची कबुलायत घ्यायची होती ना, नवी करून !"

"अन् खंडाबद्दल वाद घालत होतास कीं काय तूं ? दादा, एक पसा अधिक काय अन् कमी काय, धान्याच्या राशीनं माणसाच्या स्वामिनिष्ठेची किंमत करायची नसते ! यापुढें मला वाटतं आपण आतां त्या विषयांत अगदींच फरक नसला तर कुळांना त्रास देऊं नये !"

"मी त्याबद्दल बोलतच नव्हतों ! फक्त आहे तो तरी कागद नवा करून घ्यायला नको का ? तू लहान आहेस विजय ! तुझ्या साक्षरताप्रसाराला मी कधीं तरी आक्षेप घेतला आहे का ? अरे, हा पैसा आहे म्हणून तर तुला जास्त प्रमाणावर कार्य करतां येतं ! अधिकासाठीं नाडूं नये; पण आहे निदान न्याय्य आहे, तें तरी संभाळून ठेवायला नको का ? मला तें तुझं अपलिफ्ट का काय तें समजत नाहीं बुवा ! पण व्यवहारांत मात्र तूं मला कांहीं सांगूं नको ! आणि एवढं झालं कीं एवढा पैसा कोणाच्या डोक्यावर घालावयाचा आहे ! करीत बैस ना तुझं तें कार्य सबंध जन्मभर !"

**कांहीं कांहीं मनुष्यांच्या आयुष्यांत असा एकदां प्रसंग येतो कीं जो घडल्यानंतर पुष्कळ दिवसांपर्यंत आपली छाप त्या त्या मनुष्यांवर बसवून जातो. क्वचित् एकाच प्रसंगानें अनेकांच्या मनावरही वरील परिणाम एकदम घडून येतो.**

विजय नि शोभना यांच्या बाबतींत असेंच घडलें.

एकमेकांस खिडकीच्या त्या प्रसंगापूर्वी कोणी पाहिलेंही नव्हतें अन् त्या अनपेक्षित भेटीनंतर गेले बरेच दिवस दोघेंही एकमेकांस भेटूं शकलीं नाहींत. पण त्यांची मनें मात्र परस्परांच्या चिंतनांत गर्क झालीं होतीं हें खरें! विचार नि आतुरता यांवरून विशिष्ट आकर्षणापर्यंत आपण पोंचलों आहों, असें दोघांसही वाटत होतें. परंतु आपणांस ज्याच्याविषयीं कांहीं वाटत आहे, तो आपला मित्र त्याच मनःस्थितींत आहे, याची दोघांनाही निश्चिति वाटत नव्हती!

या विचारमग्नतेच्या जोडीला गेले पधरा दिवसपर्यंत उन्हातान्हांत भटकून विजयानें जे मनमुराद श्रम घेतले होते त्यांचीही भर पडली! त्यामुळें आज सायंकाळीं त्याला थोडासा थकवा वाटूं लागला होता. रात्रीं, स्वयंपाकघरांत दुसऱ्या दिवसाच्या स्वयंपाकाची पूर्वतयारी म्हणून व्यवस्था लावणाऱ्या वहिनींशीं गप्पा मारतांना विजयाला फारच कंटाळा आला होता. स्वयंपाकघराच्या खिडकींतून त्यानें पलीकडे मागील परसांत दृष्टि लाविली, तों उन्हाळ्यांतील पालापाचोळा गळून पडल्यानें चित्रळट रंगानेंच विस्तृतपणें पसरलेली घरामागील मोकळी जागा त्याला दिसली. नवपल्लव नटवेपणानें धारण करणारीं झाडें आपल्या सांवल्या सन्निध घेऊन, चांदण्यानें प्रकाशित अशा भूभागावर उभीं होतीं. त्या मानानें ठेंगणी वय, पलिकडील बाजूच्या पांढुरक्या रस्त्याचा दृग्गोचर भाग आक्रमीत होती अन् त्याच्याही मागें असलेलें मोकळें खळें आणि त्यांतील पेंढ्याचा रचलेला ढीग हाही अस्पष्टपणें विजयानें पाहिला.

विजयाचें आणि वहिनींचें संभाषण चालू असतांच दादा तेथें आला.

"काय रे ऽ ऽ! आज तुझा आवाज असा काय बदलला आहे?" दादानें विचारलें.

"बदलला आहे ना? मला वाटतंच आहे! तापबीप आला आहे कीं काय?" असें म्हणून वहिनींनीं विजयाच्या कपाळावर हात लावला नि झटकन् तो मागें घेत त्या म्हणाल्या,

"काय तापलं आहे कपाळ भाऊजी ! उन्हातान्हांतून भटकायचं माझं न ऐकतां ! कुठकुठच्या खड्यावर रहायचं ! तरीच म्हटलं, थंडी वाटते म्हणून काय म्हणत होतां."

"चल ऊठ; दोन दिवस विसावा घेतलास तरी चालेल ! प्रकृति बरी तर सर्व बरं !" दादानेंही दुजोरा दिला.

दुसऱ्या दिवशीं सकाळींच दादा बाहेर गेला होता. कालच्या तापानें बरा बेचैन होऊन विजय ओटीवरच बसला होता. तोंच त्याच्यासमोरच्याच घरांतील रामभाऊ त्यांच्या नेहमींच्या संवयीप्रमाणें चंची सोडीतच विजयाच्या समोर येऊन उभे राहिले. त्याला ताप आला होता कीं नाहीं हें त्यांनीं विचारलें नाहीं. सबंध गांवांत आपला वचक बसविण्याकरितां किंवा तसें भासवण्याकरितां—नि हा परिणाम किंचितसा कुणबीलोकांवरच होत असे—मागें एकदां एका चोरीची संधि साधून त्यांनीं इनामगांवच्या कांहीं कुळांना पोलीसांकडून मारविलें होतें. गांवच्या कांहीं चहाड्या इकडून तिकडे सांगून आपला सल्ला म्हणून दोन्ही बाजूत लावलेलें भांडण मिटवावें नि तसें करतांना दोन्हीकडून कांहीं मोबदला लाटावा, हा त्यांचा शिरस्ताच असे ! त्यांचे घारे डोळे, ते रागावले म्हणजे किंचित् विस्फारित होत ! विजयाच्या चळवळीमुळें कुळांच्या नांवावर एखाद्या पंचाबद्दल दुप्पट किंमत ते आतां काढूं शकत नव्हते किंवा कुळांची मजूरी लबाडीनें काढू शकत नव्हते. कबुलायतीच्या वेळीं तर खोट्या खंडावर अंगठा घेण्यांत ते तरबेज होते. त्या बाबतींतही त्यांना पायबंद बसला होता आतां !

शोभेनला लिहिलेलें पत्र विजय बंद करीत असतांच ते आले नि म्हणाले—
'विजय !"

त्यांना पाहतांच त्यांच्याविषयींचा तिरस्कार दाखविण्याकरितां विजय कांहींच बोलला नाहीं. त्यामुळें चिडून जाऊन रामभाऊ जोरानेंच म्हणाले,

"काय चालवलं आहेस तूं ? अं ? अरे, अलिकडे जरा घरीं कामाला बोलावलं तरी आमचा झिपऱ्या तें नाकारतो ! खंडाशिवाय जास्त एखादं फळही तो देत नाहीं. डांगर म्हणजे वास्तविक आमचा वार्षिक हक्क ! पण असे मगरूर झाले आहेत लेकाचे, अन् याला कारण तूं !"

हें ऐकून मात्र विजयाचें चित्त खवळलें !

" रामभाऊ, तुम्हांला असं कांहीं बोलायचं असेल तर एकदम घराबाहेर चालतं व्हावं लागेल. न्याय्य असेल त्यापेक्षां अधिक तुम्हांला कांहीं मिळत होतं तें बंद झालं तर त्यांत तुमचं काय गेलं ? पिढयान् पिढया टांचेखालीं दाबून टाकलेला तुमचा शिपन्या, त्याला तें समजूं लागतांच बंड करून उठला तर तें चांगलं झालं असंच मला वाटतं ! इतकंच काय, पण या उप्पर कुठचीच लबाडी तुम्हाला साधायची नाहीं कुळांच्या बाबतींत. "

" साधायची नाहीं ! म्हणजे मी लबाडी करीत होतों असंच तुला म्हणायचं कीं काय ? "

" मी कशाला म्हणतो आहे ? तोच स्वतः सांगेल तसं तुमच्या तोंडावर ! "

" पण अशानं खंडापेक्षा अधिक मिळणारी आमची वहिवाटीची मिळकत बुडते ती ? तो आमचा हक्क आहे आज इतक्या वर्षांचा !

" मिळकत ! तुम्हाला लुबाडलेली दौलत पाहिजे आहे रामभाऊ ! मला त्यांचीं हृदयं हवीं आहेत; आणि तीं मिळविण्याकरितां माझं कार्य थांबणार नाहींच पण तें दुप्पट जोरानें सुरू होणार आहे; कारण, त्याचा अपेक्षित परिणामच होतो आहे, हें उघडच दिसतं आहे मला ! "

" हरकत नाहीं ! या वर्षापासून काढूनच टाकतो लेकाला. बैस म्हणावं बोंबलत ! "

" त्याला काढून टाकतां ? सुदैवानें असले हजार शिपंर जन्मभर पोस ण्याचं सामर्थ्य आहे माझ्यांत रामभाऊ ! तुमच्या चार बिघ्यांच्या जमिनीचे एवढे थेर ! माझ्या घराभोंवतालचें अंगण होईल चार बिघ्याचं ! या धमकावणीनें तो दबेल असं तुम्हांला वाटत असेल तर तें चूक आहे ! "

" तें मला कांहीं समजत नाहीं ! परन्तु तुम्हीं आपले उद्योग यापुढें थांबविले पाहिजेत. नाहीं तर– " उठून जातां जातां रामभाऊ मिस्किलपणें हसले. " इतके दिवस वाट पाहिली; पण आतां मी थांबणार नाहीं. तुमचे हे दरिद्री उपद्व्याप—"

' तोंड आवरा रामभाऊ ! चला, चालते व्हा इथून ! होतां कीं

नाहीं ? " त्यांच्याजवळ धांवत जाऊन विजय रागानें ओरडला. तें पाहून रामभाऊ दारापर्यंत पळाले. परन्तु जातांना ते म्हणाले,

" पण माझ्याशीं गांठ आहे, विजय ! तुझी सगळीकडे बेअब्रू करीन ! त्या रात्रीची राईबरोबरची तुझी—बरं आहे ! आतां कशाला बोलतों आहे ! परन्तु वेळ आली कीं मीही पाहून घेईन ! "

यावर विजय त्यांना कांहीं विचारणार तत्पूर्वीच ते घरीं निघून गेले. " राई ? " विजयला त्यांतलें कांहींच कळेना !

\+ + +

आपलें टपाल नानांनीं घ्यावें, इतकेंच नव्हे तर त्यातील बंद पाकीट फोडून आंतील वृत्तांत वाचीपर्यंत तें त्यांच्या ध्यानांतही येऊं नये, याचें शोभनेला वैषम्यच वाटलें. त्यामुळें नानांनी आतां सुधीरकरवीं हांक मारतांच लागलीच ती पुढें आली. ती त्या वैषम्यातच !

" शुभा, हें पहा बुवा ! तुझं पाकीट आलं आहे एक ! अन् तें मी तुझं नांव न पहातांच, माझं म्हणून फोडलंसुद्धां ! " झाली ती गोष्ट अप्रशस्त झाली असें दर्शवीत नाना म्हणाले.

" अं ! त्यांत काय झालं ? " शोभनेनें म्हटलें.

" कांहीं नाहीं ना ? मग विचारू कां ? यांतील मजकुरासंबंधींच आहे तें. "

दोन्ही भुवयांची आतील टोकें एक आंठी घालीत चाळविलीं तिनें, नि मंदस्मित करीत साहजिकता दाखवीत तिनें त्यांच्या प्रश्नास होकार दिला. पण नानाच पुढें म्हणाले— " नको ! तुझं चालळं आहे तेंच ठीक आहे ! शेवटचं ठरलं म्हणजे मात्र मला विचारायला पाहिजे हं ! इनामगांवचं पत्र आहे; म्हणजे आमच्या रामभाऊंच्याच गांवचं कीं ! "

नाना काय म्हणाले, त्याचा उलगडा न झाल्यामुळें शोभनेनें तें पाकीट उत्सुकतेनें घेतलें. आपल्या खोलींत जाऊन नानांनीं फोडलेल्या पाकीटावरील Redirected हीं अक्षरें वाचलीं; तें पाकीट एकदां उलट सुलट केलें अन् पुण्याचें आहे तर ! " असें स्वतःशींच पुटपुटली ती ! पाकीटांतील कागद तिनें बाहेर काढला; तसें करतांना खिडकींतून बाहेर पाहिलें; एकदां

खिडकींतच आपला पाय उंच करून ठेवला, नि डाव्या हातानें पातळाचा काष्टा पत्र वाचतां वाचतां उगिचच चाळविला. पत्राखालील 'विजय' हीं अक्षरें पाहून कांहींच बोध होईना तिला! ती पत्र वाचू लागली—

" प्रिय शोभना,

शेवटीं तुम्ही म्हटलंत तसंच झालं! मात्र त्याचं कारण, तुम्ही म्हणालांत तें नसून, रात्रीच्याच गाडीनें एका निकडीच्या कामाकरितां मला लागलीच मुंबईस जावं लागलं हेंच होय! तुमच्या इच्छेप्रमाणे मला येतां आलं नाहीं याबद्दल तुमची क्षमा मागायची आहे मला! आता, तुम्हांला भेटण्याची इच्छाच असेल—फार काय! मलाच ती आहे म्हणा ना!—तर पुण्यास जूनमध्यें येईन तेव्हां पाहूं! आपला दोघांचा परिचय झाला, तर त्यांत मलाही आनंदच होईल."

पत्र संपतांच तें विशेष लांब नव्हतें याचेंच वास्तविक तिला वाईट वाटलें. आतां तिला नानांच्या बोलण्याचा निष्कर्ष कळला. परंतु त्याच्याविषयीं पुन्हा बोलण्याचा नानांना तिनें संधीच दिली नाहीं; पत्र पुन्हा पाकिटांत घालून टेबलाच्या खणांत ठेवतांना इलस्ट्रेटेड विक्लीच्या आदल्याच दिवशींच्या अंकातील कापून ठेवलेला विजयाचा फोटो पॅडवरच दिसला तिला! त्या चित्रावर लिहिलें होतें—"Once more a champion of the recent swimming competitions in Bombay." त्याच्याच खालीं नाव होतें विजयाचें; तें वाचून ती उद्गारली, " विजय पटवर्धन!" गेल्या सबंध मुद्दीभर धीटपणाच्या किंवा फाजील शिष्टपणाच्या दडपणानें म्हणा, आपण त्या दिवशीं विजयाला त्याचें नांव विचारलें नाहीं, याबद्दल ती स्वतःला दोष देत आली होती. त्यामुळें आदल्याच दिवशीं तें त्याचें नांव कळतांच, तिला विशेष आनंद झाला होता.

त्याची आकर्षक मूर्ति तिच्यापुढें उभी राहिली.

त्याची बुद्धिमत्ता दर्शविणारें त्याचें विशाल कपाळ, सरळ तरतरीत नाक, काळेभोर नि मऊ केस अन् दृष्टींतील एक प्रकारचा करारीपणा

तिला आठवला ! त्याची रुंद छाती त्याच्या पराक्रमाची साक्ष देत होती. त्याचें त्या दिवशींचें विनोदप्रचुर अन् खेळकर बोलणेंही तिला आठवलें. " असं ! स्वारी बरीच चळवळी दिसते आहे ! पोहण्यांतही प्रवीण्य आहे काय ? " तिच्या मनांत विचार आला. त्याच्याविषयीं तिला वाटणारा आदर वृद्धिंगत झाला. सकाळच्या या पत्रानें तिला एक अननुभूत आनंद होत होता अन् त्या आनंदांतच ती रात्रीं बिछान्यावर अंग टाकीपर्यंत मग्न होती.

" पोहायला होय ? मला नाहीं बाई येत पोहायला ! " ती लाडीकपणें म्हणाली.

" अहो, उतरून तर पहा ! म्हणजे कळेल काय मजा असते ती ! "

" छे बाई ! पोहायला आल्याशिवाय पाण्यांत उतरणार नाहीं मी ! "

त्यावर विजय हंसला. तें पाहून तीच पुढें म्हणाली, " काय हो ! खडकीला आपण पहिल्यांदा भेटलों होतों त्या वेळेला वाटलं होतं तुम्हांला, एवढा आपला परिचय वाढेल म्हणून ? "

" हें पहा ! तुम्हांला अवांतर गप्पा मारायच्या आहेत कीं पोहायला शिकायचं आहे ? "

" माझं उत्तर मघाचंच आहे ! "

" बरं मग उतरूंच नका ! एकदम उडी मारा म्हणजे झालं ! " असें म्हणून पाण्यांतच पायानें चालतांना बद्बद् आवाज करीत, विजय शोभनेकडे चालत आला. पटकन् कांठावरून दूर जाण्याकरितां वळलेल्या शोभनेचा हात त्यानें पकडला अन् तिचा नकार न ऐकतां 'आतां कशा हो निसटाल ?' असें म्हणत खसकन् ओढलें सुद्धां तिला त्यानें पाण्यांत ! धबकन् आवाज झाला. थोडीशी लाट उसळली. पाणी उसळून नाकातोंडांत गेल्यानें थोडेंसें गुदमरल्यासारखें झालें तिला......

आणि शोभना अंथरुणावरच जागी झाली. अजूनही ती थोडीशी घाबरलेली होती. मात्र एकीकडे स्वप्नांत सर्व घडलें हें पाहून तिचें घाबरलेलें मन स्थिरस्थावर झालें होतें, तर दुसरीकडे विजयाची मूर्ति नाहींशी झाली

म्हणून वाईटहि वाटत होतें तिला. आकस्मिक जाग आल्यामुळें सकाळचं विजयाचें पत्र नि छायाचित्रही तिला आठवलें.

घड्याळाची टिकूटिक् चालू होती. तिची कॉट कर्कर् वाजली अन समोरील भिंतीवरील बाहेरच्या अंधुक चंद्रप्रकाशांतील झाडांची छाय विचलीत झाली. स्वप्नातील विजयाच्या मूर्तीच्या गोड चिंतनात ती परत झोंपी गेली.

अशाच कित्येक रात्री नेरलला सुट्टी संपेपर्यंत तिनें घालविल्या !

नेरळला शोभनेचे वडील नाना न भाऊ सुधीर हीच काय ती त्यांच्या घरांतील मंडळी ! त्याचें तें स्वतःचें घर होतें. जवळच असणाऱ्या माथेरानसारख्या थंड हवेच्या प्रसिद्ध ठिकाणामुळें नानांचे स्नेही बहुधा एखादा दिवस त्यांच्याकडे राहूनच माथेरानला जात ! नाना जरी फार शिकलेले नव्हते, तरी जरूरीपुरतें इंग्रजी त्यानीं आत्मसात् केलें होतें. उगीच जुन्या समजुतींला चिकटून न राहणारे, नीतिअनीतीची विचकट तत्त्वें, जीं पूर्ण विचारांतीही त्याज्य वाटतात तीं न पाळणारे, ते एक चाळिशीच्या आसपासचे गृहस्थ होते.

इतके दिवसपर्यंत लवकर उठून फुलें खुडून आणण्याचा नानांचा क्रम असे. परन्तु तरीही अजून त्यांची फुलाची हौस कायम होती. फुलें आणि मुलें यांचा आनंद चिरंतन असतो असें ते नेहमीं म्हणत ! पुष्पांजलीच्या आनंदानें मग नानांना गतकालच्या गोष्टींची आठवण होई. सुखाच्या त्या स्मृति नि दुःखाच्या त्या गतगोष्टी परत एकदां अनुभवतांना आपला भूतकालच त्यांना जवळ आल्यासारखा भासे ! अंगणाच्या उजव्या टोंकासच एक जुनें चिंचेचें झाड होतें. त्यावरील कावळ्याचें घरटेंही जुनं होतें. त्यातील शैशवावस्थेमुळें थोडातरी मृदु असणारा तो काकध्वनि ऐकतांच, काहीं काळानें त्या पक्षाच्या आकाशांतील भरारीची नानांना आठवण होई. मग आपला सुधीर नि आपली शोभनाही अशींच कांहीं काळानें स्वतःच्या स्वच्छंदपणाच्या जगांतील वावरांत मग्न होऊन आपणांस सोडून जाणार नाहींत ना, अशी शंका त्यांच्या मनाला चाटून जाई चटकन् !

सुट्टी संपल्यामुळें दुसऱ्याच दिवशीं नेरळ सोडायचें असल्यामुळें तेथील शेवटच्या रात्रीं शोभनेला कसेंसेंच वाटलें. दोन तीन दिवसांत होणारा पुण्याचा प्रवास, तेथें संभाव्य वाटणारी विजयाची भेट, नवीन कॉलेजमैत्रिणींच्या घोळक्यांतील गप्पाविनोद, नवीनच सुरू होणाऱ्या वर्गांतील प्रोफेसर, आणि नवीनच कॉलेजविश्वांत वावरणाऱ्या विद्यार्थ्यांची चुकलेल्या हरणांसारखी वागणुक, एक ना दोन–सर्व गोष्टी तिच्या पुढून नाचत गेल्या.

नानांची ताटातूट तिला दुखवीत होती. आयुष्याच्या मार्गावर मातेला मुकलेल्या जीवाला प्रेमळ पित्याशिवाय कोणती प्रिय गोष्ट असूं शकते! सहा सहा महिने मातापितरांना टाकून दूर गेलेल्या मनाला त्यांची आठवणही थोडेंफार सुख देते, तेथें आपल्या वडिलांनीं जातांना वरचेवर बजावून बजावून सांगितलें कीं, "बाळ जपून रहा बरं? अभ्यास नीट करीत जा! प्रकृतीला जपत जा!" तर शोभनेसारख्या भावनाशील मुलीला "इतके प्रेमळ आहेत आपले नाना!" असें वाटून आनंदानें अश्रू ढाळावयाला लागले तर नवल नाहीं! गतकालची स्मृति जीवंत काव्यच होतें शोभनेला. परन्तु काव्य आनंद देतें तसे करुणप्रसंगही त्यांत वर्णिलेले असतात ना कांहीं वेळां?

लहान होती तेव्हां ती. सुधीरला बरोबर घेऊन तिची आत्या पलीकडील खोलीत गेली. कांहीं वेळानें पांढऱ्या टापश्या बांधलेली मंडळी आली. या त्यांच्या त्या पागोट्यांचें अमंगलत्व बालहृदयाच्या शोभनेच्या ध्यानांत आलें नाहीं. त्या मनुष्यांतील वातावरणावरूनही गांभीर्याचा पूर्ण अभावच दिसला तिला! कोणीं विडी पेटविली, कोणीं "अरे आणा लवकर" म्हणून दंगल उठविली, कोणीं एखादी अश्लील कोटी करून हंशा पिकविला. नि एकानें तर कसल्यातरी गाण्याची लकेर मारण्यासही कमी केलें नाहीं. परन्तु जेव्हां लालभडक मळवट नि पिवळें लुगडें नेसविलेली अशी तिची आई दोघांनीं उचलून बाहेर आणली, तिला करकचून बांधली, नि शेवटीं जेव्हां तशीच उचललीही, तेव्हां आत्याबरोबरच शोभनाही मोठ्यानें रडूं लागली.

पुढील दोन चार दिवसपर्यंत क्षणोक्षणीं लहान सुधीर जेव्हां जेव्हां विचारी, 'आई कुठें ग आत्या?' तेव्हां आत्या उत्तर देई, 'देवाकडे गेली बरं बाळ!' लहानपणचा हा सर्व चित्रपट तिच्या मनश्चक्षूसमोर उभा राहिला. नेरळ सोडण्याच्या आदले दिवशीं सुधीरनें विचारिलें तिला,

"ताई, तूं पुण्यास जाणार ना?"

"हो!" त्याच्या पाठीवरून हात फिरवीत शोभनेनें उत्तर दिलें.

"मी पण पुढच्या वर्षी पुण्याला येणार आहें!"

"अहं! मग नातांना कोण सोबत इथें?"

"नानांच म्हणाले ना, त्या दिवशीं!"

"ते पुष्कळ म्हणतील पण—बरं जाऊं दे." अधिक थट्टा करून त्याला खट्टू करण्यास ती तयार नव्हती." "हा तुला खाऊला!" असें म्हणून एक रुपया तिनें त्याच्या हातांत दिला.

"हं, हा शेवटचा खाऊ बरं का ताई! यंदां चवथी पास झालों कीं पुढील वर्षी पुण्यास येणार मीं!" सुधीरनें रुपया दाखवीत म्हटलें. शेवटचाच तसका खाऊ!!

प्रकरण ५ वें

# क्रान्तिकारकाची प्रेमदेवता

नांव—सांगायला पाहिजे का?

येण्याचें कारण—ओळख पाहूं!

दिनांक...............

उन्नतिमण्डळाच्या नुकत्याच लागलेल्या नव्या शिपायानें दिलेल्या चिठीवर वरील नोंद वाचून शकुन्तलेला विस्मय वाटला.

"कोणाला द्यायला सांगितली आहे?" भुवयांची विचित्र हालचाल करून तिनें विचारिलें.

"जी बाईसाहेब! तुमास्नीच! शकुन्तला आपटे म्हणताहेत ते! तुमचं नांव मी चुकेन व्हय!"

शिपायानें परत एकदां तीच वस्तुस्थिति उघड केली. त्यामुळें जवळच्याच मुलाच्या हातांतील शिवणाची सुई घेऊन, आपल्या हातांतील सर्व शिवण-कामाचें साहित्य उंचावर नीट ठेवीत शकुन्तला उठून बाहेर जावयास निघाली.

"मला द्या ना तें!" तिचें पातळ ओढून धरीत त्या मुलानें म्हटलें.

"देतें हं! मी जरा बाहेर जाऊन येतें नि मग देतें अं!" अशी त्याची गोड समजूत करीत शकुन्तलेनें आपली सुटका करून घेतली.

बाहेर जातां जातां दाराजवळच तिचें पातळ तिच्या पायांत अडकलें. तें काढण्याकरितां तिनें पाय जरा बाजूला काढून दोनदा टाकला नि पातळ पुन्हां एकदां चापूनचोपून नीट बसविलें. बाहेर आपल्याला कोण बोलावतें आहे, ह्याची तीव्र उत्कंठा लागल्यामुळेंच कीं काय, दृष्टि दाराकडेच लागली होती तिची.

कोणी तिऱ्हाईत आलें असेल या समजुतीनें शकुन्तला प्रथम जपूनच बाहेर आली; पण बाहेरील व्यक्ति दुसरी कोणी नसून अजयच आहे हें कळतांच तितक्याच मोकळेपणानें ती हंसलीही! तिची नासिका नेहमींप्रमाणें जरा सन्नत होऊन पसरली किंचित्. लालसर ओठांची मजेदार चाळवाचाळव झाली नि तिचे स्फटिकासारखे स्वच्छ दांत चमकले! जणूं कांहीं जास्वंदीच्या टवटवीत ताज्या फुलाच्या लाल पाकळ्याच विलग झाल्या नि त्यांतील शुभ्र दंवबिंदुच चमकले ओळीनें!

हातातील चिठीकडे खालीं एकदां पाहून परत तिनें अजयाकडे पाहिलें.

"कोण पाहिजे आहे आपल्याला?"

"तुम्हीच!"

"पण आता या वेळेस मला मुळींच सवड नाहीं." गंभीर मुद्रा करून ती म्हणाली, "परत या केव्हा तरी!"

"असं म्हणता?" एखाद्या बड्या गृहस्थाच्या भेटीची आपणांस निकड असावी परन्तु त्याला भेटायला जाताच त्यानें तें नाकारावें म्हणजे आपण करतों तसला भाव दाखवीत अजयानें उत्तर दिलें.

त्याच्याकडे क्षणभर पाहून शकुन्तलाच मग म्हणाली,

"समजलं ना?"

"हो हो! समजलं बरं मॅडम!" असें म्हणून हंसतमुखानेंच तिच्या या लटक्या आविर्भावाचें कौतुक करीत मंडळाच्या मुख्य कचेरींत अजय शिरला. त्याच्या मागोमाग तितक्याच समाधानानें शकुन्तलाही जाऊन बसली आपल्या नेहमींच्या खुर्चीवर.

तीं दोघे खोलींत शिरताच स्प्रिंगचें दार फटकन् लोटलें गेलें.

खुर्चीवर बसता बसता त्याने काचा खोवलेल्या धोतराचा मागील बाजूचा सुटा भाग सावरल्यासारखा केला, टेबलावरील पेपरवेट हाताने चाळविलें नि त्याच्या खाडची फाईल उघडून सहज दिसलेला एक कागद पाहिला त्यानें! तो वाचूं लागला—

"भगिनींनो,

वर्षारम्भाचा आजचा पाडव्याचा दिवस. नव्या वर्षाकरितां नवा निश्चय करायचा सुप्रसंग! उन्नतिमंडळाच्या ध्येयाला पोषक असा कोणता निश्चय आपण करणार आज?

स्वदेशीचा प्रसार आणि स्वदेशीच वस्तू वापरा फक्त आपल्या घरांत! आपल्या मुलांना लहानपणापासून हा धडा शिकवा.

म्हणजे उन्नतिमंडळाच्या सभासदाचें प्राथमिक कर्तव्य तुम्ही केलं! कारण, राष्ट्रमातेचा उद्धार राष्ट्रपुरुषांच्या हातीं आहे आणि राष्ट्रपुरुषांची निर्मिती——

ती, भगिनींनो, तुमच्या हातीं आहे.

शकुन्तला आपटे

अध्यक्ष, उ. मं., विकासपूर."

चैत्रपाडव्याच्या दिवशीं निघालेलं तें पत्रक अजय वाचीत होता. तोंच शकुन्तलेचा हुंकार त्याला ऐकूं आला.

"मामांची प्रकृति कशी काय आहे?" तिनें विचारलें.

"प्रकृति ठीक आहे! पण ताकद कमी होत चालली आहे; पंधरा पौंड वजन घटलं आहे गेल्या महिन्यांत."

"अजय? तुम्ही काहीं म्हणा! परंतु मामांचं लक्षण भीतिदायक वाटतं आहे मला."

"हं. चालायचंच!" निराशेचा एक उद्गार काढून अजयानं उत्तर दिलें.

"अगबाई! खरंच विसरतच होतें मी;" असें म्हणून शकुन्तला उठली. टेबलावरील लाकडाची पेटी तिनें उघडली, कांहीं कागद चाळविले नि शेवटीं 'सांपडलें' अशा अर्थी 'हं' म्हणून तिनें एक कागद बाहेर काढला. त्यांतील मजकुर वाचीत वाचीत अजयाच्या खुर्चीपर्यंत ती चालत गेली. नि त्यांत काय महत्त्वाचें आहे तें न समजल्यामुळें गोंधळांतच तिकडे पाहाणाऱ्या अजयाकडे तिनें पाहिलें.

"हे कळलं नाहीं तुम्हांला अजून! नाहीं का!"

" पुण्याच्या कॉलेजमधून आलं आहे हें ! त्यांच्या मंडळाच्या उद्घाटन-प्रसंगीं मी भाषणाकरितां पुण्यास यावं असं म्हणणं आहे त्यांचं ! "

" केव्हां आहे तें ? "

" ऑगस्टमध्यें. २७ तारखेला. "

" अं ! अजून अवकाश आहे त्याला. आज सारी २० तारीख आहे जुलैची; एकूण तुमच्या मंडळानें बरीच प्रसिद्धि मिळविलेली दिसते आहे शकू ! "

परत येऊन आपल्या खुर्चीवर बसतां बसतां शकुन्तलेनें वळून बाहेर पाहिलें नि मग डावी भुंवई चढवून किंचित् तिरप्या नजरेनें पाहाण्याच्या आपल्या नेहमींच्या पद्धतीनें अजयाकडे एक कटाक्ष टाकीत ती म्हणाली—

" याचं श्रेय तुम्हांला आहे अजय. या कार्याची स्फूर्ति तुम्हींच दिली ना मला ! आठवतं आहे ना ! पांचवींत तुमची अन् माझी ओळख झाली. दोघंही मॅट्रिक झालों आपण नि मग कॉलेजांतील एक वर्षाचा अनुभव घेऊन हें कार्य हातीं घेतलं मी ! तें वाक्य आहे अजून माझ्या दैनंदिनींत. काय म्हटलं होतं तुम्हीं ? " असें म्हणून कपाळावर आठ्या घालीत थोडा वेळ शकुन्तलेनें आठवल्यासारखें केलें. " हं " तिनें टाळी वाजविली, " Life is duty ! आयुष्य ही कर्मभूमि आहे." खरंच अजय, किती क्रांति केलीत तुम्ही माझ्या जीवनांत ! हुशार वकिलाची एकुलती एक मुलगी म्हणून फार तर एखाद्या श्रीमंत नि खुशालचेंडू मनुष्याशीं लग्न लावून मुलांबाळांसह संसार करीत बसलें असतें मी ! पण हा अधिक भव्य संसार, आपल्या समाजाचा संसार, तो विस्कळित होत आहे त्याची काय वाट ! अंशतः तरी तो व्यवस्थित ठेवण्याकरितां यत्न केल्याचं श्रेय मिळेल मला ! "

" शकू, तो मंत्र माझा नाहीं आणि नव्हताही ! आनंदस्वामींची ती शिकवण. मॅट्रिक झाल्यावर कॉलेजमध्यें जाण्याची गोष्ट मी काढली, तेव्हां ते म्हणाले, " अजया तुझं मॅट्रिकमधील यश चांगलं आहे. कदाचित् तूं कॉलेजमध्येंही शिष्यवृत्ति मिळवून बी. ए. होशील. पण निरुपयोगी शिक्षणाचा पदवीधर बनून काय उपयोग ? कॉलेजमधील मजेचं वातावरण तूं उप-

भोगशील. शेवटीं आपली दिशा चुकली हें कळेल तुला नि वाटेल कीं, अरेरे ! याच चार वर्षांत कितीतरी हिताचं कार्य झालं असतं बाहेर. त्या वेळच्या त्यांच्या ओळी आहेत त्याः—

" I dreamt and saw life was beauty,
I woke and found that life is duty "—

कुठल्या तरी आंग्ल कवीच्या काव्यांतील आहेत त्या ओळी ! "

" हो म्हणून लिहू ना पुण्याच्या या आमंत्रणाचं उत्तर मग ? "

" अर्थात् ! विचारायचं काय त्यांत ! "

" तसं नाहीं ! प्रत्येक गोष्ट तुमचा सल्ला घेऊन केली कीं बरं वाटतं बाई मला ! तुमचं उत्तर माहीत असूनही मी तसं केल्याशिवाय रहात नाहीं ! इतक्या दिवसाची सवय लागलेली आहे ना मला ? "

" वा ! " जाण्याच्या तयारीनें टोपी उचलून अजयनें तिच्याजवळ तोंड नेलें. उद्यां लग्नाच्या वेळेलाही मलाच विचारशील — " तुमची सम्मति आहे ना मला ? "

या बोलण्यावर, शकुन्तला नेहमीप्रमाणेंच " इश्श, कांहींतरीच " म्हणून तो विषय टाळील किंवा खरें म्हणजे टाळण्याचा आव आणील असें वाटलें होतें अजयला. परन्तु " त्याला तुमची सम्मति लागणारच आहे नाहीं तरी " ; असें उत्तर देत त्याच्याच मागोमाग शकुन्तला बाहेर पडली नि त्याची ती अपेक्षा फोल ठरली.

" आरोग्यसप्ताह सुरू आहे उद्यांपासून. " शकुन्तलेचें बोलणें त्याला ऐकूं आलें.

" चांगलं आहे ! कार्यक्रमाची झोड उठवा म्हटलं ! " असें म्हणत त्यानें तिचा निरोप घेतला.

अजय निघून गेला तरी कितीतरी वेळ ती त्या वाटेकडे शून्य दृष्टीनें पहात होती. आपण तशा स्थितींत उभ्या आहों, तिकडे जवळच्या शिपायाचेंही लक्ष आहे हें तिच्या लक्षांत आलें तेव्हां डाव्या पायाच्या टांचेवर ती गर्रकन् दुसऱ्या बाजूस वळली व झटकन् परत आंत निघून गेली.

त्याच दिवशीं दुपारीं पर्णकुटीच्या आंवरीत आसन टाकून स्वामी बसले होते. त्यांच्या किंचित् अशक्त शरीरयष्टीकडे पाहून अजयला वाईट वाटलें. त्यांतूनही त्यांच्या आजच्या बोलण्यांत त्यांची नेहमींची रहस्यमय वाचा किंचित् खुलेपणानें ओसंडत होती.

" माझा हेतु पूर्ण करणार ना जय तूं ? कधीं डाव साधणार ? " त्यानीं विचारलें. तें त्यांचें बोलणें नेहमीप्रमाणेंच आहे असें समजून अजय स्वस्थ बसला. तेव्हां स्वामीच पुढें म्हणाले,

" ती शिकार ! अरण्यात नाहीं जया ! विकासपुरात आहे ! मात्र जपून ! ती साधली पाहिजे निर्जन वातावरणांत ! त्यात कदाचित् जीवितालाही धोका आहे तुझ्या ? "

" माझ्या ? "

" हो ! सांपडलास तर ! कौशल्यानें कार्य साधलं तर कुणाचीच भीति नाहीं ! "

" कोणावर रोख आहे तुमचा ? "

" ग्लीसन्वर ! वाटतं कीं असंच जावं अन् त्या चांडाळाच्या "—असें म्हणून स्वामी एवढया आवेशानें उठले कीं, जणूं काहीं समोरच उभा होता तो त्यांच्या, नि त्याच्यावर ते चाल करून जात होते ! भावनाविवशतेचा प्रभाव होता तो !

" हं ! हं ! मामा काय हे ? " अजय त्यांना सांवरीत म्हणाला.

" आत्यंतिक दुःखाचा, सूडाच्या लालसेचा परिणाम ! सिंहाची भूक नुसत्या विचारानें शांत होत नसते. "

"हो; पण भावनेच्या भरांत तो जाळ्यांतही अडकावयाचा एखादवेळेस. "

" गुदमरलेल्या निष्क्रीयतेच्या वातावरणांतील जीवनापेक्षां जाळयांत अडकून मरण काय वाईट ? "

" तें मरण स्वाभिमानाचं असलं तरी योग्य वेळीं नसतं ! अकालीं आत्मार्पण केल्यानं हौतात्म्य दूर पळत असतं ! "

" हं आणि म्हणूनच अजन तला थांबलं पाहिजे ! "

ते ओसरीच्या ओट्यावर बसले होते. त्यांच्या दोन्ही हाताच्या दंडाना धरून अजय त्यांना खाली बसवीत होता. जणू कांहीं असें करण्यांत त्याचें मनच तो स्थिरस्थावर करीत होता !

बाहेर पहातांच अजयाला विचित्र दृश्य दिसलें.

वावटळीच्या वर्तुलाकार संचारानें झाडांचीं सुकलेलीं पानं, पालापाचोळा नि धुराळा तशाच गतीनें फिरत होता. शीघ्रगतीनें तो वावटळ आश्रमाभोंवतींच्या पटांगणांतून फिरत मरॅकन् आश्रमाच्या प्रवेशद्वाराच्या पुढ्यात आली. वाटोळया हवेचा उंचच उंच एक स्तंभ निर्माण झाला ! त्या फिरत्या हवेंतच एक गुराख्याचे लहान पोर टाळया वाजवून नाचत गरगर फिरत होतें नि त्याला आपल्याकडे बोलावीत डोळयांत गेलेल्या धुराळयामुळें डोळे चोळणारा त्याचा बाप समोर उभा होता. तर्कांच्या वावटळींत अजयाचें मनही तसेच फिरत होतें. स्वामींचे समाधान होण्याचा एक मार्ग दिसला म्हणून तें थोडें आनंदांत होतें तर कार्यसिद्धीच्या शक्याशक्यतेविषयींच्या विचारानें तें त्रस्त झालें होतें ! आयुष्यांतील रम्य जीवनाचा मार्ग सोडून हालअपेष्टानीं भरलेला अधिक खडतर मार्ग आचरायचा होता अजयला !

विचारग्रस्त मनाला विश्रांति मिळावी म्हणून ओढ्याच्या कांठानें तो एखाद् मैल फिरण्यास गेला.

एका दगडावर त्यानें आसन ठोकलें !

समोरच सृष्टीचा संगीत संचार पसरला होता. रानफुलांचा रंगीत ताफा सर्वत्र डोकावत होता. हिरव्या गार वनलता आनंदानें डुलत होत्या. प्रेमळ मनुष्याच्या हृदयाप्रमाणेंच जवळील ओढा उचंबळून येत होता.

निसर्गाच्या त्या रमणीय दृश्यांत अजयला कांहींच मन गुंगविणार वाटेना ! त्या ओढ्याच्या डोहांतील पाण्याच्या खळखळीची कटकट वाटली त्याला ! पुष्पसमुहाचे रंग मोहक असतांही, त्या वेळेस भडक वाटले त्याला ! त्या वनलतांचा हिंदोळाही कंटाळवाणाच वाटला त्याला ! स्वामींच्या आज्ञाप्रमाणें व्यायामशिक्षणाचा वगैरे विधायक कार्यक्रम त्यानें

आचरिला होता; परन्तु आतांच्या स्वामींच्या बोलण्यामुळें गुप्त कटांतही आपल्याला भाग घ्यावा लागणार असें त्याच्या मनाला वाटूं लागलें. सकाळींच झालेली शकुन्तलेची भेट त्याला आठवली.

प्रेमपाश एकीकडे त्याला ओढीत होते नि स्वामींविषयीं त्याची निष्ठा त्याला दुसरीकडे ओढीत होती !

अनिश्चिततेमुळें कटामध्यें उडी घेतांना प्रेमाची आशा सोडूनच ती घेतली पाहिजे हें उघड होतें. मग कदाचित् प्रेम आणि कर्तव्यसिद्धीचा आनंद दोन्हीही मिळूं शकतील तो सुदैवाचा भाग निराळा. म्हणतात ना, नेहमीं वाईटाचा विचार प्रथम करावा !

एकदां त्याच्या मानसमंदिरात आवाज उठे —

" प्रेमाला कवटाळून तूं स्वामींची इच्छा अपुरी ठेवणार ? पूर्वायुष्यांतील देहयातना नि मानसिक क्लेश, तुझ्याकडे आशेनें पाहात विसरून जाणाऱ्या स्वामींचें मग काय ? "

" अनिश्चित मार्गांतील अपयशाच्या भीतीनें कदाचित् त्यांना तूं कायमचे दुःखी करून सोडशील ! "

" छे वेड्या ! " परत कोठून तरी विरुद्ध आवाज उमटे, " तीन निरुपद्रवी प्राण्यांच्या संसारसुखाचा बळी घेऊन अनिश्चित मार्ग कां धरतोस ? हें ध्येय तुला कितीतरी उच्च वाटत असलं तरी तिकडे तूं धावतां कामा नये ! गुलाबाचीं फुलं हाताशीं असतांना कमलपुष्पाकरिता कोणी खोल पाण्यांत शिरत नाहीं; तुझा हा भ्रम खोटा आहे ! ध्येय ! कर्तव्य ! स्वामीविषयींची प्रीति ! मोठ्या गप्पा मारतो आहेस ! एकट्यादुकट्याच्या खुनानें का कुठें कार्य होतात हीं ! सूडाच्या अमानुष भावनेच्या आहारीं जाऊं नकोस ! सबंध रक्तरंजीत प्रदेश पाळथा घातल्यावर तुझा कट मृगजळ कशावरून ठरणार नाहीं ? अन् तसा तो फसला तर त्याच रक्तरंजीत हाडांच्या जीवनपथाचा मार्ग ठरेल तुझा. "

आणि मग कोणीतरी त्याला म्हणतेसें वाटे — " प्रेमाची मामुली अट पुढें करतो आहेस तूं ! तुझ्यासारख्यावर विश्वास ठेवून दुर्दैवी दगा पावलेले व

राष्ट्राकरितां मरण पत्करणारे वीर, त्यांचं काय! त्यांचे आत्मे तुझ्या प्रत्येक कृतीभोंवतीं आशाळभूतपणें फिरत आहेत! त्यांचा आत्मयज्ञ! त्यांची तरी क्षिती बाळग थोडी! राष्ट्रपुरुष मृत्यूच्या जबड्यांत पडले अन् त्यांची इच्छा उपेक्षून प्रेमाचे थेर करतो आहेस तूं! आनंदस्वामींच्या हृदयाशीं चितेप्रमाणें जळणारं तें वचन–त्याची पूर्णता कोण करील?"

अशा प्रकारच्या परस्परविरुद्ध विचारांच्या धुमश्चक्रींतच त्या दिवशीं अजय आश्रमांत परतला! तो आश्रमांत केव्हां परत आला, हें सुद्धां त्याला नीटसें समजलें नाहीं!

प्रकरण ६ वें

# सुट्टीनंतरची भेट

सुट्टीनंतर परत पुण्यास जातांना आपण आपल्या आयुष्याच्या एका नव्याच दालनांत प्रवेश करीत आहों असेंच विजयाला वाटत होतें. कारण, आयुष्यांत स्थित्यंतर घडवून आणण्याची शक्ति प्रेमाच्या आनंदात असते हें कांहीं खोटें नाहीं. त्यामुळें पुण्यास गेल्यानंतर दुसऱ्याच दिवशीं आपण शोभनेला भेटूं शकूं अन् वर्तमानकाळाच्या अस्थिर स्थितीचा निर्णय घेऊं असें तो मनाशीं म्हणत होता.

गेल्या सुट्टींत त्यानें बरींचशीं रात्रीचीं ग्राम विद्यालयें स्थापन केलीं होतीं. आपल्यामागें इनामगांवालाच रहाणाऱ्या सहकाऱ्यांपैकीं दोघांना व्यवस्था पहाण्याकरितां त्यांना वारंवार भेट देण्याविषयीं आज्ञा देवून ठेविली होती. खुद्द इनामगावला आरोग्याचें महत्त्व प्रतिपादन करून, खेडगावांत जेथें आरोग्यविघातक वातावरण नि चालीरीती अस्तित्वात असण्याचा संभव असतो, त्या ठिकाणीं आरोग्यदायकता वाढविण्याविषयींचे उपाय, त्यानें गांवकऱ्यांना सांगितले होते. बुद्धिवर्गाशिवाय अवांतर अशा बैठकी घेण्याची न् त्यांत सुबुद्ध आणि सुशिक्षित झालेल्या गांवकऱ्यांना स्वदेशी म्हणजे काय फावल्या वेळांत उपजीविकेला हातभार लावणारे ग्रामोद्योग, इत्यादींची माहिती देण्याची व्यवस्था लाविली होती. अन् या सर्व भानगडींत त्याला आठ एक दिवस उशीरच झाला पुण्याला जावयाला !

या श्रमानंतर आतां विश्रांतीचा काल तो अनुभविणार होता. गाडीनें कल्याण स्टेशन सोडलें, त्यावेळेस सायंकाळच्या सूर्यास्ताच्या निस्तेजपणांत गाडीच्या शीघ्रगतीमुळें उडालेला धुराळा भर घालीत होता. त्यामुळें बाहेरील

देखावा अधिक निरुत्साही झाला होता. गाडी सुटून पांच दहा मिनिटें झाली असतील. खिडकींतून येणारा असह्य वारा टाळण्याकरितां विजयानें कांचेचें तावदान सर्रकन वर ओढून खिडकी बंद केली; कांचेंतून एकदा बाहेर पाहिलें अन् बाकावरच एक पुस्तक वाचीत तो आडवा झाला.

कांहीं वेळानें त्या वाचनाचाही कंटाळा आला, म्हणून पुस्तक बंद करून त्यानें डोळे मिटले.

तो जागा झाला त्यावेळेस गाडी नेरळ स्टेशनमध्यें उभी होती. त्यानें बाहेर पाहिलें. तिकिट कलेक्टर उभा होता त्या दारातून एक साधारण काळसर पण रुबाबदार चेहऱ्याचा इसम बूट वाजवीत, त्याच टेक्यात, विजयाच्या डब्याकडे आला. डब्यात शिरतांच विजयाच्या समोरच्याच बाकाचे वरील जाळीवर त्यांनं आपली बॅग टेविली अन् डोक्याची हॅट काढून तीही त्याच झोकांत त्या बॅगवर टाकली नंतर तो खिडकीजवळ त्याच बाकावर बसला नि बाहेर प्लॅटफॉर्मवर उभ्या असलेल्या वयस्क गृहस्थाबरोबर बोलण्यास त्यानें सुरवात केली.

मुळींच ओळख नसताही, प्रथमदर्शनींच कांहीं माणसांबद्दल, आपल्याला आदर वाटू लागतो ना ? तेंच मत झालें विजयाचें त्या प्लॅटफॉर्मवरील गृहस्थांबद्दल. त्यानीं डोक्याला खादीची पांढरी टोपी घातली होती अन् आखूड धोतराचा सोगा सुटाच सोडला होता. अंगांतील काळसर जाकिटाच्या खिशात दोन्ही हात घालून त्या गृहस्थानें संभाषण चालू होतें. मधून मधून पायांच्या टांचा उंच करून परत त्या खालीं टेकण्याचा त्यांचा चाळा चालू होता बोलतांना.

" अजून अवकाश आहे गाडी सुटायला. " ते गृहस्थ उद्गारले.

" हो; थोडा. " गाडीमधील महाशयांनीं हातावरील घड्याळाकडे पहात उत्तर दिलें.

" नाना, " आंतील गृहस्थच पुढें म्हणाले, " प्रकृतीला जपत जा; हवा बदलती आहे; तेव्हां म्हटलं जपून असा ! "

" अरे मला काय होतं आहे ! चांगलं दगडासारखं आहे माझं शरीर !

शोभनेला मात्र हाच निरोप सांग! चारच दिवस झाले ना तिला पुण्यास जाऊन? पण किती काळ लोटला असं वाटतं आहे मला!"

शोभनेचें नांव ऐकताच आपण ज्या चिंतनांत गर्क होतों, तीच का ही शोभना? अन् असली तर तिचें याचें काय नातें असा प्रश्न विजया-पुढें उभा राहिला.

"तें काय सांगायला पाहिजे?" आंतील गृहस्थ म्हणाले, "बाकी नाना! तुमची मुलगी फार गुणवान बरं कां! सौंदर्यांत काय, अभ्यासांत काय अन् मीं परवा ऐकलं होतं कसल्या चळवळींत पडते आहे म्हणे ती!"

"हं! सुट्टींतच कळलं मला तें! आमच्या ताईचं रतनपूरला जाणं! तिथं हीसुद्धां जाते अधून मधून! तिथल्या शेतकऱ्यांची संघटना करायचं कार्य कांहीं दिवसापासून तरुण मंडळी करीत आहेत; शोभनेनेंही थोडा भाग घेतला आहे त्यांत! अरे, म्हटलं तरुणानीं असलें कार्य करायचं नाहीं तर मग काय आम्हीं? थोड्याच दिवसांत ओंकारेश्वराकडे दृष्टि लागायला लागणार आमची अन्—"

"वा! बराच बेत दिसतो आहे तुझा नाना!"

"म्हणजे? तूं काय म्हणतो आहेस काका, तें नाहीं कळलं!"

"नाहीं; ओंकारेश्वर पुण्याला, अन् नेरळपासून तेथपर्यंत! हँ हँ! एक चमत्कारच होईल तो!" या त्यांच्या उद्गारावर नानाही मनसोक्त हंसले.

इतक्यांत गाडी सुटायची वेळ झाली. स्टेशनवरून गार्डसूचे बावटे हलविले गेले. गाडीला एक सुरुवातीचा लहानसा धक्का बसला; अन् गाडी सुरू झाली. गाडीबरोबर चालतां चालतां नाना म्हणाले,

"शोभनेला सांग. म्हणावं, फार त्रास घेऊं नको अभ्यासाचा, अन् नियमानें पत्र येऊं दे!"

गाडी सुरू होतांच काकासाहेब विजयाकडे वळले. जागेवर बसतां बसतां त्यांनीं विचारलें,

"कुठं जायचं आपल्याला?"

"पुण्याला."

"असं का ? मलाही तिकडेच." विजयानें न विचारतांच काकासाहेबांनीं उत्तर दिलें.

खिशांतील एक चिरूट काढून तो तोंडांत धरून पेटविला त्यांनीं नि मग तसाच तो तोंडांत धरीत बोबडया आवाजांत ते बोलूं लागले,

"कुठं असतां तुम्ही ? पुण्यालाच का ? कॉलेजमध्यें मोठी मजा असते नाहीं अतां सुरुवातीला ? आमच्या वेळची आठवण आहे मला. पहिल्याच भेटींतील विद्यार्थ्यांचा विनोद, ओपनिंग ॲड्रसच्या वेळेला होणारी कार्डफेंक अन् स्टॅंपिंग, कांहीं विचारूं नका ! बाकी त्या भाषणाकडे तरी लक्ष असतं कुणाचं ? पहिल्या दोन बाकांवरील नवी भरती किती झाली याकडेच सर्वांची दृष्टि !"

काकासाहेबांची ती चर्पटपंजरी पाहून विजयाला हंसूं आलें.

"अन् हो ! नंतर ती निवडणुकीची धामधूम अन् संमेलनामधील नाटकांची दंगल--"

"तुम्हीं कधीं काम केलं होतं का नाटकांत ?" त्यांना थांबवीत विजयानें विचारिलें.

"हो ! नाहीं म्हणायला एकदां केलं होतं ! अन् तें मी जन्मभर विसरणार नाहीं !" असं म्हणून चष्म्याच्या भिंगांवरून विजयाकडे पहात, काकासाहेब थोडा वेळ स्तब्ध राहिले. विजयानें "कां" म्हणून प्रश्न करावा अशी त्यांची इच्छा होती असें दिसलें. परन्तु विजय जेव्हां कांहींच बोलेना तेव्हां तेच पुढें म्हणाले,

"म्हणजे त्याचं असं झालं, नाटकांत जी स्त्री आत्महत्या करणार असते, तिला त्यापासून परावृत्त करण्याचं काम होतं माझं ! अंकाच्या शेवटीं माझं भाषण होतं ! त्यांत ती तसं करण्याचा बेत सोडीत नाहीं म्हणून आतां फक्त तिच्या शेवटच्या घटकेला तिजजवळ राहून तिला अडथळा करायचा असा माझा बेत मी सांगणार असतो ! भाषणाच्याच शेवटीं ती उठून बेत, अन् तिच्या हातांतील पिस्तुलाचा चाप चुकून ओढला जाऊन [illegible] होतो. गोळी चुकल्यामुळें तिला कांहींच इजा होत नाहीं. मात्र हें

मी पाठमोरा असल्यानें मला कळत नाहीं त्यामुळें तिनें आत्महत्या केली असे समजून मी शोक करीत तिकडे धांवतों असा कथाभाग होता. परन्तु आमच्या वेळेला तो स्त्रीपार्टी विंगमधील पडद्याच्याच दोरीला स्टेजवर येतांना अडखळला. दोरी सुटून पडदा पडला न् त्याच्या खालच्या बाजूच्या रुळाचा आवाज आला. तो त्या पिस्तुलाचाच आवाज समजून पाठमोरा मी मागें धांवलों तेव्हां ती स्त्री अर्थात् तिथें नव्हतीच; मीं मात्र जातांना "कमल, कमल, काय केलंस हें !" असा नेहमींप्रमाणें आक्रोश केला. ते उद्गार ऐकून व माझ्या फजितीला प्रेक्षकांनीं वाजविलेल्या टाळ्या ऐकून आमचे स्टेजमधील साह्यकारी मित्र अंक संपला, असेच समजून नेहमीं-प्रमाणेंच साध्या पोशाखात बाहेर स्टेजवर आले अन् हा सर्व गोंधळ पाहून सर्व हॉलभर जी काहीं हुल्लड उठली ती काहीं विचारूं नका !"

त्या गृहस्थाचें कॉलेजांतील स्मृतींशीं झालेलें तादात्म्य पाहून विजयाला मजा वाटली ! इतक्या वर्षानन्तर तो गृहस्थ आठवणी काढून काढून मन-सोक्त हसत होता ! 'पदवीधराच्या आयुष्यांत कॉलेजांतील गोष्टी हा एक अवीट आनंद आहे हेंच खरें !' विजय मनात म्हणाला.

त्याचें हें संभाषण संपतें आहे तोंपर्यंत गाडी कर्जत सोडून घाटांत शिरावयास लागली होती. अन् नन्तर संभाषणाच्या ओघांत पुणें स्टेशन केव्हां आलें हें त्या दोघांना कळलेंही नाहीं. स्टेशनवर रांगेनें बसलेले हमाल आपल्याला कोणाचें सामान मिळतें या आशेनें भरभर जाणाऱ्या लोकांकडे आशाळभूतपणें पहात होते. विजयाच्या डब्यांत विशेष गर्दी नस-ल्यामुळें जो एक हमाल, त्याच्याजवळ काहीं सामान असेल म्हणून आला होता, त्याला शेवटीं कांहींच मिळणार नाहीं हें ठरलेलें होतें. कारण, बाकीचे सर्व बोजे केव्हाच उचलले गेले होते.

"सामान घेऊ का साहेब ?" तो हमाल म्हणाला.

"अं हं, कांहीं नाहींच आहे या बॅगशिवाय !"

"मग तीच नेतों ना साहेब."

गाडीला धक्का बसला- शेवटचा या वेळेला !

" आमचे हात मोडले नाहींत कांहीं बाबा ! " काकासाहेब म्हणाले.

" साहेब ! कांहींच मिळणार नाहीं मला नाहीं तर ! " केविलवाण्या नजरेनें त्या हमालानें आपलें तांबडें पागोटें एकदां सांवरलें. त्याच्या सत्य-स्थितीनें विजयाला वाईट वाटलें. " असं म्हणतोस ? " आजूबाजूला पहात विजय म्हणाला, " बरं आहे काकासाहेब, असं करा ना ! दोन्ही बॅग्स् द्या याच्याजवळ; ए, हें घे; " असें हमालाला म्हणून विजय बाहेरही पडला.

टांग्यांत बसतांना त्या हमालाच्या हातावर एक चवली जेव्हां विजयानें ठेविली, तेव्हां, असें गिऱ्हाईक दररोज मिळेल तर देव पावेल असेंच त्या हमालानें म्हटलें असेल.

" दोन हॅंडबॅग्स्बद्दल दोन आणे हमाली ! " त्याचें समाधान वाटलें त्याला.

आज कॉलेजमध्येंच शोभना आपणांस भेटेल अशी विजयाची मुळींच कल्पना नव्हती. त्यामुळें दुसऱ्या तासाच्या शेवटीं कॉलेजच्या आवारांत जो एक चारपांच मुलींचा घोळका त्याला दिसला तिकडे कॉलेजविद्यार्थ्यांच्या साहजिक दृष्टीक्षेपानेंच त्यानें पाहिले. त्यानें तिकडे पहायला अन् शोभनेचें त्याच्या बाजूलाच लक्ष जावयाला एकच वेळ आली. सायकल हातांतून तिकडे वळवीत तो तिकडे जाणार तों शोभनाही त्याच्याकडेच येत होती तें त्याला दिसलें. बरें झालें; त्या वेळेला तास परत सुरू झाल्यामुळें आजूबाजूला कोणी नव्हतें. नाहीं तर ' आहे बुवा ' सारखा एखादा आवाज उमटला असता तिथें.

" आतां तरी सांपडलांत कीं नाहीं ? " हंसत हंसत शोभनेनेंच सुरवात केली.

विजयानें शोभनेकडे पाहिलें. आतां ती त्याला जास्त सुंदर दिसत होती. तिच्या मुद्रेवरील आरक्त छटेंत थोडी अधिक भर पडली होती. तिचे गाल किंचित् वर आल्याचा त्याला भास झाला. परंतु तिच्या हास्यानेंच तो अन-[illegible]वळचा फुगीरपणा तात्पुरताच निर्माण केला होता हें त्याला नंतर कळलें.

" काय करणार बुवा ! समोरच दिसलांत तेव्हां पळून तरी कसा जाणार ! "

विजयाच्या या उत्तरानें शोभनाला बरें वाटलें असावें; कारण, “आणि एका अर्थानें मी तुम्हांला भेटलोही होतो; माझं पत्र मिळालं नाहीं वाटतं तुम्हांला?” या विजयाच्या वाक्यावर तिनें अधिकच उत्सुकतेनें प्रश्न केला,

“हो! इश्य! नाहीं कसं? पण तें अपूर्ण होतं; पत्रावर उजव्या बाजूला स्वतःचा पत्ता लिहावयाचा असतो, हें विसरलांत वाटतं?” आणि मग त्याच नादांत तिनें आपलीं पुस्तकें पुढील बाजूस आपल्या कमरेशीं खालीं सोडलेल्या दोन्ही हातांत आडवीं धरलीं; तिच्या सोन्याच्या बांगड्या मनगटापाशीं खालीं सरकल्या, आणि त्यांची एक दाट अशी नादमधुर कणकण् उमटली.

“हो, विसरलों खरं! मगऽऽ! त्याबद्दल कांहीं शासन करणार आहांत कीं काय?” दुचाकीच्या बैठकीवर हात ठेवून त्यावर वांकून, पलीकडे उभ्या असणाऱ्या शोभनेकडे त्यानें पाहिलें. तो वांकल्यामुळें ती त्याच्याकडे किंचित् खालीं पाहून बोलत होती,

“मी पुष्कळ शासन करीन. पण तें पाळण्याचं तुमच्या हातांत आहे!”

“माझ्या हातांत! माझ्या हातात तर सायकलशिवाय दुसरं कांहींच नाहीं आहे.” आळीपाळीनें विजयानें आपले दोन्ही हात वर उचलून ते पसरले.

“व्याकरण आणि व्यवहार यांचं आतांच नातं जुळवूं लागलांत तुम्ही! बरं पण तें जाऊं दे. त्या दिवशींचा वचपा काढून घेणार आहे मी. उद्यां सकाळीं आमच्याकडे यायचं तुम्ही! अं?”

विजयानेंही मानेनेंच संमति दिली.

दुसऱ्या दिवशीं विजय पुरंदऱ्यांच्या वाड्यांत गेला, तेव्हां तो बाहेरील अंगणाच्या फाटकापाशीं असतांनाच शोभनेचें त्याला दर्शन झालें. स्नान-गृहांतून स्नान आटोपून ती नुकतीच बाहेर आली होती. तिची शुभ्र काया वर्षाऋतूंतील जलसिंचनानन्तर केतकीचा वर्ण ज्याप्रमाणें अधिक तेजोयुक्त व्हावा त्याप्रमाणें, अधिकच आकर्षक दिसत होती. त्याला पहातांच ती थोडीशी लाजली. दोन्ही हातांनीं अंगावरील कपेहून घेतलेल्या [illegible] पातळाच्या निऱ्यांचा घोळ तिनें पुढें उरोभागाजवळ धरला होता. [illegible]

पदर आपल्या अंगावरून घेतला होता. तिनें एकदां आपल्या कपोलभागावरून हात फिरविला, दुसऱ्या वेळेला त्याच हातानें नितम्बाखालील पातळ किंचित् वर उचललें नि तें तसेंच सांवरून घेत जातां जातां, "आलें हं मी, बसा !" असें म्हणत ती लगबगीनें आंत निघून गेली. तेवढ्या वेळांत तिच्या भरीव नि गौरवर्ण पायावर तें पातळ हेलकावलें गेलं अन् तिचे पाय ऽ्यतेनें चमकले.

आंत जाऊन पुढच्या खोलींत विजय बसला तेव्हां शोभनेच्या पुनरागमनाविषयीं त्याची उत्सुकता इतकी होती कीं पांचच मिनिटात शोभना परत आली तरी त्या वेळांत त्यानें आपल्या मनगटावरील घड्याळावरून पाच सात वेळां दृष्टि फिरविली.

"उशीर झाला, नाहीं मला ?" तिथे येतांच आपल्या खोलीकडे जातांना शोभनेनें प्रश्न केला नि तिकडेच चलण्यास तिनें त्याला खुणावलें. आंत जाताच पटकन् एक खुर्ची ओढून तिनें ती विजयापुढें सरकावली.

"छे ! छे ! मलाच झाला !" तिच्या प्रश्नाला विजयानें उत्तर दिलें.

विजयाच्या समोरील टेबलावरच शोभनेनें आपलें आसन ठोकलें. आपल्या अधातरी पायांची ती हालचाल करीत होती अन् संभाषणांतील विनोदामुळें वेळोवेळीं तेथें त्या दोघांचे हास्यतरंग उमटत होते.

"तुम्हांलाच उशीर झाला म्हणतां ? तो कसा ?" तिनें विचारलें.

"अहो, एप्रिलमध्यें भेटायचं तें जूनमध्यें भेटतों आहें तुम्हांला !"

यावर हंसत हसत शोभनेनें संभाषणाचा ओघ बदलत म्हटलें,

"हो, खरंच ! चहाला बोलावलं आहे नाहीं मी तुम्हांला ?"

"अहं ! गप्पांना !"

"चहाशिवाय गप्पांना कधीं रंग चढला आहे म्हणा !"

"पण मी चहा घेत नाहीं कधीं !"

"असं का ? मग दूध आणतें;" आपल्या भुंवयांची हालचाल करीत अचल जलपृष्ठावरील सूक्ष्म जलमींचीची आठवण करून देत, ती विजयास म्हणाली.

दुग्धपान झाल्यावर त्याच्या हातावर सुपारी ठेवण्याकरितां शोभनेनें आपला हात त्याच्या हाताजवळ नेला, तेव्हां तिच्या मिटलेल्या बोटांचा विजयाच्या करतलाला स्पर्श झाला. कांहीं तरी विशेष घडलं म्हणून दोघां-च्याही मनात चलबिचल झाली.

सुपारीचें कांचेचें भांडें जागेवर ठेवण्याकरितां शोभना भिंतीवरील फळी-जवळ गेली आणि तसें तें ठेवतांना तिनें मान वळून विजयाकडे पाहिलें; तोही तिच्याकडेच पहात होता. आपण अशीं अवचित पहात गेलों म्हणून दोघही एकदम हसलीं.

रस्त्याच्या कडेनें चाललेल्या एखाद्या सुंदर मुलीकडे पहाण्याचें दोघा सायकलवर बसलेल्या मित्रांच्या मनात यावें; तें आपलं पहाणें दुसऱ्याला कळूं नये असे दोघानांही वाटावें नि मग दोघांचेही त्या मुलीकडे पहाण्यात एकाच वेळीं सायकलचे गतीकडे दुर्लक्ष झाल्यामुळें त्यांच्या सायकली एक-मेकींवर आपटून, दोन्हीही आपण [illegible] गेलों म्हणून आश्चर्यचकित व्हावें, तसाच विस्मय होता त्यांचा !

शोभना परत टेबलाजवळ येऊन बसल्यावर थोड्या वेळानें विजय म्हणाला,

“अच्छा ! जाऊं मी आता ?”

“कालच विसरलात वाटतं ?” पातळाच्या किनारीवरून चापून चोपून हात फिरवीत शोभनेनें समज दिली. “खूप खूप बोलायचं आहे तुमच्याशी मला. त्या दिवशींचा वचपा आज काढायचा माझा बेत कालच मीं सांगितला तुम्हाला !”

“अस्स; अस्स.” खुर्चीच्या हातावर, उठण्याच्या तयारीनें ठेविलेले हात तसेच ठेवीत विजय म्हणाला नि तो तसाच पुन्हा खुर्चीत बसला.

टेबलावरच आपल्या बाजूला असलेल्या बारीक मनगटी घड्याळाच्या पट्ट्याशीं खेळत शोभना म्हणाली,

“तुम्ही आलात, बरं वाटलं मला !”

यानन्तर त्यांच्यांत बरेच संभाषण झालें. परन्तु तें बहुतेक कॉलेजविषयीं-

चेंच होतें, अमका प्रोफेसर किती मनमिळाऊ आहे, तमक्या क्रिकेटिअर प्रोफेसरला संस्कृत कसें शिकवितां येत नाहीं, आदल्याच दिवशीं व्हरांड्यांत एक मुलगी कशी पडली नि त्यावर सभोंवार कसा हंशा पसरला, इत्यादींचें वर्णन शोभनेनें केलें. ती तिची आपल्या कॉलेजविषयींची नव्या विद्यार्थ्याला वाटावी तशी उत्सुकता पाहून विजयानें विचारलें,

"फारच उत्सुक दिसता तुम्ही कॉलेजविषयीं ?"

"हो. कारण, या वर्षीच मी प्रथम, या कॉलेजांत येतें आहे. गतवर्षी मुंबईलाच होतें मी कॉलेजात !"

"असं ! तरीच तुम्हांला कधीं पुण्याला पाहिलेल आठवत नाहीं मला !"

"मी मात्र तुम्हाला सुट्टींतसुद्धा पाहिलं होतं हं !" असं म्हणून नेरळच्या वर्तमानपत्रातील विजयाचा फोटो तिने त्याला दाखविला. तिची ती आप- [illegible] आस्था पाहून हर्षभरित चित्तानेंच थोड्या वेळानें विजय घरीं जा[illegible] निघाला.

त्याला पोंचवावयाला शोभना निघाली त्या वेळेस फाटकापर्यंत जातां [illegible] त्याला म्हणाली,

"[illegible] वे[illegible], येतां[illegible] ना[illegible]ं मी तुमचा ?"

"[illegible]. [illegible] आहे खरं माझ !"

"[illegible] ? [illegible] वाटत ?"

"[illegible] वाटलं असत पण—" फाटकांतून बाहेर पडत विजयानें उत्तर दिलें. पुढील निष्कर्ष बोलण्याला त्याची जीभ धजेना ! म्हणून ते वाक्य अर्धवट सोडून त्यानें म्हटलें,

"आमच्याकडे आलं पाहिजे हं तुम्ही आतां !"

"येऊं कीं ?"

"तुम[illegible] आश्वासन नको ! कधीं येणार तें बोला !"

"वाटे[illegible] तेव्हा !" फाटकांतून शोभनाही बाहेर आली; "अहो, आतां [illegible] उद्योग काय आहे मला ? तुम्हाला मात्र वेळ केव्हा आहे तें पहा ! तुम्ही काहीं मा[illegible]प्रमाणें निरुद्योगी नाहीं !"

"असंं!" रस्त्यावर पाऊल टाकीत तिच्या त्या वाक्यावर विजय म्हणाला, "बरं, मग शनिवारींच या म्हणजे बरं स्वस्थपणानं गप्पा मारायला! सुट्टी आहे त्या दिवशीं."

"शनिवारीं?" शोभनेनें विचार करीत म्हटलें. तिला येण्यास त्या वेळीं वेळ नसावा या शंकेनें विजयानें म्हटलें,

"कां, येणार ना?"

"हो! पण सोमवारीं येईन! शनिवारीं नाहीं!"

त्या दिवशीं आपल्या दैनंदिनींत शोभनेनें पुढील वृत्तांत लिहिला—"......आज विजय आले होते. त्या दिवशीं पत्रानें त्यांचं नांव कळलं होतं, आज मन कळलं त्यांच! किती प्रेमळ आहेत ते. सुट्टीनंतर कालच ते कॉलेजांत पहिल्यांदा भेटले, पण त्यांच्या लाघवी बोलण्यानें आमचा परिचय जुना आहे असच वाटायला लागलं आहे मला! म्हणतात कसे, कीं, पत्राचे उजवे बाजूस वर पत्ता लिहिला नाहीं म्हणून शासन करणार आहांत का? हो, चांऽऽगलं शासन करणार आहे? आज पहिला हप्ता म्हणून गप्पा मारायला बोलावलं. रतनपूरला किसानसभेला यांनाच बोलवावं अस लिहिणार आहे मी, तिथल्या कार्यकर्त्यांना. कळलं आहे म्हणावं आपलं सार्वजनिक कार्य माझ्या एका मैत्रिणीकडून. अन्—पण जाऊं द्या; लिहून कशाला ठेवूं? माझ्या हृत्पटलावरच लिहिलं गेलं आहे तें!"

प्रकरण ७ वें

# ठिणगी !

पुष्कळदां निःशब्दपणेंच आश्रमांत वावरणाऱ्या आनंदस्वामींच्या गतायुष्यातील घडामोडींविषयीं अजयाला कांहींच माहीत नव्हतें. पण आज मात्र आतांपर्यंत न कळलेली स्वामींच्या आयुष्यांतील एक गोष्ट त्याला कळली.

" कांहीं विशेष बातमी नाहीं आज ? " अजयाला स्वामींनी विचारलें.

" वा ! नाहीं कशी ? एकच काय, दोन बातम्या आहेत आज मामा ! " हाताचीं पहिली दोन बोटें वर हात करून चाळवीत अजय उत्तरला. " पैकीं एक वर्तमानपत्रांतली आहे अन् दुसरी विकासपूरचीच पण वर्तमानपत्रांत न आलेली आहे ! "

तो काय सांगतो तें स्वामी लक्षपूर्वक ऐकत होते.

"मामा, सावरकर पुण्याला येणार आहेत उद्यां. टिळकांच्या पुण्यतिथिनिमित्त त्यांचं व्याख्यान ठरवलं आहे पुण्याच्या पुढाऱ्यांनीं."

त्याचे हे उद्‌गार ऐकून एखाद्या नांवाबरोबर गतकालांतील त्या नांवाशीं निगडित असलेले प्रसंग आठवतांना मनुष्य करतो तशी मुद्रा झाली आनंदस्वामींची. त्यांच्या मुद्रेवर आनंदाची एक लकेर उमटली. दाढीवरून उजवा हात फिरवून तो तसाच मिशावरूनही वळवून डाव्या हातांतील काठी त्यांनीं जमिनीवर आपटली आणि खालीं पाहात ते हर्षितहृदयानें म्हणाले,

"कोण ! सावरकर ! हं हं ! मेमध्येंच सुटला तो नाहीं का ! तूंच सांगितलं होतंस ते ! "

" सुटला ! " सावरकरांच्या नांवाचें स्वामींनीं केलेले ते एकेरी संबोधन ऐकतांच अजय चमकला. उगीच कोणाला वाचनेही तिरस्कारण्याचा स्वामींचा स्वभाव नव्हता हें त्याला पूर्ण माहीत होते. त्यामुळें मग या त्याच्या बोलण्याचें कारण, त्या थोर पुरुषाबद्दलचा आत्यंतिक जिव्हाळा किंवा निकटवर्ती स्नेह हेच नसेल ना? चटकन् अजयाचे मनात येऊन गेले. अन् सावरकर आणि स्वामी याचा तसा संबंध म्हणजे—

परंतु त्याला फार वेळ त्या विचारात स्वामींनीं टेविल नाहीं.

" का? मी त्याना अरे तुरे म्हटल म्हणून आश्चर्य वाटल तुला? " ते म्हणाले, " हं ! तात्या म्हणजे एक रत्न आहे रत्न ! काय अचाट छातीचा वीर आहे तो ! लहानपणापासून पहातो आहें ना मी ! "

" म्हणजे ? त्याची अन् तुमची मैत्री होती ? "

" हो. एकप्रकारें मैत्री होती अन् एकप्रकारे तो माझा गुरुही होता. कारण आमच्या मित्रमंडळींत तो या दोन्हीं नात्यानीं वावरत असे. वास्तविक मी त्याच्याहून चार वर्षांनीं मोटा; पण भासत असे उलटच ! विलायतला जाण्याच्या आधीं नाशीक स्टेशनवर त्याची अन् माझी शेवटची भेट झाली. आमची ताटातूट होणार, म्हणून फार वाईट वाटल मला. पण माझा हात आपल्या हातात घेऊन म्हणाला काय तो, माहीत आहे ? "

" काय ? " उत्सुकतेनें अजयाने चालना दिली.

" म्हणाला, " गोविंदा, वाईट वाटून घेऊं नको ! मी विदेशी का चाललों आहे माहीत आहे ना ? मलाही वाईट वाटतं तुमच्यापासून दूर जायला ! पण केवढा आनंद होतो आहे दुसरीकडे मला ! थोड्याच दिवसात आपला हिंदुस्थान स्वतंत्र होणार ! परत मला हिंदुस्थानांत पाऊल टाकायचं आहे, तें स्वतंत्र भारताचा, स्वतंत्र महाराष्ट्राचा, नागरिक म्हणून. ब्रिटिशाचा गुलाम म्हणून नव्हे ! मला हसत निरोप दे; म्हणजे या पुढल्या काळांतही उत्साह वाटेल मला. अन् त्याला परत आणला तों एक लोहदंडांनीं जखडलेला बंदी म्हणून. फरारीसुद्धां झालों होतों मी त्या वेळेला ! "

" फरारी ? " आणखी कोणता हा धागा हातीं लागतो हे चांचपण्या-

करितां अजयानें विचारिलें. परन्तु तो संभाषणाचा ओघ स्वामींनी तसाच चालूं दिला नाहीं. अन् त्यांच्या मनाविरुद्ध कांहीं करून, त्यांना त्रास होईल असें वाटतांच तेथेंच थांबणें हा अजयाचा नियमच होता. त्यामुळें आपल्या मुद्रेवरील आविष्कार लपवीत तो नुसताच ऐकत राहिला.

"पण हरकत नाहीं;" स्वामीच पुढें म्हणाले, "बंदी म्हणून आणला तरी पण हिंदुस्थानच्या पराक्रमाची ध्वजा नाचवत नाचवत फ्रान्सच्या किनाऱ्याच्या उत्तुंग तटावर तात्यानें रोवली आणि मगच तो हातीं लागला राजकर्त्यांच्या ! तो आता मुक्त झाला आहे; रत्नागिरीच्या त्या बंदिस्त खुराड्यांतून बाहेर येतांच विस्तीर्ण राष्ट्राचा पट्टा त्याला मोकळा आहे; अन् हें आर्यक्षेत्रही अपुरं वाटाव अशी त्याची भरारी आहे. समवयस्क म्हणून मजबरोबर खेळणाऱ्या तात्यानें हिमालयाएवढा पराक्रम केला याचा अभिमान वाटतो मला ! अपयश आलं नसतं तर हिटलर, मॅझिनी, मुसोलिनी, डी व्हॅलेरा यांच्याप्रमाणेंच तो गाजला असता. त्यांच्याप्रमाणेंच सबंध राष्ट्राचा भार एकट्यानें आपल्या खांद्यावर वहावा असा त्याचा अधिकार आहे !"

"हो; आणि दुसरं काय म्हणालास ?" काहीं वेळानें स्वामींनीं पृच्छा केली.

"इथे एक विलायती फर्म येणार आहे, दोन दिवसात; इंग्लडची कंपनी आहे. काय नांव बरं ऽऽऽ !" कपाळावरून हात फिरवीत त्या नावाची आठवण करीत अजय म्हणाला, नि असें करताना त्यानें शेवटचा शब्द थोडा लांबवीतच उच्चारीला. "हो; थॉमस् स्मिथ अँड् को; विदेशातून एकदम कापड मागवायचं म्हणजे स्वस्त दरानें तें विकतां येईल इथें, असं त्यांचं धोरण आहे; काहींही करून त्या कंपनीचं बस्तान, इथें बसून देतां उपयोगी नाहीं. पण आपल्या विरोधाला न जुमानता ती फर्म निघालीच तर बहिष्कार आहेच आपल्या हातात. तुम्हाला काय वाटतं ?"

"माझाच भाचा आहेस तूं अजया !" स्वामी म्हणाले; "मात्र परदेशी कंपन्या इथें येऊन व्यापार करण्याच्या गोष्टी बोलतात नि कांहीं ठिकाणीं तो कमालीचा यशस्वी करूनही दाखवतात, याचं मला आश्चर्य वाटतं. किती जागृति व्हायला हवी आहे आपल्यांत अजून."

वरील संभाषणावरून स्वामींच्या गतायुष्याच्या एका अज्ञात गोष्टीचा उलगडा झाला या समाधानांतच नंतर अजय होता. चारसहा दिवसांनी तो शकुन्तलेकडे गेला. तो तिच्या निवासस्थानीं पोंचला तेव्हां शकुन्तला घरांत नव्हती; त्यामुळें परत जाण्याच्या तयारींत तो होता तों स्वतःच तात्यासाहेबांनींच त्याला हांक मारली.

" अहो, जय! शकू नसली म्हणून काय झालं? आम्ही आहोत कीं; किती दिवसांत तुमच्याशीं बोलतों आहे मी! या, थोडा वेळ असला तर." ते म्हणाले.

या वेळेस सकाळीं तात्यासाहेब घरीं असणार हें अजयाला माहीत होतें. कारण ठरलेला नियम तात्यासाहेब मोडणें शक्यच नव्हतें.

कोणा एका न्यायाधिशाला न्यायालयांत स्वतःच्या काळया झग्याच्या गळपट्टीच्या सुट्या भागाला हात लावीत निर्णय देण्याची संवय होती. एक दिवस त्याचा हा नियम अंगांत झगाच नसल्यामुळें चुकला आणि त्यामुळें त्या दिवशींच्या खटल्याचा निर्णय तो देऊंच शकला नाहीं, असें जर तात्यासाहेबांना कोणीं सांगितलें असतें तर तें त्यानीं बिनदिक्कत खरें मानलें असतें; कारण ते स्वतः वरील प्रकारच्या गृहस्थांपैकींच एक होते.

सकाळीं लहानग्या प्रभानें हांक मारतांच उठायचें, त्याला जवळ घेऊन चहा घेतला कीं त्याला थोडा वेळ खेळवायचें, आपल्या कार्यालयांत बसलेल्या असंख्य पक्षकारांच्या तक्रारी ऐकून त्यांच्या विषयींचें निराकरण करतां करतां कोर्टांत वेळ जावयाची व्हावयाची नि खुर्चीमागच्याच दाराचा पडदा बाजूला सारून शकुन्तलेनें त्याची त्यांना समज द्यावयाची, यांतला एक जरी नियम चुकला तरी सबंध दिवसभर त्यांना चुकल्याचुकल्यासारखें होई.

आणि म्हणूनच आतां तात्यासाहेब प्रभाला घेऊन बसले असणार हें अजयाला माहीत होतें.

अजय पायऱ्या चढत होता तोंच तात्यासाहेबांनीं विचारिलें—

" वेळ आहे ना?"

" हो तर?" अजयानें बसतांबसतांच उत्तर दिलें.

"नाहीं तर म्हटलं तुमचं राजकारण तुम्हांला मोकळं सोडायचं नाहीं ! बाकी हल्लीं तुमच्या तरुणांच्या या हालचालीशिवाय दुसरं राजकारण महाराष्ट्रांत राह्यलं आहे कुठें म्हणा !"

"कां ? हल्लीं तर तें जास्त बोकाळलं आहे. एकच विषय सर्वांनीं घ्यायचा अन् व्याख्यान देत सुटायचं. लोक म्हणतात, हेही म्हणतात ! 'महाराष्ट्र मागें कां पडला ?' केवढा मोठा विषय आहे !"

"मूर्ख आहेत बेटे." मांडीवरून उठून जाण्याची तयारी दर्शविणाऱ्या प्रभाला तो उठल्यावर त्याच्या पाठीवरून हात फिरवीत सम्मती दाखवून तात्यासाहेब म्हणाले, "आतां तुम्हांला माझं उत्तर जरा मजेचं वाटेल, पण नंतर तेंच बरोबर आहे असं तुम्हाला कळेल, अहो, खरं म्हणजे, महाराष्ट्र मागेंही पडला नाहीं अन् तो पुढेंही नाहीं आहे राजकारणात ! तो सध्यां या रोडक्रॉसवर उभा आहे !" हाताचीं बोटें एकमेकावर आडवी करीत तात्यासाहेबानीं सुरवात केली.

"काहीं एका मर्यादेपर्यंत सर्वजण महाराष्ट्रामागे आले; पुढे इतर रस्ता चुकले अन् दुसरीकडे गेले. ती वस्तुस्थिति माहीत असल्यामुळें तो सध्या तसाच उभा आहे. अन् आता तीं सर्व चुकलेलीं मेंढरं जेव्हां परत मागें येतील, तेव्हां त्याना घेऊन पुढेंही जाईल महाराष्ट्र ! आता एवढं खरं, कीं त्या मेंढरांना परत मागें खेंचून आणण्याइतकी आरोळी, आपले केळकर प्रभृति पुढारी मारूं शकले नाहींत. पण म्हणून त्यांनीं आपणही त्याचेबरोबर जाण्याचं नाकारलं अन् आपला अधःपात थांबविला हें काय थोडं झालं ?"

"पण हें आभासाचं जग आहे ना ? आपला उठाव दाखविण्याला दुसऱ्याचा कमीपणा बरोबर घेऊन जावा लागतो. एखाद्या साधारण सुंदर मुलीनें दोन कुरूप मुलींना दोन्ही बाजूला घेऊन फिरायला जावं नि, मग ती अधिकच सुंदर दिसावी तसं हें आहे. गांधींचा कार्यक्रम कांहीं मर्यादेपर्यंत आक्षेपार्ह नव्हता पण त्याचं वाजवीपेक्षां फाजील स्तोम मानतां कामा नये !"

यानतर थोड्या गप्पा झाल्यानंतर तात्य साहेब म्हणाले, " अच्छा ! परत केव्हातरी बोलू आणखी ! आमचं हे असं आहे ! सर्व नियम सभाळावे लागतात आम्हांला ! "

दुसऱ्या दिवशीं सकाळीं अजय पुन्हा आपट्याकडे गेला. त्यावेळीं मात्र शकुन्तला त्याला भेटली.

" का हो ? काल तुम्ही तसेच गेलांत ना ! " लटक्या रागाचा आविर्भाव करीत शकुन्तलेनें विचारलें.

" काय करता ? तुमच्यामागे कामाची गर्दी ! यानन्तर आमच्या वाड्याला वेळ येईल तेव्हा ना ? "

" असं का ? मग आज सकाळचा माझा सारा वेळ मोकळा आहे तुमच्या-करिता ! चला पाहू ! · शोफरऽऽ ? " असे म्हणून मोटार असणाऱ्या तबेल्याकडे घाईनेंच शकुन्तला गेली; " आज खूप हिंडायचं ठरवल आहे मीं, मोटारींतून ! लांब लांऽऽब जायचं बर का ? " वरचा ओठ खालील ओठावर दाबीत तिनें ते अंतर दाखविलें.

मोटारींत दोघही बसल्यावर अजयानें गावाबाहेर जाताच मोटारचा वेग बराच वाढविला. वाऱ्यानें शकुन्तलेचे केस केस भुरुभुरु उडत होते. अजयाचे जवळच ती पुढील बाजूला बसली होती. अजयाचें तें मोटार चालविण्यातले कौशल्य माहीत असल्यामुळेंच कीं काय, तिला त्या वेगाचें मुळींच भय वाटत नव्हतें. चॉकोलेट रंगाच्या मोटारच्या दारावर तिनें एक हात ठेवला होता अन् दुसरा अजयाच्या खांद्यावर रेलून ती आरामात बसली होती. मोटार चालविता चालविता मधूनच अजय तिच्याकडे पाहात होता. अन् मधून मधून तिच्याशीं बोलतही होता.

" अजय ? कळलं का तुम्हांला ? "

" काय ? " दिग्-नियंत्रक चाकावरील भोंगा वाजवीत त्यानें विचारलें.

" थॉमस स्मिथ नावाची एक कंपनी इथे येणार आहे ! "

" मला माहीत आहे. ! "

" अन् ती विदेशी आहे. "

"तेंही पण माहीत आहे !"

"काय विचार आहे तुमचा त्याविषयीं ?"

"विचार काय असायचा ? विरोधी प्रचार, बहिष्कार अन् तेंही परिणामकारक ठरलं नाहीं तर—"

"तर काय ?"

"पण तें जाऊं दे ! कारण, वरील उपायच पुरे पडतील."

अजयाला कांहीं सांगायाचें होतें तें त्यानं कां टाळावें हेंच शकुन्तलेला कळलें नाहीं. मात्र त्यानें टाळाटाळ केलेली तिला जाणवली.

तीन एक मैल गेल्यावर अजयानें मोटार परत फिरविली. पण या उलट दिशेनं किंचित् अंतर जातांच पावसानं झोड उठविली. पाऊस सुरू होताच शकुन्तलेची जी तिरपीट उडाली ती कांहीं विचारू नका. बाजूचेंच कांचेचें दार तिनं लावून घेतलं. तसेंच करण्यास अजयालाही खुणावलें अन् मागील बाजूचीं दारं बंद आहेत, हें माहीत असूनही एकदा मागेंही पाहिलें. तेवढ्यात पर्जन्याच्या धारापातानें समोरील रस्ता चांदेरी कापडाचे विरविरीत वस्त्रांतून दिसावा तसा दिसत होता. त्यामुळें अजयानें वेग थोडा कमी केला. समोरच्याच कांचेच्या उघड्या जागेतून एखादा थेंब सुर्रकन् शकुन्तलेच्या मुखकमलावर उडी घेई, आणि आपल्या कोमल करांग्रांनीं तोंडावरून, तो पुसून टाकण्याकरितां ती हात फिरवी.

बाजूची झाडें भराभर उलट दिशेला पळत होतीं.

गाडीच्या गतीमध्यें, रस्त्यावर उभा असलेला एखादा मनुष्य पटकन् मागे सरकल्याचा भास होई.

अन् असें करतांना पेट्रोलपंपाजवळ, विकासपूरच्याच टोकाला शहरात शिरण्यापूर्वी तीं केव्हाच पोचलीं. अजयानें गाडी थांबविली. पेट्रोल देणारा इसम पुढें आला. पेट्रोलटांकीचें झांकण उघडण्याकरितां तो मागील बाजूस गेला.

पाऊस आतां थांबला होता. त्यामुळें अवघडलेलें अंग मोकळें करण्याकरितां तीं दोघे मोटारचे बाहेर उतरलीं, त्या वेळेस त्यांना सुखकर गारवा भासला.

" साहेब पेट्रोल तर भरपूर आहे. " तो इसम मागील बाजूनें म्हणाला.

" च् च्! अरे, पण तुला सांगितलं होतं कोणी? टाकींत पेट्रोल नकोच आहे. स्पेअर कॅनमध्यें दे! एक गॅलन पुरे.

" सुटं पेट्रोल कशाला अजय?" शकुन्तलेनें विचारिलें.

" आमचे ते परेड बॅजीस आहेत ना, गरम कापडाचे! ते स्वच्छ करण्याकरितां हवं आहे."

त्याचें हें उत्तर अगदी खरं वाटून शकुन्तला गप्प राहिली.

पांचसहा दिवसांनीं परत शकुन्तला अजयाला भेटली. त्यावेळेस म्हणाली,

" अजय! चांगलाच प्रचार चालविला आहे तुम्ही हं त्या फर्मविरुद्ध!"

" हं! आणि तोसुद्धां अपुराच पडला आहे!"

" म्हणजे? आणखी कांहीं करणार आहांत कीं काय!"

" छे! छे! तोच कायम स्वरूपाचा करूं म्हणजे झालं!"

त्याचें तें बोलणें शकुन्तलेला विचार करूनही नीट समजलें नाहीं.

थॉमस स्मिथ् कंपनीनें आपलें दुकान सुरू केल्यावर आठच दिवस झालें होतें. अन् त्याविषयीं विकासपूरला एकच खळबळ उडाली होती.

वर्तमानपत्रांतून विरोधी अग्रलेख लिहिले गेले होते. विरोधी पत्रकें वांटण्यांत आलीं होतीं आणि दुकानाच्या उद्घाटनाच्या आदल्या दिवशीं तर त्या कंपनीच्याच इमारतीच्या दारावर नि भींतीवर विरोधी पत्रकें न् फलक लटकाविले होते कोणी तरी! आणि या विरोधाला न जुमानतांही, कंपनीनें आपल्या मालाची विक्री सुरू केली होती.

या सर्व प्रकारामुळें विकासपुरात त्या विषयावर बरीच चर्चाही सुरू होती.

अजयाचे वरील उद्गार काय सूचित करतात याचा रात्रीं बिछान्यावर अंग टाकीपर्यंत शकुन्तला विचार करीत होती. पण तिला कांहींच उमज पडेना.

मध्यरात्रीं ती जागी झाली ती मात्र आगीच्या भयसूचक घंटानिनादानें! ती निजली होती, त्या माडीच्या खिडकींतून तिनें रस्त्यावर पाहिलें. आगीचे दोन बंब फायरब्रिगेडच्या माणसांसह जलदीनें गेले. त्यांच्या मागोमाग, कुतूहलानें कांहीं गर्दीही दिसली चाललेली! सर्वत्र धांवपळ

अन् आरडाओरड चालू होती. बिछाना सोडून ती खालीं आली, तों तात्यासाहेबही त्याच विस्मयांत तिला दिसले.

" तात्या, कुठं हो लागली आग ? कांहीं कळलं का ?"

" नक्की समजलं नाहीं. पण जातां जातां एका इसमाला मी विचारलं, तेव्हां त्यानें थॉमस् स्मिथ् कंपनीच्या बाजूला असं सांगितलं. "

" जाऊ येतां का आपण तिकडे ? "

तात्यासाहेबांची संमति मिळतांच ती त्यांच्याबरोबर निघाली.

तीं दोघें आगीच्या ठिकाणावर पोचलीं, तों आगीचा नेहमींचाच देखावा त्यांना तिथें दिसला.

सर्व लोकांची मनस्वी गर्दी उडाली होती. पोलीस त्यांना मागें हटवीत होते. व्यवस्था लावतांना क्वचित् नित्याची त्रास देण्याची वृत्तिही ते दाखवीत होते. एखाद्या जळत्या विशाल गोलांतून बाहेर पडाव्या, तशा ज्वाला कंपनीच्या इमारतींतून बाहेर पडत होत्या. त्या, तीनमजली इमारतीच्या वरती गगनमंडळापर्यंत जात होत्या असेंच वाटे. वेड्याप्रमाणें आग सर्व इमारतीवर पसरली होती. इतकी कीं, थोड्या लांब अंतरावरच ती उभीं होतीं. तरी इतक्या लांबूनहि आगीचा ताप शकुंतलेला जाणवत होता. आजूबाजूची सर्व मंडळी प्रकाशित झाली होती त्या झगझगाटांत; आगीचे बंब आग विझविण्याची पराकाष्ठा करीत होते. बाजूच्या घरांवर पाण्याच्या धारा धरल्या गेल्या होत्या आणि खुद्द कंपनीच्या इमारतीवर दोन बंब खपत होते आग आटोक्यांत आणण्यांकरिता.

तें भयाण दृश्य पाहून त्याच्या उत्पत्तीविषयीं अर्थातच शकुंतलेला जिज्ञासा उत्पन्न झाली. ती त्याविषयीं विचारणार तोंच तिच्यापुढीलच एकजण सांगूं लागला;

" काय झालं माहीत आहे का ? आतां बारासाडेबाराला गप्पा मारून मी परत घरीं जात होतों साधारण फर्लांगावरून मला त्या पलीकडील बाजूच्या दाराशीं उजेड दिसला. म्हटलं चोर आहे कीं काय ! मी पटापट चालत आलों. अन् इथे येतों तों काय ! ती आग थोडी पसरली होती.

आरडाओरड करून मी त्या समोरच्या डॉक्टराना उठविलें. " त्यानें बाजूच्या घराकडे हात दाखवीत म्हटले. "त्यानीं फोन केला अन् इतकं होईपर्यंत हें सर्व झाल." आपल्यापुढील ज्वालाग्राही इमारतीकडे त्यानें पाहिलें नि तो म्हणाला, " अन् गमत पहा. नेमका आज दोन दिवसच पाऊस उघाडला आहे."

सुमारें दोन तासांनीं आग विझविण्यांत आली. तत्पूर्वीच शकुंतला तात्यासाहेबाच्यासह घरीं पोंचली. त्या वेळेस तिला एकच आश्चर्य वाटत होते. आणि ते हे कीं, कोठेंही धोका उद्भवला कीं, आपद्ग्रस्ताना मदत करण्याकरितां त्वरेनें जाणारा अजय आज कोठेंच दिसत नव्हता. इतकेंच नव्हे तर पुढे पांचसहा दिवस तो तिला भेटलाही नाहीं.

त्यानंतर आज सायंकाळीं ती आपण होऊनच जेव्हां त्याच्याकडे जावयाला निघाली. तेव्हां ती खालीं यांच एक इसम तिला दिसला. प्रथमतः तो कोण हें तिच्या लक्षांत आलें नाहीं. परतु थोड्या विचारान्तीं, त्या दिवशींचा पेट्रोलपंपावरील मनुष्य तो हाच हें तिला समजले. तिनें त्याला विचारले,

" काय काम आहे ? "

" काम कसलं बाईसाहेब ? " तो म्हणाला, " बाई, परवा रात्रीं आग लागली तुम्हाला माहीतच आहे. त्या ठिकाणीं पोलीसांना तपासांतीं एक पेट्रोलचा रिकामा डबा अन् एक गोणपाटाचा जळका तुकडा सापडला. त्या फळीच्या दाराशींच, तो दिसला त्यांना ! दुसऱ्याच दिवसापासून त्यांनीं आणखी तपास चालविला. सगळे पेट्रोल पप पालथे घातले त्यानीं; पण तसेलच डबे पपावर पुष्कळ त्याना दिसले. त्यामुळें निश्चित असं त्याना कांहींच कळेना. माझ्याकडेही ते आले अन् त्यानी मला तस विचारलंही."

" बर, मग ? "

" तेव्हां मीं तो माझ्याकडचा नाहीं असंच सांगितलं ! तरी परत त्यांनीं मला त्रास द्यायला सुरुवात केली आहे. तेव्हा पहा, एक पधरा रुपये द्याल तर बरं होईल ! नाहीं तर तो त्रास टाळण्यासाठीं मीं तुमच्या मोटारच नांव सांगून देईन ! "

प्रसंग ओळखून शकुतलेनें पंधरा रुपयाच्या नोटा आणून त्याच्या हातावर ठेविल्या आणि त्याला म्हटलें—

" आतां मात्र अगदीं चूप बसलं पाहिजे ! "

यानंतर अजयाकडे ती पोंचली त्यावेळेस ज्याचा अपराध केला, त्याला प्रथमच भेटतांना वाटणारी भीति त्याच्या मुद्रेवर तिला दिसली.

" अजय परवा आगीच्या वेळेला तुम्ही दिसला नाहीं कुठें ? "

" ह ! मागच्या बाजूनें आग लावायची अन् पुढच्या बाजूनें पाणी घेऊन धावायचं हें नाहीं मला पटत ! "

या उद्गारांवर मात्र शकुंतलेच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला.

" अजय ! म्हणजे तुम्हींच तें केलंत ? "

" छे ! छे ! माझ्या म्हणण्याचा इतकाच अर्थ माझ्या विरोधी प्रचारानेंच तो गुन्हेगार तसं करायला तयार झाला; म्हणजेच पर्यायानें—"

" कांहीं सांगू नका ! सर्व समजलं आहे मला ! आतांच तो पेट्रोल पंपावरचा इसम येऊन गेला. पोलिसांचा ससेमिरा लागला आहे त्या सर्वांच्या मागें. मीं त्यांची मूठ दाबली आहे ! आतां धास्ती नाही. पण अजय, किती उच्छृंखल आहात तुम्ही ! तुम्हीं असं कांही अविचारानं कराल अन् मी दुःखी होईन ! तुम्हाला वाटेल मी स्वतःच्या स्वार्थाकरितां, स्वतःच्या प्रेमाकरिता सांगते हें; पण त्याहीपेक्षां दुसराच विचार सांगायला लावतो आहे हें मला ! तुमच्या असल्या एका चुकीनें, ती चुकी उघडकीस आली, तर किती कार्यहानि होईल माहीत आहे तुम्हाला ! विकासपूरचा हा युवकसंघ किती विसंबून आहे तुमच्यावर ! वास्तविक पुढारीच अनुयायांना असलं कार्यविघातक कृत्य करण्याला प्रतिबंध करणारा हवा ! "

" पटतं तुझं म्हणणं शकू मला ! पण हें तरुणाचं रक्त आहे अन् शिवाय सावधगिरी घेऊनच सर्व केलं होतं मी. "

" तें कांहीं असो ! पण यापुढें तुम्हीं सगळं मला विचारूनच केलं पाहिजे ! "

" असंच होय ? " अजय उद्गारला.

## प्रकरण ८ वें

# अंकुरोद्गम

सोमवारीं शोभना विजयाच्या खोलीवर गेली, ती किंचित् बावरलेल्या अंतःकरणानेच. कांठापासून आंत अज्ञात अशा एखाद्या जलाशयांत चालत चालत जावें अन् त्या वेळेला भीतभीतच पावलें उचलावीं तशी तिची स्थिति झाली होती. आपली ही गति फाजील शीघ्रत्वाची नाहीं ना, अशी शंका मधूनच तिच्या मनाला चाटून जाई. परन्तु ही तिची अस्थिरता विजयाच्या सहवासांत केव्हांच विरून गेली.

कारण विजयाच्या संगतींत विषण्णतेचा थोडासाही भाग तिच्या मनांत येणें शक्य नाहीं असें तिचें मनही तिला सांगत होतें.

ती विजयाचे खोलीवर पोंचली तेव्हां बैठकीवरच आपलें फिडल् दुरुस्त करण्यांत विजय गुंतला आहे असें तिला दिसलें. जवळच त्या तंतु-वाद्याचा बाण पडला होता. तारांची हालचाल करून मध्येंच तें तो हनुवटी डावा हात यांत धरी, त्यावरून बाण फिरवून एखादी गत त्यातून तो काढी आणि ती मनासारखी आली नाहीं असें कळतांच पुन्हां तो बाण बाजूस ठेवून तारांची हालचाल करण्यांत गुंग होई.

शोभना येतांच हातांतलें फिडल्ही टेबलावर टाकीत, तिला जवळच्या कॉटवर बसण्यास सांगण्याच्या उद्देशानें तिकडे त्यानें हात केला.

"तुम्हांला यातलंही अंग आहे वाटतं?" बसतां बसतां शोभनेनें प्रश्न केला.

"कां? त्यांत आश्चर्य काय वाटलं तुम्हांला?"

"नाहीं, सभामधून वीरश्रीनें भाषण करतां तुम्ही अन् या कोमल तंतु-वाद्याशीं तादात्म्य पावतां; विश्वास बसायचा नाहीं चटकन्!"

"खरंच आहे तुम्ही म्हणतां तें ! पण हें शास्त्र मी स्वतः होऊन नाहीं शिकलों. आमच्या दादाच्या आग्रहानें शिकायला लागलं मला तें. मॅट्रिक-मध्यें असतानाच पहिल्यांदा फिडल् हातांत धरलं मी."

विजय असें बोलतो आहे तों शोभना कॉटवरून उठली, टेबलाजवळ गेली आणि इतक्या वेळपर्यंत तें विजयानं नीट दुरुस्त केलं होतें तसंच टेबलावरून तिनें तें उचललें.

एका हातानं तो बाण तिनें फिरविला आणि दुसऱ्या हातानें तारा वळल्या. कसला तरी किरटा आवाज निघाला त्या वाद्यामधून अन् मग तीच हसून म्हणाली,

"काय झालं विजय ? अगदींच वाईट लागलं असेल ना तुमच्या कानाला ?"

"अर्थात् ! तुमच्या या कोमल बोटांतून असे विसंवादी सूर निघतील ही अपेक्षा असेल का कोणाची ? त्यामुळें अपेक्षाभंगानें अधिकच अप्रिय वाटलं तें !"

विजयानें तें वाक्य कसेंतरी संपविलें नि मग त्याच्या मनांत आलें कीं, आपण असं बोललों नसतों तर बरें झालें असतें. त्या बोलण्यामुळें शोभनेला आपण फार पुढं गेलों असें वाटत नाहीं ना, अशा संशयानें त्यानें तिच्याकडे पाहिलें.

तिच्या मनावर त्याचा परिणाम त्याला दिसला नाहींच. उलट तीच चटकन् म्हणाली,

"हो ना ! मग दाखवा ती तुमच्या पराक्रमी बोटाची करामत !" असें म्हणतांना पराक्रमी या शब्दावर तिनें जोर दिला.

शोभनेकडे ओठ किंचित् उघडून हसत पहातच त्यानें फिडल् हातांत घेतलें.

सर्रकन् रागविस्तारसूचक अशी एक तान वाजविली अन् मग त्यानें गाणें वाजविण्यास सुरुवात केली. शोभनेला सूर ऐकू येऊं लागले—

"फुलल्याऽऽकळ्याऽऽप्रेऽमाऽऽऽच्याऽऽऽऽ, फुलल्या कळ्या"

विजयानें कदाचित् दुसरेंच गाणें मनांत धरून ती चाल वाजविली असेल; परन्तु शोभनेला मात्र हीच ओळ तत्क्षणीं आठविली त्या चालीसरशी.

अन् तिनें म्हटल्याप्रमाणेंच त्याच्या त्या प्रभावी बोटांच्या स्पर्शसुखाचें समाधान पावूनच जणूं कांहीं एकसथपणें त्या तारा कंप पावत होत्या. त्या सुरेल तंतुनिनादांत शोभना इतकी रमून गेली कीं विजयाच्या ध्यानांत तें येईल, हा विचारसुद्धां त्याच्या त्या बोटांच्या हालचालीकडे नि त्याच्या तोंडाकडे अधून मधून पहातांना तिच्या मनांत आला नाहीं. अधोगत हनुवटीमुळें भ्रुकुटीच्या संनिध अशीच त्याची दृष्टि शोभनेकडे पहातांना वळली होती अन् गाण्याची शेवटची लकेर वाजवून जेव्हां एखाद्या कुशल वाद्यकाराप्रमाणें त्यानें बाण काढला तारांवरून, त्या वेळीं वरील गाण्याची ओळच विजय परत गुणगुणला.

आपला तर्क बरोबर ठरला याचा सूक्ष्म आनंद शोभनेला मनांतल्या मनांत झाला. विजयानें नेमकें तेंच गाणें वाजवावें याचें आश्चर्य तिला मुळींच वाटलें नाहीं. कारण त्याच्या मनांतही तीच आपलेपणाची भावना तिजविषयीं होती, हें नन्तरच्या त्याच्या भाषणावरून तिला चांगलेंच कळलें.

"फार छान फिडल् वाजवितां हं तुम्ही!"

"हं! माझ्या अनेक आनंदापैकीं फिड्ल्वादन हा एक आनंद आहे."

"आणखी कुठच्या आवडी आहेत तें तरी कळूं द्या एकदा!" शोभना चटकन् म्हणून गेली.

या तिच्या जिज्ञासेवर कपाटांतून एक लहानसा छायाचित्रांचा संग्रह काढून विजयानें तिच्या हातांत दिला.

त्यांतील एक छायाचित्र त्यानें जरा वेळापूर्वीच फिडल् वाजवितांना घेतलें होतें कीं काय असा भास झाला शोभनेला, कारण, अगदीं तसेंच तें होतें थेट. नंतर तिनें पटापट तीं सर्व छायाचित्रें चाळलीं. एकांत तो पोहण्याचा पोशाख घालून एका तलावाच्या जलपृष्ठावरच सरसर हात मारीत होता. दुसऱ्यांत गांवढळ लोकांचा समुदाय त्याच्यापुढें जमला होता नि त्याच्यासमोर आवेशानें तो व्याख्यान देत होता. मग तिनें इतर सर्व

छायाचित्रें पाहिलीं नि पुन्हां त्या शेतकऱ्यांच्या जमावाचें छायाचित्र तिनें उघडलें. त्या चित्राकडे पहात तिनें विचारलें,

"हें कोणत्या ठिकाणचं आहे ?"

"माझ्या कर्मभूमीचें ! इनामगांवचं आहे तें."

"मला एकदां तुमचं गांव पहायचं आहे. फार वाहवा ऐकली आहे माझ्या मैत्रिणींकडून तुमच्या कार्याची ! त्या समुदायासमोर बोलतांना पहायाचं आहे तुम्हांला !"

"असं ! मलाही माहीत आहे तुम्हीं फार छान बोलतां तें. सभेमध्यें तुम्ही बोललांत–"

"सभेमध्यें ? छे ! नाहीं म्हणाला कॉलेजच्या वादविवादसभेमध्यें भाषण केलं आहे मीं पुष्कळदां."

"तेंच म्हणतो मीं; मग उद्यां संध्याकाळच्या सभेमध्यें बोला ना आमच्या !"

"विषय कोणता आहे ?"

"विषय ? अगदीं सोपा आहे; नुसत्या 'हिंदुस्थान' या विषयावरच बोललांत तरी चालेल. इतकीं उपांगं आहेत आपल्या राष्ट्राला–संस्कृति, इतिहास, धर्म, प्रचलित राजकारण—"

"राजकारण ?" डावा पंजा आपल्या तोंडावर टेकीत शोभनेनें विचारलें.

"हो कां ? राजकारण म्हटलं म्हणून घाबरलांत कीं काय ?"

"छे छे ! पण मी अजून कधींच बोललें नाहीं प्रकट सभांतून—"

"म्हणूनच आज सुरुवात करा म्हणतों ना !"

विजयाचा तो आग्रह तिला जरा पार पाडण्यास धाष्टर्याचाच वाटला. कारण, दुसऱ्या दिवशीं संध्याकाळपर्यंत तें कार्य पार पडेल कीं नाहीं याचीच तिला शंका होती. परन्तु तिचें त्या दिवशींचें भाषण इतकें सुरेख झालें कीं घरीं परत येतांना विजयानें तिची फारच स्तुति केली.

"आजचं तुमचं भाषण मीं आतांपर्यंत ऐकलेल्या चांगल्या वक्तृत्वापैकीं एक म्हणून राहील माझ्या ध्यानांत;" तो म्हणाला.

" बोलण्याचं भय मला कधींच वाटलं नव्हतं; पण राजकीय विषयावर मी अजून बोललें नव्हतें; त्यामुळें वाटत होतं कीं, कस काय होईल."

" अन् हें तुमचं यश इथेंच थांबायचं नाहीं; सार्वजनिक कार्यकर्त्याला जनमत तयार करायला वक्तृत्वासारखं साधन नाहीं दुसरं. मला फार वाटतं कीं, तुम्हींही त्याचा असाच उपयोग करावा."

विजयाचे वरील उद्गार चारपांच दिवसपर्यंत शोभनेला एकसारखे आठवत होतेच पण नन्तर एके दिवशीं त्यांचें दोघांचें जें बोलणं झालें त्यामुळें विजयाप्रमाणेंच कांहीं तरी कार्य करण्याची अनिवार इच्छा शोभनेच्या मनांत उत्पन्न झाली. अन् सार्वजनिक कार्य करण्याचा तिच्या इच्छेचा अंकुरोद्गम वाढीस लागण्यालाही चांगला वाव मिळाला. विजय म्हणाला,

" इनामगांवचं कार्यही अपुरं वाटूं लागलं आहे मला. त्या दिवशीं मी जवळच्याच दोन तीन खेड्यांत हिंडलों. अन् आतां वाटूं लागलं आहे, कीं इतकी तयारी पुष्कळ आहे."

" कशाकरितां ?" शोभनेनें प्रश्न केला.

" विणकामाचा जोडधंदा शेतकऱ्यांना शिकवायला. पांच सात दिवसांतच योजना आंखणार आहें मी. मला वाटतं माझ्या अपेक्षेप्रमाणें सर्व जमलं, तर पंधरा एक दिवसांत तें सर्व जमेल. एखाद् महिन्यानें इथें लहानसं ग्रामोद्योगाच्या कापडाचं भांडारही चालेल. आजूबाजूच्या बऱ्याच शेतकऱ्यांना इथें माल पाठवायला सांगितला म्हणजे झालं."

" कशाच्या साहाय्यानें तयार केलेलं कापड असणार तें."

" सुतापासून विणकामापर्यंत सर्व शेतकऱ्यांच्या झोपडींत तयार होणार, चरख्यापासून टकळीपर्यंत सर्व यंत्रावरचं सूत असणार तें."

" चरखा ?" ओठावर ओठ दाबीत, आठ्या घालीत शोभनेनें विचारलें.

" हो. का ? आणखी खरंच आहे, कीं अशी एक समजूत झाली आहे आपल्यांत, कीं गांधींचं–मत तें कांहीसं अगो–वळण असायचं. पुष्कळ बाबतींत मलाही तें पटतं; परन्तु या चरख्याच्या मागचो आर्थिक साहाय्याची

बैठक मात्र भक्कम आहे. ते म्हणतात तें अगदीं सत्य आहे. चरख्याच्या जोरावर हिंदुस्थान बराच वर येऊं शकेल."

"उद्यां लढाई सुरूं झाली तर त्याच्याच जोरावर रक्षण करूं शकूं आपण आपलं, असंही म्हणाल ! अहो, विदेशीयांनीं तोफा डागल्या हिंदुस्थानावर उद्यां, तर काय तुम्ही त्यांच्यावर चरख्याचं सुदर्शनचक्र सोडणार कीं टकलीचं मोहनास्त्र ?" मिस्किलपणें शोभना हंसली.

"या बाबतींत मीही तुमच्याच मताचा आहे. परन्तु ग्रामोद्धाराला मात्र हातकामाचें सूत कांतणें हा एक प्रमुख धंदा आहे एवढीच मी चरख्याची योग्यता समजतो. कारण, हिंदुस्थानच्या शेतकऱ्याचा कर्जाचा बोजाच इतका मोटा आहे कीं त्यांत थोडी काट झाली तरी बरीच स्वस्थता मिळेल त्याला. सरकारधाराच किती खाऊन जातो त्याचं उत्पन्न !"

"हो ! तुम्ही हें म्हणालात म्हणून बरी आटवण झाली. याच कारणाकरितां धारावंदी करण्याचा विचार आहे रतनपूर संस्थानांतल्या शेतकऱ्यांचा. कालच तिथल्या कार्यकर्त्यांनीं लिहिलं आहे मला."

"तुम्हांला ? हं ! हं ! माहीत आहे तें मला."

"तें कसं ?"

"तुमच्या वडिलांकडूनच समजलं तें मला ! नांव काय त्यांचं ? नाना ना ? नेरळलाच दिसले मला ते ! तेच बोलत होते त्याविषयीं."

"हो ना ? फार मोठं वादळ होणार आहे त्या संस्थानांत एखाद्या महिन्यांत. शेतकऱ्यांची तिथली एकजूट वाखणण्यासारखी आहे बरं का ! एक परिषद लवकरच भरविण्यांत येईल अन् मग त्या महाराजांना अंतिमोत्तर मिळेल."

"बरोबरच होईल तें. कोण महाराज आहेत तेथले ?"

"महाराज ? चांगले शिकलेले आहेत. पण ते कधींच संस्थानांत नसतात आतां सुद्धा, उन्हाळ्यांत काश्मीरांत म्हणून गेले ते उत्तर हिंदुस्थानातच आहेत अजून. अन् त्यांच्या बदसल्लागारामुळेंच शेतकऱ्यांचे हाल चालले आहेत संस्थानांत !"

विजय नि शोभना यांची अशा तऱ्हेची चर्चा नेहेमीच चालूं असे. त्यांचा हा परिचय पुढील वीस पञ्चवीस दिवसांत बराच वाढला.

एखाद् दोन वेळां गप्पा मारल्याशिवाय दिवसच जातनसे त्यांचा. यासंबंधीं आजूबाजूच्या विद्यार्थ्यांत बरीच चर्चा सुरू झाली होती. खुद्द शोभनेच्या मैत्रिणीही याला अपवाद नव्हत्या. आज शोभना कॉलेजमध्यें मुलींच्या खोलींत जों पाय टाकते तों आजूबाजूच्या सर्व मैत्रिणी-मध्यें हास्यलकेरींची एकच लाट उसळली. मग ती यायच्या अगोदरच त्यांचा तसला वादविवाद झाला होता कीं काय कुणास ठाऊक. शोभनेनें समोर पाहिलें तों, ज्यू. बी. ए. च्या वर्गांतील एक ठेंगणी पण गोरीपान मुलगी आपला चतकोरभर रुमाल तोंडावर दोन्ही हातांनीं दाबदाबून हास्याचे उमासेच्या उमासे देत होती. पलीकडेच पिंगपॉंग टेबलावर खेळ खेळण्यांत आपण दंग आहों, असें दाखविणाऱ्या दोन मुली त्या हास्यकल्लो-ळांत शोभनेची चर्या कशी दिसते तें पहाण्याकरितां मधूनच आपली बॅट् उजव्या हातांत धरून तीवर डाव्या हाताचा पंजा ठेवीत खेळ थांबवून उभ्या रहात होत्या. त्यांनीं असें करायला न् शोभनेनें तिकडे पहायला जेव्हां एकच गाठ पडली, तेव्हां त्या परत एकदां हंसल्या आणि खेळण्यांत दंग झाल्या. शोभनेला हा काय प्रकार आहे तें कांहींच कळेना. त्यामुळें तिनें सर्वजणी आपल्याकडेच पाहून हंसत आहे हें ओळखून आपल्या कपड्यांतच कांहीं व्यंग नाहीं ना, अशा संशयानें पातळावरून उगीचच हात फिरविला, केस सावरल्यासारखें केलें आणि उजव्या बाजूनें वळून मागेंही पाहिलें तरी तिला कांहींच कळेना.

" माले, या बाईसाहेबांना काय झालंय " द्वितीय वर्गांतील एक नकटी न् बुटकी मुलगी आपल्या जवळच्याच मुलीचा खांदा हलवून हंसत म्हणाली.

" इश्श ! खरंच." त्या मुलीनेंही आपला डावा हात शोभनेकडे पहात तोंडावर झांकला.

त्यांचा हा गोंगाट उगीचच आहे असें समजून तिकडे दुर्लक्ष करीत वैतागानें पुस्तक काढून शोभना वाचीत बसली.

खोलींतला हंसा मग बराच कमी झाला; इतका कीं, खिडकीकडे पाहून कांहीं मुलें आपापसांत कॉलेजच्या पुढील पटांगणांत बोलत होतीं, त्यांचा संवादही शोभनेला ऐकूं आला.

" किल्ली संपली वाटतं फोनोची ? " एक जण म्हणाला.

" तर ! किलबिल् संपली ती उगीच ? " दुसरा म्हणाला आणि त्या विद्यार्थ्यांतही मग हंशा पसरला. वर्गाच्या तासाची इतक्यांत घंटा झाली नि शोभना मग आपल्या वर्गांत गेली. पण तास सुरू झाल्यावर वर्गांतही तिचें लक्ष प्रोफेसरमहाशयांच्या शिकवण्याकडे नव्हतें. तिला वाटलें—

' काय घाणेरडी वृत्ति आहे ही ! बरा कोणा दोघांच्यांत परिचय वाढला कीं झाली यांची टीका सुरू. '

याच वेळेस मग तिच्या मनानें विचारलें, ' काय, तुझा आणि विजयाचा हा नुसता परिचय आहे ? प्रेमाचा मुळींच संबंध नाहीं यांत ? '

त्यावर तीच मनांत म्हणाली, 'हो, आणि प्रेम असलं म्हणून काय झालं ! मग तर हा निरुपयोगी उपहास आहे निव्वळ ! उघड उघड पवित्र आणि शुद्ध प्रेमाचं महत्त्व जणूं कांहीं चोरट्या अनीतीच्या प्रेमाविष्काराच्याच जोडीचं; उलट, प्रेम—तेंही विजयासारख्या हुशार न् पराक्रमी पुरुषावर मी करतें याचा अभिमान वाटेल मला ! '

मधल्यासुटींत परत जेव्हां त्या मुलींचें संभाषण तिनें ऐकलें, तेव्हां त्यांचा रोख आपल्यावरच आहे हेंही तिला कळलें.

" यंदां कोण बनरल चँपिअन येणार ? " एकीनें विचारलें.

" मला ग काय माहीत ? हिला विचार. " शोभनेला डिवचत् दुसरीनें उत्तर दिलें.

" काय ग, शुभा " कोण येणार चँपियन यंदा ? पहिलीनें सांथ केली. " अग शुभा काय सांगणार ! विजय पटवर्धनच म्हणणार ती ! "

" नाहीं, मग काय तुम्ही येणार होय ? " रागानेंच शोभनेनें त्या मुलीला विचारलें.

" इश्श ! रागवायला काय झालं त्यांत ! "

" रागवायला कांहींच झालं नाहीं हें कबूल, " शोभनेनें सुरवात केली, " फक्त तुमच्या मनोवृत्तीबद्दल कींव येते हेंच खरं. एखाद्या मनुष्यानें आपल्याला पूज्य अन् आदरणीय वाटणाऱ्या व्यक्तीबद्दल जिव्हाळा दाखवला

कीं त्याचा विपर्यास तुम्ही त्यांचं प्रेम आहे यांत करणार ! बरं, समजा त्यांचं प्रेम असलं एकमेकावर तरी त्यांची टर उडवण्यासारखं त्यांत काय आहे ? पवित्र प्रेम प्रकट असलं तर त्याची शुद्धता अधिकच वाढते. लपून छपून प्रेमपत्र लिहिणारी नि आपले चोरटे चाळे चालविणारी व्यक्ति तुमच्या मतें चांगली, असंच ही तुमची वृत्ति सांगेल ! सुशिक्षित म्हणविणाऱ्या तुम्हींच असं करूं लागला, तर तुमच्या शिक्षणाविरुद्ध नाक मुरडणारे तुमच्याविरुद्ध केव्हांही ओरड करतील तर काय आश्चर्य ? अनुरूप मित्राची निवड करणं हें, जन्मभर ज्याचं तोंडही पाहिलं नाहीं, त्याच्या निवडीपेक्षा केव्हांही चांगलंच ! "

शोभनेच्या या उद्गारांवर मात्र मग त्या साऱ्या सुशिक्षित (!) स्त्रिया गप्प बसल्या.

त्या दिवशीं सायंकाळीं गांवाबाहेर शोभना विजयासमवेत फिरायला गेली, तेव्हां आपण आपल्या आयुष्याच्या वसंतऋतूंतच वावरत आहों असेंच भोंवतालच्या फुलोर सृष्टीला पाहून तिला वाटत होतें. सृष्टिदेवता आपलें आकर्षक हिरवें लेणें ल्याली होती. आपल्या परिवाराच्या वैभवाला साजेल अशाच प्रकारचा विविध फुलांचा सडा तिनें आजूबाजूला टाकला होता. क्षितिजापलीकडून रविराज आपल्यावरील आड येणारें मेघपटलाचें आवरण दूर करण्यांत यश न आल्यामुळेंच कीं काय त्या अरुंद अभ्रपटलाच्या खालीं झटकन् क्षितिजावर जी एक चिंचोळी मोकळी पट्टी होती तींत शिरला. त्या पीतांबराच्या आकर्षक सुवर्णरंगांत काहीं विहंगम आपापल्या शक्तिप्रमाणें भराऱ्या मारून येत होते. मग थोड्याच वेळांत तेथेंच निबिड अंधःकारांत रजनीच्या सांनिध्यांत आपणास रहावें लागेल याचा त्यांना अंदाज होता कीं काय कोण जाणे !

सुवासिक नि प्रलोभनीय पुष्पसमूहाच्या बाजूला हारित पर्णसमुच्चय फडकत असावा त्याचप्रमाणें शोभनेच्या मुखमंडलाच्या समंतात् वाऱ्याच्या झोक्यांत रंगणाऱ्या तिच्या पातळाच्या पदराचा परिवार होता. आणि तिच्या या प्रेक्षणीय वैभवविस्ताराचा पल्ला वाढविण्याकरितांच पदराच्या दशा अधिक

त्यावर लावलेल्या दिसत होत्या. सध्यासमयींच्या त्या दिनकर न् रजनीच्या संयोगाच्या कालांतरांत शोभना व विजय हीं दोघही परिचय नि अबाधित मैत्री याच्या सीमेवरच प्रेमाच्या रेषेवर रमत होतीं. प्रेमाच्या साम्राज्यांत खेदाच्या माडलीक राजाना मज्जाव असतो. त्यांच्या त्यावेळच्या एकान्तांत आजूबाजूच्या अडचणींना किंवा आयुष्यातील इतर दुःखांचा मुळींच विचार नव्हता. परन्तु वैयक्तिक खिन्नतेचा विचार सोडला तरी समोरूनच धांवत जाणाऱ्या एका खेडवळ मुलावरून त्याच्या गुजगोष्टींचा कल साहजिकच जीवनाच्या विषमतेच्या विचाराकडे वळला.

"किती आनदांत आहे हें पोर!" शोभनेनें त्याच्याकडे बोट दाखवित म्हटलें.

"बालपण आहे ना? वडिलांच्या कृपाछत्र मुळें विषम समाजरचनेची धग लागते आहे कुठें त्याला? यांच्या पोटावर अन् श्रमांवर श्रीमंतांनीं ऐषआरामी हवेल्या बाधाव्या अन् याचीं मुलें मात्र दारिद्र्याच्या जन्मसिद्ध शापानीं तशीच राहावीं! गढूळ पाण्यांत आघोळ हाच याचा जलविहार. पहिल्या दोन पुस्तकांचं वाचन हेंच याचं शिक्षण अन् आर्थिक गुलामगिरींत पिचणं हेंच जीवनसर्वस्व! पण हें असंच चालायचं. सुखवस्तु अन् चैनी लोकांच्या उंचीवरील हवेल्या अन् दारिद्र्याच्या गर्तेतील गरिबांच्या दुबळया झोपड्या यांत हा विषमतेचा चढ पसरलेला असायचाच. समाजरचनेंत बदल हाच एक उपाय आहे याला."

"म्हणजे, भाई लोकांचं तत्त्वज्ञान मान्य आहे तुम्हांला?"

"छे छे! रशिया म्हणजे परब्रह्म मानून नाचणारा मी नाहीं! हिंदुस्थानांतली स्थिति रशियांतल्या स्थितीहून बरी निराळी आहे. पण किती झालं तरी तेंही एक तत्त्वज्ञान आहे. मानव्य, विश्वबंधुत्व वगैरे गोष्टी फार दूरच्या आहेत. परतु तें सोडलं तरी दीन जनता अशीच हालअपेष्टांत पडून राहावी हें मला मान्य नाहीं. श्रीमतांच्या सुखसोयींत काट मारूनही यांना न्याय्य ती सवलत दिलीच पाहिजे अन् त्यांना त्यांच्या हक्कांची जाणीव करून देण्याला शिक्षण हा एक बराच गुणकारी उपाय आहे."

" सज्ञानता म्हणजे संपन्नता नव्हे ! "

" ज्ञानानेंच आपल्यावरील छळाची अन् आपल्यांतील आवश्यक सुधारणांची त्यांना जाणीव होईल. हिंदुस्थानचं भाग्य पुष्कळसं शेतकऱ्यांच्या उठावणीवर अवलंबून आहे. इनामगावाकडे ह्याच दृष्टीनें मी पहातो. एक गाव उठवून काय होणार ? असं विचाराल तुम्ही, पण त्याला उत्तर एकच कीं, पहिलं गाव विजय उठवील. मग मागील वाट दुसऱ्यांना मोकळी राहील. '

चित्रविचित्र आकाराचे नि रंगाचे ढग आकाशांतून फिरत होते. थोडथोड्या वेळानें त्यांची चाळवाचाळव होई, सूर्यप्रकाशाचा कोन बदलला जाई आणि मग प्रकाशकिरणांचा समुच्चयही भिन्नतेनें चमके.

" किती मजेदार देखावा दिसतो आहे नाहीं ! " शोभनेनें विजयाला विचारिलें.

" जवळची शोभा सोडून निसर्गाचं सौंदर्य पाहण्याइतका मी कांहीं अरसिक नाहीं ! "

" हो ! कांहींतरीच ! " मान वेळावीत तिनें लटका अभिनय केला. तो विजयाला मोठा मोहक वाटला. तिचे स्वैर कुंतल पाहून कृष्णकमळाच्या श्यामलवर्णीय जिवतंतूंची वायूच्या सान्निध्यांतील हालचाल आठवली त्याला. हृदयाची पडछाया मुद्रेवर पडत असते ना ? निरामय प्रेमाच्या ज्या सुप्त लहरी शोभनेच्या अंतःकरणांत कंप पावत होत्या, त्यांचा परिणाम म्हणूनच बहुधा तिच्या मुद्रेवर चंचल छटा पडलेली विजयाला दिसली. तिच्या काळ्याभोर नि किंचित् टपोऱ्या डोळ्यांची आपांगेही अगदीं शुभ्र नसून त्यांत अल्पसा निळीमा पसरलेला भासला त्याला. तिनें अंगांत घातलेल्या काळ्या ब्लाऊजची तिच्या स्कंधप्रदेशावरील कड ज्या स्थलावर संपत होती तिथूनच त्या रंगाच्या अंतिम विरोधाच्या वर्णाचा तिचा मांसल भुजदंड अधिक शोभिवंत दिसत होता. तिच्या अंगावरील क्षणोक्षणीं ढळणारा पदर तिनें एकदां घट्ट लपेटून घेतला व ' काय ग ऽ तरी हा वारा बाई ' असें म्हणत विजयाच्या अंगाजवळच ती सरकली. आपल्या प्रेमदेवतेच्या त्या पवित्र सौंदर्याच्या निरीक्षणांत विजय इतका गुंग होता. परंतु भावनांचा कळकळाट

तसाच चालू ठेविणें त्याला अशक्य झालें. म्हणूनच त्यांचा आविष्कार करण्याकरितां आपल्या वामस्कंधावर मस्तक टेकून बसलेल्या शोभनेकडे तो दृष्टीनेंच वळला अन् तिच्या रेशमी केशभारावर आपला कपोलभाग रेलून थोडा वेळ थांबला. त्याच्या या कृतीनें संतृप्त होऊन काढलेल्या शोभनेच्या एका हुंकारानें तो त्या सौख्यसमाधींत अधिकच गुंग झाला.

सूर्यानें आपले डोळे मिटले. क्षितिजाखालीं पळालेल्या भास्कराचा शोध लावण्याकरितां तमराजांनीं आपला प्रभाव सर्व अंबराच्या कानाकोपऱ्यांत पसरला आणि त्याखालीं बरा वेळापूर्वीच शोभायमान दिसणारी ती टेकडीही आपला काळोखाचा बुरखा आपल्या अंगावर ओढून स्वस्थ बसली.

'चलायचं ना? किती अंधार पडला हा!" विजयाची ती सौख्यसमाधि शोभनेच्या या वाक्यानें थोड्या वेळानें भंग पावली.

"मी केव्हांच निघणार होतों! पण तूंच मला घुटमळत ठेवलंस इथें!

"तें काय विचारतां!" मोहक खळ्या गालांवर प्रकट झाल्या तिच्या.

"परवांच स्विमिंग कॉंपिटिशन्स आहेत आमच्या." विजयानें नंतर तिला सांगितलें.

"म्हणजे? एवढ्यांत आल्या कीं काय?"

"हो! पण एवढ्यात कुठच्या! चांगला ऑगस्टही संपत आला ना? पण तेंही खरंच आहे! मनःस्थितिच कालाची लांबी ठरवीत असते."

तो असेंच म्हणत आहे, तोंच तीं दोघें उठलीं. गांवांत शिरतांना, टोकनाक्याच्या वळणावरून रस्त्याला लागल्यावर शोभना विजयाला म्हणाली—

"विजय, तुम्हीं किती दिवसांत घरीं आला नाहींत आमच्या!"

"होतं आहे खरं असं."

"आज रात्रीं याल? काकांना सांगून ठेवते घरीं रहायला! अं?"

"अच्छा!" असें उत्तर देऊन विजयानें शोभनेचा निरोप घेतला.

रात्रीं विजय शोभनेकडे पोंचला, तो दारांतच काका त्याला भेटले. ते म्हणाले—

"काय हो? आज आठवण झाली होय आमची?"

"नाहीं; पण परवां मी आलों होतों, तेव्हां तुम्ही घरांतच नव्हता!"

"अहो, आमच्या ऑफिसचं ऑडिट् सुरुं आहे ना? त्यामुळें मला वेळ नव्हता फार! आमच्या बँकिंग् खात्यांत असा त्रास असतो कांहीं वेळां; पुढें मिळणाऱ्या मोकळिकीच्या आशेवर, स्वतःचं सौख्य डिस्-काऊंट्नें घ्यावं लागतं अशा वेळीं!" मान हलवून हंसत काकासाहेब म्हणाले. त्यांच्याजवळ दुसरें कोण बसलें आहे, हे पाहतांच, ते रामभाऊ होते असे विजयाला कळलें.

"यांना तुम्ही ओळखतां?" रामभाऊंना विजयाकडे हात दर्शवीत काकासाहेबांनीं विचारलें.

"वा, म्हणजे चांगलेच; हे आमच्याच गांवचे!" रामभाऊ उत्तरले.

"असं कां? छान्! आमच्या शोभनेचा न् यांचा चांगला परिचय जमला आहे!" काका म्हणाले. पण त्याकडे आपलें लक्षच नाहीं असें शोभनेने दाखविलें. काका पुढें म्हणाले "चांगले आहेत! हुशार आहेत, पराक्रमी आहेत, चळवळे आहेत! अहो, या तरुणांनीं जर आपापसांत जमवून घेतलं तर आमची तरी काय हरकत आहे?" नंतर विजय अन् शोभना यांचेकडे आळीपाळीनें हात दाखवीत काका म्हणाले, "मी तर नानाला सांगणार, कीं बाबा रे तुला तरी कुठें होणार आहे संशोधनाची दगदग?" तेव्हां सूचितार्थानें काकांचें हे बोलणें चालू असतांच शोभनेनें विजयाकडे पाहिलें. "चमितलंत? काय धूर्त आहेत काका आमचे?" असेंच विचारीत होती ती त्याला न बोलतां!

"काय म्हणतां?" रामभाऊंनीं आपले डोळे विस्फारिले, "यांचा तुमचा असा संबंध आहे का? हंऽऽऽ!" हें कांहीं प्रशस्त नव्हे अशा अर्थानें रामभाऊ हंसले.

का? काय हरकत आहे?"

"हरकत? यांनाच विचारा! यांचं इनामगांवचं जीवन? गरीबांना हे आपल्या कुटुंबाप्रमाणें आश्रय देतात अगदीं!" रामभाऊंनीं आपली नापसंति दर्शविणारी अशी वाक्ययोजना केली. त्या दिवशींचें इनामगांवचे

त्यांचें बोलणें आठवलें विजयाला! त्याची दृष्टि चपापली! काकांनीं नि शोभनेनें आपल्याकडे न्याहाळून पाहिलें अशी शंका आली त्याला! थोतांड कां होईना पण उगीच रामभाऊ भरकटायचे कांहीं तरी तिथें अन् आपल्या अमृतमय जीवनांत मिठाचा खडा पडायचा थोडा वेळ! विजयाला वाटलें. कारण अंतीं त्याची विशुद्धता पटलीच असती सर्वांना, असा त्याचा आत्मविश्वासच होता.

हा सर्व प्रकार इतका चटकन् झाला कीं काकांनीं जणूं सर्व कांहींच झालें नाहीं असें दाखविलें नि सारवासारव केली—"अहो सार्वजनिक आयुष्य म्हणून ना! बा मग आमच्या शोभनेला तर हौस आहे फार त्याची."

"तें पुरें झालं तुमचं काका बरं का?" शोभनेनें त्या बोलण्याविषयीं नापसंति दर्शविली.

"बरं आहे! तेव्हां काय विजय! हे रामभाऊ मी अन् हिचे नाना," शोभनेकडे त्यांनीं बोट दाखविलें, "एकाच शाळेत लहानपणीं शिकलों. पुढें नाना घरींच राहिले, आम्ही ह्या बँकिंग नि अकौंटन्सीकडे बी. कॉम्. होऊन वळलों अन् हे—"

"त्यांचं माहित आहे मला!" जरा चिडूनच विजयानें उत्तर केलें. त्याचा आवेश पाहून तो प्रकार काय होता तें इतर कोणालाच कळलें नाहीं!

"हो तुमच्याच गांवचे हे! तेव्हां तें ठीकच आहे." परत एकदां काकांनीं सांवरून घेतलें नि मग इतर बऱ्याच गप्पा झाल्या त्या सर्वांच्या! रात्रीं घरी येऊन अंथरुणावर अंग टाकतांना, शोभनेच्या मनांत एक शंका आली, पण तिनेंच समाधान करून घेतलें आपलें—

"माझे विजय, असे कधींच असणार नाहींत." ती म्हणाली.

---

प्रकरण ९ वें

# रहस्याचा एक दुवा

सकाळीं पोहण्याचा दंगलीत भाग घ्यायचा म्हणून लवकर उठायचें याच हेतूनें आदले दिवशीं विजय लवकरच झोंपी गेला. आदल्याच दिवशींचा त्याचा नि शोभनेचा संक्रमित जीवनक्रम आठवून आज त्याचें मन पूर्णपणें समाधान पावलें होतें. निरतिशय समाधानाच्या मनःस्थितींत तो गाढ झोंपला होता. पहांट केव्हां झाली हेंही त्याला कळलें नाहीं. चित्तवृत्ति तल्लीन करणारा उषेचा प्रकाश खिडकींतून आंत येत होता. त्या वेळेस खिडकी-जवळील आपल्या मृदु शय्येवरील मऊ उशीवरच आपलें मस्तक चाळवून त्यानें खिडकींतून पलीकडे पाहिलें! उजळत्या दिशेला सोनचांफ्याचें झाड आपला पुष्पसंचय विखुरलेला असाच हालवीत होतें. टेबलावरील गजराच्या घड्याळाची टकूटक् चालूंच होती अन् शेजारच्याच खोलींत नेहमींप्रमाणें दूध घालून जाणाऱ्या भय्यानें दुधाच्या बरणीचा खडखडाटही त्याला ऐक-विला; उठायला अजून थोडा अवकाश आहे असें समजून आपल्या पाया-लगतचा लाल रंग त्यानें अंगावर ओढला, एका कुशीवर तो वळला, नि एका अल्पशा, गुलाबी थंडीतील साखरझोंपेंत तो दंग झाला.

थोड्याच वेळांत सूर्यकिरण आपल्या असंख्य हातांनीं आपल्याला उठवीत आहेत असेंच त्याला वाटलें. खिडकींतून दिसणाऱ्या वैद्यांच्या घराच्या कौलारा-वर अंगणांतील झाडांची छाया मागें पुढें झोंके घेत होती. डाव्या बाजूच्या गुंतुऱ्याचा लाल चुटुक पुष्पसंभार आपल्या टवटवीतपणानें उठून दिसत होता. पोपटाचीं चिमणीं पोरें आपला आवाज काढीत होतीं जवळच्याच पेरुच्या झाडावर अन् वर्तमानपत्र विकणाऱ्या मुलाचा, रस्त्यानें लांब लांब ऐकू येत जाणारा पत्रांतील मथळ्याचा ओरडाही त्याला ऐकूं आला.

पांघरुण बाजूला फेकून देत तो कॉटवर उठून बसला. उजव्या हाताची बोटं डाव्या हाताच्या बोटांत अडकावून हात ताणून त्यानें एक जांभई दिली नि आपल्या मलमलीच्या अंगरख्याचा मागचा भाग दोन्हीं हातांनीं नेहमीं प्रमाणें खालीं ओढीत तो उठला. धोतराचा सोगा नीट खोंचला त्यानें अन् खोलीचें दारही उघडलें.

प्रातर्विधी आटोपून खोलींत आल्यावर आपले पोहण्याचे कपडे काढीत तो बसला होता; तें संपवून तो जेव्हां परीटाकडून आलेल्या शर्टला गुंड्या लावीत येरझारा घालीत होता, त्या वेळेस त्याच्या पायांतील खडावांचा एक-सारखा आवाज होता. मधूनच आपल्या पायांच्या आवाजानें बाहेरूनच कोणीतरी दारापर्यंत आलं आहे असं त्याला वाटे. दूधवाल्यानें आणलेलें दूध पातेलींत घेऊन परत दार लोटून न टाकतां तें त्यानें तसेंच उघडें ठेविलें अन् स्टोव्ह पेटवून त्यावर दूध तापत ठेविलें.

परत आरशासमोर तो आपले केंस सांवरीत असतांच त्याला शोभनेचें प्रतिबिंब दिसलें. दाराच्या चौकटींत उभी होती ती; तिचे निसर्गतःच लाल असलेले ओठ प्रातःकालच्या तरतरीमुळे अधिकच शोभिवंत दिसत होते. रुंद नि मोहक कपाळावर कांहीं केस स्वैरपणे बागडत होते. उजव्या हातानें पातळाचा पदर ती पुन्हांपुन्हां सांवरून घेत होती, वक्षःस्थलावरील किनारीचा तिचा ब्लॉऊज त्यामुळें झाकला जाई. पातळाचा पदर धरलेला उजवा हातच वर आपल्या मुखकमलाकडे नेऊन, आपल्या येण्याकडे यांचें अजून कसें लक्ष नाहीं याचच आश्चर्य करीत, तो हात तसाच उलटा तिनें तोंडावर ठेवला होता. वरील ओठ खालील ओंठावर दाबून त्यावर त्या हाताची दोन बोटें ठेवून ती हंसत होती. तिच्या गालांवर त्यामुळें अस्फुटशा खळया प्रकट होण्याच्या बेतांत होत्या. गुलाबाच्या प्रफुल्लतेपूर्वीच्या कळ्याच जणूं कांहीं! तिच्या उजव्या हातांतील सोन्याची बांगडी कोपराकडे सरकली होती आणि खिडकींतील सूर्यकिरणांमुळें चमकणारी तिच्या कानांतील कुडयांची झांक तिच्या कानशिलावर पडली होती.

तें प्रतिबिंब पहाण्यांत विजय मग्न होता.

खोलीच्या भिंतीशेजारीच स्टोव्हची घरघर चालू होती. लालसर झाक-णीवरील बाजूस वळत्या सूर्यकमळाच्या पांकळ्यांप्रमाणें ज्वाला पसरत होत्या आणि त्यांचेंच उलटें प्रतिबिंब खालील पितळेच्या टांकीवर उमटलें होतें, तें बरोंच वांकडें तिकडेंच.

"सौंदर्योपासन चाललं होतं वाटतं!" शोभनेनंच शांततेचा भंग केला.

"सौंदर्याचं निरीक्षण चाललं होतं!" आपला डावा गाल किंचित् वर चढवीत हंसण्याच्या संवयीचा अवलंब केला विजयानें अन् टेबलाजवळीलच खुर्ची जरा पुढें ओढून 'या ना' असें तिला तो म्हणाला.

"तुम्ही एवढे सुंदर आहांत?" खुर्चीवर बसतां बसतां शोभनेनें प्रश्न केला.

"कुणास माहीत! पण तुमचं प्रतिबिंब तरी सुंदर आहेच ना?"

"मी तिथें किती वेळची उभी होतें; पण तुमचं लक्ष कुठं होतं तिकडं?"

तिच्या उंचावलेल्या उजव्या भुवईकडे पहात विजयानं उत्तर दिलें.

"माझ्या पाठीला डोळे नाहींत!"

"पण पुढं तरी आहेत ना! आरशांतच मी आलेली दिसायला हवी होतें!"

"इंद्रधनुष्याचं मोहक दृश्य सोडून तें सूर्याचं प्रतिबिंब म्हणून, सूर्य पाहायला कोणी कांहीं क्षितिजाखालीं धांवत नाहीं!"

"क्षितिजापलीकडे राहूं द्या, पण दारापर्यंतही धांवायला नको होतं! इथेंच बांधली असती इथून." या तिच्या विनोदावर मग विजयानें स्टोव्ह विझविला.

शोभनेनें खोलीभर दृष्टि टाकली. त्या वेळेस फळीवरील पुस्तकांची ओळ पाहून पाहून तिचे डोळे त्यांच्या नांवावरून फिरले "आमचा हिंदुस्थान;" 'Body Beautiful,' 'Aids to Body-Building,' 'Patriot India' इत्यादी नावें तिनें वाचलीं नि म्हटलें—

"बरींच पुस्तकं जमवलीं आहेत तुम्ही!"

"हो. विश्रांतिच्या काळांत माझ्या कार्याला पोषक असें वांच वाचतो

ती. उलट सुलट विचार कळतात; एखाद् वेळेस चांगली भरही पडते आपल्या माहितींत."

टेबलावरचीच मासिकें उचलून शोभनेनें चाळलीं नि तिच्या हातांतील मासिकांतील एका चित्राकडे पाहात ती म्हणाली, "मी ज्योतिषी नाहीं पण आज एकदम स्फूर्ति आली आहे मला ज्योतिष सांगायची!" असें म्हणून ती हंसली अन् गालावर खळया उमटल्या तिच्या!

"कोणाचं?"

"कोणाचंही! तुमचंच सांगू? आज तुम्ही पोहण्यात पहिले येणार! अन् मग मला कॉफी मिळणार त्याबद्दल. आणखी सांगूं? आज तुम्हांला कोणाच तरी निमंत्रण आलेलं असणार!"

"यापैकी पहिलीं दोन ठरलेलींच होतीं. तिसरं मात्र खरच ओळखलंत बुवा तुम्हीं! हें पहा! परवां तुम्हीं विचारलं होतं ना? तेंच मनीं चालून आलं आहे. रतनपुरविषयीं आपण बोलत होतो! तिथल्या शेतकऱ्यांच्या परिषदेचा मीं अध्यक्ष व्हावं असं मत आहे त्या कार्यकर्त्यांचं! सप्टेंबर अखेर आहे ती परिषद्"!

"हो ना! मग काय वाईट आहे? वा! चांगलंच!" आपला त्यांत मुळींच हात नाहीं, असें दाखविलें तिनें!

"अन् तुमच्या कालच्या समारंभाचं काय झालं?" विजयानें प्रश्न केला.

"वा! किती झोकांत झाला तो! कुठच्या खड्यांत व्याख्यान ठरवलंत न् आयत्या वेळीं चुकल्यासारखं झालं मला. प्रथम टाळयांच्या गजरांत आम्ही दोघी चढलों स्टेजवर अन् एका कोपऱ्यांतून आवाज आला, "दोन गुलाब!" त्यावर खूप हंशा पिकला. शकुन्तलाबाईंनी हें चांगलच लक्षांत टेवलं होत. असं दिसलं! आपल्या भाषणाच्या सुरवातीलाच हसत त्या म्हणाल्या, "तुम्ही मला गुलाब म्हणालात! पण काट्य शिवाय सैंपाक नाहीं न् काट्याशिवाय गुलाब नाहीं. म्हणूनच मी तुम्हाला एक कटु जाणीव करून देणार आहे!" यावरही पुन्हां हंशा उटला. तेव्हां मात्र गंभीर होऊन त्या म्हणाल्या. "आपण हंसत; पण याच वृत्तीनं आपण सगळीकडे हास्यास्पद ठरतां,

प्रत्येक कार्यांत जबाबदारी न् गांभीर्य टाळून चालणार नाहीं!" यावर मात्र सर्वत्र स्तब्धता झाली अन् नन्तर चांगलें चाळीस मिनिटें उत्तम प्रकारें त्यांनीं त्यांचे विचार धिटाईनें मांडले!"

"लागलीच गेल्या वाटतं त्या?"

"इश्श, हो! अन् माझ्या खोलींतला तुमचा फोटो पाहिल्यावर म्हणतात कशा, कीं, यांच्यासारखाच एक मनुष्य आहे विकासपूरला! आणि तुमचा पोहण्याच्या तयारींतला तो फोटो घाईघाईनेंच त्यांनीं न्याहाळून पाहिला. पण पुढें बोलायला मुळीं वेळच नव्हता आम्हांला! लागलीच त्या रवानाहीं झाल्या! कारण त्यांना मुंबईलाही जायचं होतं प्रथम!"

"माझ्यासारखा मनुष्य विकासपूरला आहे! बरं आहे! जायचंच आहे लवकर तिकडे!"

"तें कशाकरितां?" हातांतलें मासिक टेबलावर टाकून शोभनेनें विचारिलें.

"वा! येत्याच नाताळांत इलाखा ऑलिंपिकचे सामने आहेत ना?"

"अन् हें पाहिलंत का?" असं म्हणून आपल्या दैनंदिनींतील पहिल्याच पानावरील एक छायाचित्र त्यानें दाखविलें तिला कपाटांतून काढून!

"हें काय?"

"माझ्या लहानपणचा फोटो आहे तो?"

"पण? एकाच मनुष्याचे दोन फोटो कशाला जपून ठेवले आहेत?"

"एकाचेच नाही आहेत ते!" शोभना बसली होती त्या खुर्चीच्या पाठीवर हात ठेवून तिच्या हातांतील फोटोकडे वांकून पहात विजय म्हणाला, "यांच्यामागें एक दुःखद घटना आहे. माझा हा सख्खा भाऊ आहे. एकाच वेळीं जन्म झाला आमचा. दुर्दैवानें माझी आई त्या बैलगाडीच्या प्रवासांत एकाकी सांपडली अन् त्या भयाण रात्रीं माझा विश्वासू गडी, जो अजूनही आमच्याकडेच आहे, तो असूनही त्याच्या पराक्रमाचा निभाव लागला नाही!" मातेच्या स्मृतीनें विजयाचे मन द्रवलें. शोभना स्तब्धच होती. विजय पुढें म्हणाला—त्यानंतर सकाळीं बेशुद्धींतून आई शुद्धीवर आली.

तो एकटा मीच गाडींत होतों; अन् तो गडी ! माझा हा भाऊ–अजय त्याचं नांव–आदल्या रात्रीं त्या चोरांच्या हल्ल्यांत कुठं त्यांनीं नेला कुणास माहीत ! त्यांनीं आम्हां सर्वांना भूल दिली असं आई म्हणत होती. अन् ती भानावर आली त्या वेळेस हल्ल्याच्या जागेपासून दोन तीन मैल आम्हांला पुढं आणून सोडण्यांत आलं होतं. परत मागं जाऊन तपास करतां तिथं कोणीच नव्हतं असं कळलं त्यांना ! दीड वर्षाचा होतो सारा मी तेव्हां ! तेव्हापासून माझ्या वहिनीनं वाढवलं मला ! वहिनीनेंच ही सर्व हकिगत मला सांगितली ! अजयाच्या विरहानें आई नंतर एखाद् वर्षाच्या आंतच निवर्तली ! " शून्य दृष्टीनें बाहेर पहात विजय म्हणाला.

भाषणाचा ओघ एकदम या दिशेला गेला हें शोभनेला कसेंसेंच वाटलें. विजयालाहि तें प्रशस्त वाटेना ! म्हणून त्यानेंच हंसून तो बदलला. दोन्ही मांड्यांवर थापट्या मारून तेच हात पुढें पसरीत तो म्हणाला,

" बर, जाऊं द्या ! झाल्या गोष्टी होऊन गेल्या ! "

अन् असं म्हणून ते फोटो त्यानें पुन्हां नीट ठेवून दिले.

" बरेच हार घालून घेतले असतील त्या बाईनीं ? अन् त्या बरोबर तुम्हींहि ? " कोट चढवीत विजयानें प्रश्न केला.

' बायका हार घालून घेत नाहींत ! दुसऱ्यांना घालतात फक्त ! '

" तें कुणास ठाऊक ! बोलण्याच्या कामांत तुम्ही हार खाणार नाहीं हें बाकी खर ! '

" होऽऽ ! " मान हालवीत शोभना मनापासून हंसली.

तलावावर तीं दोघें पोचलीं त्यावेळेस तलावाच्या बाजूची सर्व जागा प्रेक्षकांनीं फुलून गेली होती नुसती ! चित्रविचित्र रंगाचें प्रदर्शनच भरलें होतें तेथें ! कॉलेजांतील मुलांच्या आवडीचे निरनिराळ्या रंगांचे कोट, मुलींच्या हौशीचीं पातळें, या सर्वांच्या प्रत्येक नमुन्याचें प्रातिनिधीक दालन होतें तें जणूं ! थोडा आरडाओरडा तेथें होत होता यांत कांहीं नवल नाहीं; पण तलावाच्याच टोंकाला विजयाच्या कॉलेजांत एकजात श्रीमंत बापाचे चिरंजीव असलेल्या पांच सात जणांचे जें एक टोळकें होतें

नि ज्याचे ध्येय खाना पीना; खेलना और मजा करना, हेच होते, त्यातील एक काळसर मुलगा जोरानें ओरडला सुद्धा विजयाच्या नांवानें. मात्र असे करण्यात अनादराचा मुळींच आवाज नव्हता त्याचा. कॉलेज-मधील प्रत्येक विद्यार्थ्यास विजयाबद्दल आदरच वाटत असे.

"कोण हे? हं ह! माहीत आहे! काय मोठ्यानं ओरडतात हे! अन् त्याचा तो सूट! डोअरकीपरच म्हणायचं कोणी!" शोभनेने त्या मुला-कडे पहात म्हटलें.

"म्हणायचं काय! त्याचं ते टोपणनांवच आहे त्या मंडळींत!"

दोन पंचाची, सीमा ठरविण्याकरिता दोरी बांधण्याची खटपट चालली होती एकीकडे! तर सुरवातीच्या इषाऱ्याचा बार एकदां चांचणी म्हणून काढून पहात होते एक पंच; तलावातील लहान लहान जलतरंग हालत होते; पाणी इतकें स्थ होतें म्हणूनच तलावारील एका बाजूचे तीन मजल नि तेथलीच शिडी पाण्यात उलटी प्रतिबिंबित दिसत होती. आका-शाचा टोपही उलटा पसरला होता. एका बाजूला मुद्दाम कोंडून ठेवलेल्या माशाची हालचाल थोडा खळबळ करी तेव्हां त जलपृष्ठ विलोल होतें काय तें. पोहण्याचा पोशाख चढवून शिडीवर पाय ठेवण्याकरिता जातानाच जवळील शोभनेला "शुभ, हें धर ह जरा!" असे म्हणत हातावरील सोन्याच्या घड्याळाची साखळी सोडून ते विजयाने तिच्या हातात दिलें. त्याच्या त्या आकस्मिक एकेरी संबोधनामुळें शोभनेनें मंदस्मित केलें.

"अधिकारच आहे तुम्हाला तसं म्हणायचा! नि त्यांत मलाही अभि-मानच वाटेल स्वतःच्या या पात्रतेविषयीं," असेच सुचवावयाचें होतें तिला का कोणास माहित!

त्या लवचिक शिडीच्या हालत्या पायऱ्यावर सरसर पाय टाकीत, उजव्या हातानें मधूनच केंस सांवरीत आणि परत शिडीच्या बाजूला त्याच हातानें आधार घेत सर्वांत वरच्या मजल्यावर विजय जाऊन थमला. त्याच्याच खालच्या पुढें आलेल्या मजल्यावर बहुतेक मुली उभ्या होत्या आणि त्यातच शोभनाही उभी होती.

" Competitors, follow in!" पंचानीं आक्रोश केला.

सुरुवातीच्या निशाणाचे रेषेंत एक आडवी दोरी धरलेली होती. तिच्या दुसऱ्या बाजूला सर्व पोहणारे युवक गेले. त्याच्या त्याच्या मित्रानीं स्फुरणदायीं उद्गारांनीं त्यांचें स्वागत केलें.

याच वेळेस तलावाच्या चोहोंकडून 'बक अप विजय!' म्हणून एकच हुल्लड उठली. टाळ्यांचा गजर झाला. या ओरडींत मघांचा दामलेचाही आवाज होताच!

उच्च मजल्यावरून विजयानें तीरासारखी उडी मारली, तेव्हां जलतुषार उडाले आणि भिजलेल्या रंगीत कापसाप्रमाणें सप्तरंगाचा समूह हवेंत तरंगला. शर्यतीस सुरवात झाल्यावर ठरलेल्या दोन फेऱ्यांच्या शेवटीं विजय अजूनही मागेंच आहे हे पाहून तो प्रथम कसा पोंचणार या पेचांत शोभना होती. दुसरी फेरी अर्धी संपविली इतरांनीं, तरी विजयाची अजून पहिलीच पुरी व्हावयाची होती. त्यामुळें ती, याचा उलगडा कसा करायचा, याचा विचार मनांत करते आहे तोंच विजयाचे हात पाण्यावर भराभर पडूं लागले. नावेमागें तिचा माग पसरटपणें पाण्यावर रहातो, तसा विजयाच्या पायापाठीमागें जलविस्तार पडत होता; आणि हां हां म्हणतां क्षणांत बहुतेकांच्या तो पुढें झाला. लवकरच एकजण कसाबसा हात मारीत होता, त्यालाही त्यानें मागें टाकलें! विजयानें शर्यत जिंकली. असल्या चढाओढींत शेवटीं ज्याचा दम अधिक तोच विजयी हेच या सर्व प्रकारानें शोभनेला कळलें.

प्रेक्षकसमुदाय ओसरू लागला. कपडे करून शोभनेकडे विजय निघाला. मुख्य रस्त्याला तो लागला तोंच मघांचा तो काळसर मुलगा त्याला भेटला. उजव्या हातांतील पिशवी दुसऱ्या हातांत धरीत तो म्हणाला, "Congratulations Vijay," ('विजय, तुझं अभिनंदन असो!")

"Thanks!" आभार आहेत आपले असें म्हणून शोभनेकडे पहात विजय तिला म्हणाला, याचं नांव दामले! फार चांगले ऑर्गनायझर आहेत बरं का! बरंच कार्य केलं आहे दलितोद्धाराच यानीं सोन्यापूरच्या बाजूला.

माझ्या योजनेचाही शेतकऱ्यांत फार प्रसार केला आहे ह्यांनीं; आणि यांचं नांव " असें म्हणत विजय शोभनेकडे हात दर्शवीत दामलेकडे वळला.

" माहीत आहे मला ! " हंसत दामले उत्तरला, " म्हणजे तो खडकीचा अपघात, तो हाच ना ! " त्याच्या वाक्याचा हंसतच स्वीकार करीत दामले गेल्यावर विजय म्हणाला,

" फार गमत्या आहे हा दामले ! जरा अवखळ आहे. एखादा फाजील धीट आणि दांडगाही म्हणेल त्याला ! पण असलींच माणस नीट उपयोग केला तर कार्यही करतात चांगलं, याचं दामले उत्तम उदाहरण आहे ! मीं पहिल्यापासूनच त्याला हेरला, अन् आतां त्याच्या कार्याचा बराच परिणाम दिसतो आहे त्याच्या प्रांतांत. "

यावर, आपलें दामलेविषयींचें आश्चर्य प्रगट करीत शोभनेनें विचारिलें,

" काय प्राणी आहे ? आणि याच्या हातांत ती पिशवी कशाला आतां या वेळेस ? "

" वा ! तें तर त्याचं वैशिष्ट्य आहे ! कुठेंही जा, पहिल्या टर्मभर कॉलेजच्या वर्गाव्यतिरिक्त हा ' रिक्तहस्तें ' कधींच नसायचा. "

आपल्या चुटुकदारपणाची हंसून आपणच स्तुति केली विजयानें नि तो म्हणाला—

" आज मला दरवर्षीपेक्षा जास्त आनंद होणार आहे, आजच्या यशाबद्दल ! "

" तें का ? " विस्फारीत नेत्रांनीं शोभनेनें आपली अजाणता व्यक्त केली.

" कारण ! तुम्हाला होईल म्हणून ? "

" माझा आणि तुमचा काय संबंध ? " प्रश्नाचा जोर दाखवितांना आवाजांत जो एक कंप उत्पन्न होतो तो झाला तिच्या शेवटच्या शब्दांवर !

" सबंध नाहीं; पण लवकरच होणार आहे. " हातरुमाल खिशांतून काढून तोंडावरून फिरवीत विजय म्हणाला. " बरं आतां घरींच जायचं का एकदम ? "

" नाहीं तर काय ? रस्त्यावरच थांबायचं ? "

" थांबू नये ! पण थांबायला लागणार आहे तुमच्या मोहक हास्यानें !"

" तर तर ! " आंवढा गिळून म्हणाली, " चटकन् कुठच्या तरी इमारतींत शिरलं पाहिजे मग तुम्हांला; कारण माझ्या हास्यावर कांही मी हुकुमत चालवूं शकत नाहीं या वेळेस. पोटांत आनंद मावेनासा झाला कीं हास्य उमटायचंच. "

" हो ! मी तेंच म्हणतों आहे ! रीगलमध्यें कॉफी घेऊं अन् मग घरीं जाऊं ! " असें म्हणून शोभनेकडे त्यानें पाहिलें. तिनें मानेनेंच सम्मति दिली.

रीगल रेस्टॉरंटच्या पायऱ्या चढतांना भिंतीवरील, समोरील आरशांत पडलेलें आपलें प्रतिबिंब त्यानें पाहिलें. रेडिओच्या यंत्रावर लावलेली एक कर्कश तबकडीहि त्यानें ऐकिली नि 'दोन इसम पांच पैसा,' असा आकार सांगणाऱ्या पोऱ्यांचा आवाज, टेबलावरील कांचेच्या एका रुपयाचा आवाज, इराणी धन्यानें रुपया वाजवितांना पुन्हां केलेला तसलाच आवाज आणि परत दिलेल्या पैशाची खळखळ हीही त्यानें ऐकिली,

स्पेशल रूमचे दार लोटून विजय आंत शिरला, 'बसा,' म्हणून शोभनेला त्यानें खुणावलें, नि तो कांहींतरी बोलणार तोंच दारावरील 'engaged या अक्षरांची पाटी बाहेरील बाजुला उलटवीत हॉटेलमधील पोरगा विचारता झाला,

" क्या लावूं साब ? "

" दो कॉफी और बिस्कीट केक्स ले आव !' विजय म्हणाला. परन्तु विजयचे हे शब्द संपेपर्यंत तो पोऱ्या तिथें नव्हताच ! शेवटचा शब्द पाकखान्यांत पोचल्यावर ऐकूं आला असेल त्याला !

आपल्या यांत्रिक सफाईनें टेबलावरील कांचेवर कॉफीचे कप नि इतर पदार्थ फिरवींत ठेवतांना, नेहमींप्रमाणेंच 'मजा करणारीं हीं फुलपाखरें कशीं खेळत आहेत पहा,' असा विचार आला असेल त्या मुलाच्या मनांत !

कॉफीचा कप पुढें करून नि दुसरा स्वतः घेऊन विजय म्हणाला,

" किती उल्हास वाटतो असल्या हॉटेलांत नाहीं ? नाहीं तर ते तुमच्या मुंबईच्या उपहारगृहांतील एकलकोंडं वातावरण, रस्त्यावरील ट्रॅम गाड्यांचा

गोंगाट, मोटारींच्या पोंगाचा आवाज ! शांतता कशी वाटतच नाही तिथे ! तेंच इथे पहा ! आजूबाजूची ही मोकळी जागा, प्रशान्त वातावरण-किती मजा वाटते ! इनामगावला काहीं काहीं वेळां जायचंच आहे मला ! आजूबाजूच्या एकीकडच्या खेड्यात दोन मित्राना बरोबर घेऊन जावं, दिवसभर चार ठिकाणीं सुधारणा करण्याचा प्रयत्न करावा, घरीं येऊन सावकाशपणं पोटभर जेवावं अन् निवांतपणाच्या त्या आयुष्याचा आनंद चाखावा ! खेडगावची रहाणी निराळीच काहीं झालं तरी ! ”

“ आमच्या नेरळलाही असाच रमणीय प्रदेश आहे. माथेरानच्या तांबड्या मातीच्या रस्त्यावरून लांब लांब फिरण्यात किती मौज असते ! हवेंत दिवाळीच्या दिवसांत बेताचाच गारवा असतो. डोंगराच्या निळसर वनश्रीला एक हिरवट रंग आहे हें समजत नाहीं लाबून ! आणि अशा सृष्टिसौंदर्याच्या भरीव प्रदेशांत तुमच्याबरोबर चार दिवस घालवायला आनंदच वाटेल मला ! नानाही बरं वाटेल ! गल्याच सुट्टींत तुमचं पत्र आलं त्या वेळेला म्हणाले ते, “ शुभा, तुझे हे विजय मला दाखविले पाहिजेस हं तूं ! माझ्या संम्मतीनेच झालं पाहिजे सर्व ! ” आणि त्यांच्या त्या उद्गारावरून ते स्वतः खो खो हसले ’ असं म्हणून कॉफीची शेवटली बशी शोभनेनें उचलली.

“ आणखी कोण आहे नेरळला तुमच्या ? ”

“ तुमच्या नाहीं तुझ्या ! ’

“ बर बरं ! ” शोभनेच्या इच्छेचा स्वीकार करीत विजय म्हणाला.

“ नेरळला ? माझा भाऊ सुधीर ! फार चुणचुणीत आहे बर का ! आमच्या घरातील जुनी स्वयंपाकीण बाई ! कारण तुमच्याप्रमाणेंच मलाही मातृसुखाला लहानपणींच आंचवावं लागलं ! नि मार्चमध्येच आमच्याकडे लागलेला गणू ! ”

“ गणू ? ” विचार करीत विजय म्हणाला.

“ हो ! का ? आमच्या मागच्या आंबराईत एक दिवस सायंकाळीं निजली होती स्वारी ! नानानीं हें पाहिलं. विचारपूस करता त्यानें आपलं नाव सांगण्याचं नाकारलं ! तसं करताना त्या लपवालपवीच्या मागचं दुःखच

त्याला तें लागू देत नव्हतं हेंच खरं असं वाटलं नानांना! सहा एक वर्षां-पासून घरातून तो बाहेर पडला. कोणाच्या तरी सांगण्यावरून तो एके ठिकाणीं गडी म्हणून राहिला. तिथें त्याला फारच काम पडे! म्हणून तिथून जी स्वारी निघाली ती एका स्टेशनवर थोडे दिवस हमाल म्हणून काम करीत होती. अन् त्याचाही कंटाळा आला, तेव्हा माथेरानला सामानाचा नेआण करण्याच्या कामाकरिता चालला होता तो. नानांनीं त्याला विचारलं, 'माझ्याकडे रहातोस? जेवायचं खायचं अन् मामुली काम करायचं! थोडं फार काम देईन महिन्याला मी!' तो कबूल झाला. आम-च्याकडे काम तें काय! तेव्हापासून तो आमच्याकडेच आहे. प्रथम वाटलं होतं; पण चांगला आहे, प्रामाणिक आहे."

"घरचं काहीं दुःख असेल बिचाऱ्याला!"

"हो. मीं विचारलं तसं त्याला. मीं म्हटलं, 'घरीं कां रे नाहीं जात तूं?' तो म्हणाला, 'ताई, माझ्या कारभारणीचा मीं फार गुन्हा केला; कुठंच तोंड दाखवूं तिला? विनाकारण सोडून गेलों ना तिला मी!"

"काय म्हणतेस? असा इतिहास आहे याचा?"

विजयाच्या या उद्गारावर उरलेलें बिस्किट मोडून तोंडात टाकीत शोभनेनें आपली खुर्ची उठून मागे सरकाविली अन् तीं दोघेंही घरीं जावयाला निघालीं.

विजयाच्या खोलीजवळ पोंचल्यावर शोभनेनें विचारलें,

"काय जाणार ना रतनपूरला? त्या कार्यकर्त्यांचा आग्रह जाऊ दे एक! पण माझा आग्रह तर?"

हं! म्हणजे तूंच सांगितलेलं दिसतं आहे त्यांना! परवांच म्हणालीस नाहीं का, तिकडे तुझी ओळख आहे म्हणून? अच्छा! जाऊं या की!" विजयानें होकार दिला.

प्रकरण १० वें

# एक पाऊल पुढें !

लक्ष्मी रोडवर नवीनच आलेल्या ग्रामोद्योगवस्तुभांडारांत कधींच न दिसणारी अशी गर्दी आज दिसत होती. तशी विक्री व्हायला आज कोणता राष्ट्रीय सप्ताह होता किंवा काय महोत्सव होता? परन्तु पुष्कळ सडे फटिंग लोक त्या भांडारावरून सायकल घेऊन पुढें जातांना भांडारांत पाहात, पुन्हां सायकल मागें वळवीत अन् एखादी खादीची टोपी किंवा रुमाल अशी अल्पशी का होइना खरेदी करून पुढें जात! भांडारांत शिरण्याचा त्यांचा हेतु काय असेल तो असो, परन्तु त्यांतून खालीं उतरण्यापूर्वी मात्र त्यांच्यातील कांहींजण, निदान कॉलेजविद्यार्थी तरी कांहीं विशेष आपापसांत बोलतांना दिसत होते आज.

अशाच विद्यार्थ्यांपैकीं दोघेजण त्या भांडारांत शिरले. त्यापैकीं एकाच्या हातांत, ते परतले त्या वेळेस खादीचें दोन वार कापड दिसत होतें अन् दुसऱ्याच्या डोक्यावरील काळी टोपी जाऊन खादीची टोपी तिरपी बसवलेली होती. खालीं येतांच आपल्या सायकली त्या दोघांनीं उचलल्या व सायकलवर बसतां बसतां तो पहिला विद्यार्थी दुसऱ्या विद्यार्थ्याला म्हणाला,

"बाळ्या, पाहलेंस लेका! मी प्रथमपासूनच तुला म्हणत होतों कीं, तीच आहे म्हणून! नांवसुद्धां काय आहे पण! शोभना."

"सिरली खरी बुवा आपली! परन्तु मला आपलं वाटलं, कीं ती कशाला या दुकानांत विक्री करण्याकरितां येते! अजून हिंदुस्थानांत स्त्रिया इतक्या धीट झाल्या नाहींत कीं अमेरिकन् युवतींप्रमाणें त्यांनीं नोकऱ्या

करान्या ! अन् म्हणूनच तसं म्हटलं मीं तुला. अन् हिंदुस्थानात नवरेही इतके सुधारक नाहींत कीं तसं त्यांनीं बायकांना वावरू द्यावं !"

"मी गेल्या वर्षीपासून मुंबईलासुद्धा चोवलत होतों कीं लेका ! मीं सांगितलं नव्हतं तुला, कीं ही हिंदुस्थानची दुसरी मॅडम् कामा होणार म्हणून ? परवांच्या सभेंतलं भाषण ऐकलंस• नाहीं तूं ! काय आवेशाचं भाषण झालं तें !" समोर आलेल्या मनुष्याला, घंटा वाजवून बाजूला होण्यास खुणवीत पहिला विद्यार्थी म्हणाला.

"पण काय रे ! या राजकारणांत पडण्याची स्फूर्ति कोणी दिली हिला ?"

"वा ! तुमच्या कॉलेजमधला विजय पटवर्धन माहीत आहे ना ?"

"बरं, मग ?"

"त्याचा कपूच आहे एक चळवळ्या लोकांचा ! त्याची करामत आहे ही !"

"असं !" असें म्हणून तो दुसरा आपल्या घराजवळ उतरला.

त्या दोघांमध्यें शोभनेविषयीं जें बोलणें झालें तें खरेंच होतें ! अन् म्हणूनच सायकाळीं विजयानें शोभना आल्यावर तिला विचारलें,

"त्रास झाला ना मीं म्हटल्याप्रमाणें ? तरी सांगत होतों मी, कीं, येत्या आठ दिवसांत बरीच विक्री करून या भाडारांतून जितकी रक्कम देता येईल तेवढी रतनपूरच्या शेतकऱ्यांना त्यांच्या लढ्याला मदत म्हणून द्यायची, असं जरी ठरलं असलं, तरी तू त्यांत भाग घेतला नाहींस तरी चालेल."

"तुम्हींच सगळं बोलून टाकतां, तेव्हां मी काय सांगणार ?" उजव्या हातांत धरलेल्या पदरासहीत तो हात पुढें पसरत शोभनेनें विचारिलें.

"मीच म्हणतों ! म्हणजे तुला मुळींच त्रास झाला नाहीं !"

"मुळींच नाहीं !"

"किती विक्री झाली आज ?" खिडकीच्या कठड्यावर हात तसेच ठेवून आपली रस्त्यावरील दृष्टि मात्र मागें शोभनेकडे वळवीत विजयानें विचारलें.

"एकंदर दोन अडीचशे रुपयांची."

"बरीच झाली की!"

"हं!" शोभनेनें हुंकार दिला. "तुम्ही जाणार म्हणता रतनपूरच्या; पण आजच निघालेला हुकूम माहीत आहे ना तुम्हाला?"

"कसला?"

"संस्थानी अधिकाऱ्याचा? दोन महिने बंदी केली आहे तुम्हाला संस्थानात प्रवेश करायला!"

"अं!" खिडकीपासून खोलींत दूर होत विजय म्हणाला, "असले हुकूम म्हणजे हल्लीं रोजची रड झाली आहे त्या अरेरावाची! आता तर नक्की हुकूम मोडलाच पाहिजे मला! आहेत; अजून दहाबारा दिवस आहेत! तोंपर्यंत वाट पाहायची. पण एकंदर नेहमींची रीत पाहतां हा हुकूम मागें घेतला जाईल असं मात्र मला वाटत नाहीं."

त्या वेळेस विजयानें रतनपूर संस्थानांत निर्बंधभंगाने प्रवेश करण्याचा निश्चय शोभनेला सांगितला खरा; परंतु तिकडे जाण्यासाठीं प्रत्यक्ष निघ-ण्याचा दिवस आला त्याचे आदलेच दिवशीं तें त्याचें मनोवाञ्छित पूर्णतेस जाईल कीं नाहीं याची शंकाच होती. त्या दिवशीं सकाळपासून त्याला थंडी भरू लागली होती. दोन तीन दिवसावर परिषद् आली होती रतन-पूरच्या शेतकऱ्यांची. परंतु अगोदर दोन तीन दिवस जाऊन तेथील परिस्थिति पाहाण्याचा त्याचा विचार होता. तेव्हा तें जरी आता शक्य नसले तरी निदान परिषदेला तरी अध्यक्ष या नात्यानें उपस्थित व्हायचेंच असा त्यानें निश्चय केला होता. त्याच्या आजाराचें वृत्त शोभनेला कळलें तेव्हां तिला थोडा आनंद अन् थोडें दुःखही वाटत होतें. त्याचा संस्थानांतील दौरा, त्याचा सत्कार अन् त्याचें वैभव पहाण्याला ती मुकली म्हणून ती दुःखी होती, तर याच परिस्थितींत आणखी एखादा पराक्रम करण्याची स्वतःला संधि मिळणार यामुळें तिला थोडा आनंद होत होता.

विजयाच्या खोलीवर ती गेली तेव्हां दारासमोरच कॉटवर पिवळसर रंगाची गरम शाल अंगावर घेऊन विजय पडला होता. त्याची मुद्रा निस्तेज

दिसत होती. डोळ्यांची चुरचुर चालू होती. अन् हिंवतापांत वाटणारी नेहमींची अस्वस्थता त्याला भासत होती.

" बरं आहे ना आतां ? " त्याच्याजवळ बसत शोभनेनें विचारले, अन् तिनें त्याच्या कपाळावर आपला उजवा हात लावून पाहिला. " ताप नाहीं दिसत आहे ? "

" हो निघाला आहे असं वाटतं ! " असें म्हणून तिचा हात उजव्या बाजूनं आपल्या हातांत धरीत तो म्हणाला " शुभा, तुझा हात किती गार लागतो आहे मला ! ताप कायमचा निघेल अस वाटत ! परंतु डोकं मात्र थोडस दुखायला लागल आहे ! "

" हो ना ! " उठतां उठता ती म्हणाली. शेजारच्याच स्टूलाजवळ जातांना तिनें विचारिले,

" सकाळपासून कांहीं घेतलंत का तुम्हीं ? "

" दूध घेतलं तेवढंच; त्यावर कांहीं नाहीं ! " तिनें आणलेला दुधाचा ग्लास हातात घेत अन् त्यावरील झाकण काढून टेवीत विजय म्हणाला. " आतां काळजी नाहीं थोडीसुद्धां ! संध्याकाळीं ताप निघालाच पाहिजे ! "

परंतु झालें मात्र उलटेंच ! संध्याकाळीं उलट ताप पुन्हा भरला. विजय त्यामुळें स्वस्थ पडून होता. रात्रीं ताप निघाला अन् आदले दिवसाप्रमाणेंच सकाळीं परत भरला. रतनपूरच्या कार्यकर्त्यांची तार त्याला आतांच मिळाली होती. त्या दिवशीं रात्रीं तरी निदान फार तर निघायलाच हवें होतें त्याला. त्यामुळें शोभनेने तार वाचतांच विचारिलें,

" काय विचार टरला मग ! "

" संध्याकाळीं ताप कालच्याप्रमाणें भरला नाहीं तर मीच जाणार आहे रतनपूरला ! "

" तुम्ही ? असं वेड्यासारखं काय करतां विजय ? " मान हलवीत नापसती दर्शवीत शोभना म्हणाली, " परवां संध्याकाळीच किंचित् अंग मोडून आल्यासरखं वाटत होतं म्हणालांत ! काल तर चारपर्यंत दोनदां ताप चढला; आज सकाळींही तेंच झालं ! अन् तरीही संध्याकाळीं ताप भरला

नाहीं तर रतनपूरला जाणार आहां ? छे ! छे ! हें शक्यच नाहीं ! माझी शपथ आहे तुम्हाला ! तुम्हीं मात्र एकलच पाहिजे ! "

" भलताच आग्रह आहे तुझा ! मला तो संस्थानचा हुकूम धिटाईनें मोडलाच पाहिजे ! "

" हुकूम दोन महिनेपर्यंत आहे तुमच्यावर ! आजच कांहीं अडून राह्यलं नाहीं, तुम्ही गेलां नाहीत तर ! "

" पाहूं या ! मी गेलों नाहीं, तर कोण जाणार ? "

" कोण जाणार ? मीसुद्धां जाईन वेळ आली तर " शोभनेनें चटकन् आपली इच्छा दर्शविली. " मला तरी अशी संधि मिळणार केव्हां ? लहानपणापासून तिथेंच होतें मी. पण आज दोन तीन वर्षे गेलें नाहीं तिकडे ! तेव्हां म्हणते, तें याच मुहूर्तावर जावं ! "

" दामलेला पाठविण्याचा विचार होता माझा प्रथम ! "

" त्यांत काय बिघडलं ? तेही येतील माझ्याबरोबर ! त्यांच्याच प्रांतांतलं आहे तें कार्य ! "

" अजून मी नक्की सांगत नाहीं ! पाहूं काय होईल तें ! "

कर्तव्य अन् प्रकृतिस्वास्थ्य ! दोन मार्ग होते विजयापुढें. हुकूम मोडण्याबद्दल शोभना म्हणाली तेंही खरेंच वाटलें त्याला. परन्तु तरीही पुन्हां एकदां रतनपूरला जायचेंच, असा निश्चय करी थोडा वेळ तो ! त्यामुळें आपण येत नाहीं अशी उलट तार मात्र त्यानें केली नाहीं परिषदेच्या चालकांना !

अन् त्याचा हा निश्चय संध्याकाळपर्यंत कायम होता. यानंतर त्याला तो पुचला नाहीं; कारण नेहमींप्रमाणेंच त्या दिवशींही सायंकाळीं त्याला फार ताप भरला अन् रात्रीं सुमारें नऊ वाजेपर्यंत त्यांतून तो मोकळा झाला नाहीं. त्यामुळें तर तिकडे जाण्यासाठीं त्यानें घातलेली त्याची अटही पुरी होत नव्हती. शोभनेनें आणि तिच्या घरच्या मंडळींनींही मोडता पाय घातला त्याच्या निश्चयाला ! तेव्हां नाईलाज होऊन शारीरिक अस्वस्थता सोसूनही रतनपूरला जाण्याचा त्याचा निर्धार त्यानें सोडून दिला. सकाळींच वास्तविक रतनपूरला तसें कळविण्यास हवें असतां, अजूनपर्यंत विजयानें तें

केलें नाहीं याचा शोभनेला विस्मय वाटला. परन्तु तेंही तावडतोब करून रात्रीच्या गाडीनें रतनपूरला जायची तिनें तयारी केली.

शोभनेला रतनपूरला आघाडीवर जातांना निरोप देण्याकरितां तो स्टेशनपर्यंत गेला होता. प्लॅटफॉर्मवर बराच शुकशुकाट होता. रात्रीच्या गाड्यांनीं नाइलाजानें जाणारीं किंवा जावें लागणारींच माणसें फक्त तेथें होतीं. फलाटावर इच्छित स्थळीं पोंचतांना त्यांच्या वाटेवर एक हमाल त्या गार फरशीवर निजला होता. आपलें बोचकें जवळ ठेवून, एक वृद्ध गृहस्थ त्याच्यापुढेंच बसले होते. वेळापत्रकाखालील बाकावर उत्तर हिंदुस्थानी पोषाखाचा इसमही त्या दोघांनीं पाहिला. अन् मग तीं आपल्या जागेवर पोंचलीं.

"अजून दामले कसा येत नाहीं!" हातावरील घड्याळाकडे पहात विजय म्हणाला.

त्याच्या डोक्यावरील, दुग्धकांचेचा अन् लख्ख प्रकाशाचा विद्युद्दीप त्यांच्यावर झगझगीत प्रकाश टाकीत होता. वरून येणाऱ्या त्या किरणसमुच्चयाच्या मार्गांत आल्यामुळें शोभनेच्या स्वैर कुतलांची छाया तिच्या कपाळावर पडली होती. भुवयांच्या खालीं तिचे डोळे काळसर छायेंतच वावरत होते. जिव्हणीपाशींही तिच्या नासिकेची छाया पडली होती. अन् हंसतांना तिच्या गालावरील खळयाही काळसरच भासल्या विजयाला! बोलतां बोलतां तिनें आपला पदर डोक्यावरून घेतला अन् त्याच हातानें हनुवटीपाशीं दाबून ठेविला. त्या पदराची किनार वरील दिव्याच्या प्रकाशांत तिच्या मस्तकावर लकलकत होती.

"नीट जा हं!"

या विजयाच्या वाक्यावर ठराविक पावलांची फेरी संपवून वळतांना तिनें म्हटलें, "मी कांहीं आजच जात नाहीं आहे रतनपूरला!" अन् असें करतांना वहाणाऱ्या शीतल वायूमुळें तिनें आपल्या शरीराला एक कंप दिला. विजय तिला म्हणाला, "जरा गारवाच वाटतो आहे हं आज!"

"अन् तुम्ही आजारी असूनही, याच गारव्यांत रतनपूरला निघालां

होता. मी गेल्यावर अजूनही निघाल; पण पहा हं ! माझी शपथ आहे तुम्हाला परिषदेंत भाग घ्यायला ! "

" काय तुझा हेका, शुभा ! अजूनही तुला असंच वाटतं ? मी परिषदेंत मुळींच भाग घेणार नाहीं; मग तर झालं ? परवां परिषद होऊन तूं परत आलीस कीं मग वाटलं तर मी जाईन तिकडे ! "

यावर शोभनेचें समाधान झाल्यासारखें दिसलं ! अन् त्यामुळे ती निराळ्याच विषयावर बोलत होती. यानंतर गाडीला आतां थोडाच अवधि होता. फडफडणारा पदर शोभना एकसारखा चाळवित आहे हें पाहून विजयानें विचारिलें, " थंडी वाजते कीं काय तुला ? "

" हो ! थोडी ! पण विशेष नाहीं ! "

या तिच्या उत्तरावर विजयानें आपल्या गळ्यांतला निळसर स्कार्फ सोडला, अन् तो शोभनेच्या गळ्याभोंवतीं लपेटला. त्यानें त्याच्या पुढील दोन भागांची गांठ मारली अन् तसें करतांना, " हं " असें म्हटलें. शोभना मात्र आजूबाजूला कोणी पहात आहे कीं काय, या दृष्टीनें दृष्टि टाकीत होती.

" इश्श, पाहील बरं का कोणी ! " ओठ पुढे आणीत ती म्हणाली.

" मग ? त्यांत काय आहे !–" अन् असें तो म्हणत आहे, तोंच फलाटाच्या एका टोंकावर बिन्य,जवळच दामले त्यांना दिसला. तो जवळ येतांच, विजय म्हणाला,

" काय रे, इतका वेळ तू येतो आहेस कीं नाहीं याचीच वाट पहात होतों मी ! "

टोपी काढून ती हातांत घेत दामले म्हणाला,

" अरे ! असं कसं होईल ? पण म्हटलं, तूं आजारी ! तेव्हां तुम्हालाच यायला वेळ लागेल; तेव्हा एकट अगोदर येऊन काय करायचं, अशा विचारानें आलों नाहीं लवकर ! "

" हं ! तुमची कामगिरी सांगतों ती ऐका. परिषदेपुढ येणारे ठराव तर पास करायचेच; पण कडक शद्बांत, संस्थानी अंमलदारांना निषेधही कळवायचा ! सर्व शेतकऱ्यांना हातघाईची वेळ आली तरीही शांत रहाण्याचा

मंत्र द्या ! एकानें जरी हात उचलला, तरी सर्वजणांवर तुटून पडायला सबब मिळते. संस्थानच्या अधिकाऱ्यांना. मात्र, जर त्यांनीच आधीं आच देण्याला सुरवात केली, तर ज्यानें त्यानें ज्याच्या त्याच्या जबाबदारीवर आपल्यामुळें इतरांना त्रास न होईल या निश्चितीनें प्रतिकार करायला हरकत नाहीं !"

"त्याची काळजी करूं नको !" नेहरू शर्टच्या खिशांत हात घालीत दामले म्हणाला.

"त्याची नाहीं; पण तुझी मात्र काळजी आहे मला ! उगीच उठून कांही भलतं करूं नकोस हं !"

यावर दामले नुसता हंसला.

"तयारी कशी आहे त्या शेतकऱ्यांची ?"

"फारच चांगली संघटना आहे तिथें. गेल्या वर्षीचं पहा ना ! कुस्कर-स्वारीचा वाढदिवस ! सबंध शहरांतून मिरवणुक निघायची होती. आधी-दरच सर्वांनी कळवलं कीं, आमच्या उद्यांच्या सभेला परवानगी द्या; नाहीतर समारंभावर बहिष्कार घालण्यांत येईल ! अन् यात [illegible] सर्व शेतकरी सामील होते—"

तो इतकें बोलत आहेत तोंच लांबवर आगगाडीच्या पुढल्या डिव्यांत खोल फलाटांच्या दुसऱ्या टोकाला पडला. गाडीच्या यंत्राचा वाफेचा फस् फस् आवाज झाला. रुळांचा खडखडाट येऊं आला. उतारूंचा [illegible] झाला. अन् सावधगिरीची सूचना म्हणून पोर्टरनें वाजविलेल्या घंटेचे ठोके पडले. गाडी उभी राहिली. गाडींत बसल्यावर खिडकींतून शोभना विजयाशी बोलत होती अन् जवळच्याच खिडकींतून दामलेही डोकें बाहेर काढून मधून मधून बोलत होता.

"तुम्ही यायचं नाही हं !" शोभनेनें परत आठवण दिली. "परिषदेंत भाग घेतां कामा नये तुम्ही !"

"आम्ही परवाच परत येतो की, विजय !" दामले म्हणाला.

"हो ! कांही निराळा प्रकार घडला नाही तर !" [illegible]

गाडी सुरूं झाली अन् ती लांब गेल्यावर बराच वेळपर्यंत विजय तिकडे पहात राहिला नि मग घरीं जाण्यास निघाला.

संस्थानी रयतेची परिषदेची तयारी चांगलीच होती. गांवोगांवांहून कांसोटीस बांधलेल्या शिळ्या भाकऱ्यांवरही वेळ भागवीत शेतकरी त्या ठिकाणीं चालून आले होते. वाटेल तें होवो, निदान त्यांच्या डोईजड कराचा बोजा तरी पुष्कळ हलका झालाच पाहिजे या कटाक्षानेंच त्या सर्वांनीं वरील कष्ट सहन केले होते. परिषदेची सुरुवात होण्यापूर्वीच, रात्रीं त्या मैदानावर सगळा शेतकरीसमाज जमला होता. त्या पसरलेल्या दीन-दुबळ्या कष्टी जनसमुदायाकडे पाहिलें असतांच त्यांची खरी अवस्था कळत होती. व्यासपीठावर लावलेला एकच दिवा काय तो प्रकाश देत होता! बाकी सर्व बाजूंना चांदण्याचा चंद्रप्रकाश उजळ करीत होता. काल रतन-पूरला पोंचल्यावर परिषदेच्या बहुतेक पूर्वीपासूनच ओळखीच्या कार्यकर्त्यांना शोभनेनें सर्व परिस्थिति समजावून सांगितली. चर्चा करून कार्यक्रम ठरविला. उलट त्या कार्यकर्त्यांनींही त्यांच्या अडचणी तिला विदित केल्या होत्या.

रात्रीं सर्व समाज जमल्यावर शोभना, त्या कार्यकर्त्यांसह, परिषदेच्या ठिकाणीं आली. तिला पहातांच कांहीं समजुतदार अन् माहीतगार शेतकरी उठून उभे राहिले. अन् बाकीचे तिच्याकडे पहात स्तिमित झाले, त्यांची आपापसांत चर्चा झाली थोडीशी!

"अरऽ! या बाईचं काय इथं?" तिला न ओळखणाऱ्या एकानें विचारलें.

"वा! म्हंजे? यांनींच तर आमच्या बाजूला आम्हांला जागं केलं, दोन वर्षांपूर्वी!"

"ह्या संस्थानांत व्हत्या?" पहिल्यानें विचारलें पुन्हां.

"वा! आमच्या गांवच्या पारानजीकचं तें घर? आतां सोडून गेल्या त्या बाई! त्यांच्याकडं रहात व्हत्या या!"

समुदायाच्या बाजूनें व्यासपीठाकडे जात असतां शोभनेला एक शीख

शीख असा कोणीच माहितीचा नव्हता तिच्या ! तेव्हां मनाची समजूत असें म्हणून तिनें तो भास खोटा पाडला.

तो शीख मात्र, शोभना जवळ येतांच, आपल्या दाढीवरून हात फिरवीत अदबीनें बाजूला झाला. अन् असें करतांना मिस्किलपणें हंसावें, तसा तो हंसला, असें वाटलें शोभनेला. ती पुढें गेली, तों संस्थानी पोलिसांचा एक घोळका हातांतील लाठ्यांसह आपले कमरेचें पट्टे सांवरीत उभा होता, तो तिनें पाहिला. ती परिषद् होऊं नये म्हणून संस्थानांतल्या अधिकाऱ्यांची फार इच्छा होती. मात्र संस्थानचे महाराज बाहेर असल्यानें अन् त्यांची परवानी मागितली नसल्यामुळें, एकदम धसमुसळेपणानें त्या जमावाची दाणादाण करण्याची जबाबदारी घेण्यासाठीं ते तयार नव्हते. नाहीं म्हणायला, तसा प्रसंग कदाचित् येईल, असें तारेनें दुपारींच महाराजांना, त्यांनीं कळविलें होतें.

परिषदेला सुरुवात होऊन थोडासाच वेळ गेला असेल, तोंच समाजाच्या एका बाजूनें किंचित् धांवपळ सुरू झाली. अन् त्यांची ती धांवपळ होण्याला, चिडून काठी उचलणारा एक पोलीस याच वेळीं व्यासपीठाच्या बाजूला येत होता, तोच कारणीभूत होता. संस्थानचे कांहीं अधिकारी त्याचे पुढें चालले होते तेही त्याच बाजूला !

ते अधिकारी परिषदेच्या कार्यकर्त्यांशीं कांहीं बोलणार, तोंच एक शेतकरी धांवत आला अन् सांगूं लागला कीं, त्या मधांच्या पोलिसानें त्याच्या कुशींत लाठी ढोसली. अन् असें म्हणून त्या शरीराच्या भागावर हात दाबून तो कण्हूं लागला.

" तुमच्या या सभेला परवानगी असल्याचा हुकुम दाखवा ! " अधिकारी गरजले.

" मुद्दाम संस्थाननें बंदी केल्याशिवाय कोणत्याच सभेला परवानगी लागत नाहीं ! " एक प्रमुख कार्यकर्ते म्हणाले.

शोभना पुढेंच होती. पण ती तें नुसतींच ऐकत होती. त्या कार्यकर्त्यांनें केलेल्या या बिनतोड उत्तरानें तो शिरजोर अधिकारी निरुत्तर झाला; पण तो चिडला अन् पुन्हां म्हणाला,

" संस्थानच्या वतीनें मी सांगतों, कीं दहा मिनिटांच्या आंत तुम्ही ही जागा मोकळी करा अन् सभा बंद करा ! "

यावर मात्र शोभनाच पुढें झाली अन् म्हणाली, " हें पहा ! आम्हांला जर त्रास द्यावयाचीच तुमची इच्छा असेल, तर तो पचविण्याच्या तयारीनेंच आम्ही सर्वजण जमलों आहों. पण अरेरावीनें संस्थानी धिंगाणा तुम्ही घालाल, तर त्याचा परिणाम वाईट होईल, हें मात्र लक्षांत असूं द्या ! शांत जमावावर लाठी चालवणं सोपं नाही, महाराज ! "

" शांत जमावावर ! अन् कोणी लाठी चालवली ? " अधिकारी गरजले.

" हा पहा ! हा विव्हळतो आहे, दिसतं आहे ना तुम्हांला ! " त्या मधांच्या शेतकऱ्याला पुढं धरून तिन विचारलें.

तिची ती धिटाई पाहून ते अधिकारी वरमले.

" जातां जातां सहजही हात उचलण्यास धजतां हं तुम्ही ! तुम्हांला काय करायचं असेल तें करा; परिषद पुढें चालू रहाणारच ! जीवांत जीव असेपर्यंत आम्ही ती पार पाडण्याचा प्रयत्न करणार ! "

" असं ! बरं आहे ! माझा मार्ग मला मोकळा आहे. " असें म्हणून ते अधिकारी जातांच सर्व सभा पोलिसांनीं वेढली गेली. अन् शोभनेच्या कानांवर लाठ्यांच्या आपट्या अन् त्याबरोबरच निघालेल्या दुःखित आरोळ्या आल्या. तिच्या पाठीमागें असलेल्या पोलिसांनेंही लाठी चालविण्यास सुरवात केली जमावावर ! बाजूलाच एका दगडाच्या राशीवर बसलेला होता दामले. त्यानें एक मोठा धोंडा उचलला. शोभनेनें तें पाहिलें अन् डोळयांनींच त्याला नकार दाखवीत ती तिकडे वळली. त्यानेंही लागलीच हातांतील दगड खालीं टाकला. जमावाच्या बाजूनें पोलिसांचा लाठीमार चालू झाला तरीसुद्धां तो जनसमुदाय मुळींच हालला नाही. त्या संघटीत समुदायाकडे शोभना पहात होती, तोच त्या दुःखित आरोळ्या आणि तो ओरडा थांबला अन् सर्व अधिकारी एके ठिकाणी जमा झाले. त्याच्यातील एकाच्या हातांत तारेचा कागद होता अन् त्यानेंच लाठीमार बंद करण्याचा हुकूम दिला होता. तो शोभनेजवळ आला आणि सरकारी हुकुमानें त्यानें तिच्य

सह आणखी काहीं पुढाऱ्यांना अटक करून नलो. जातांना तिला मघांचा शीख दिसला अन् तो लाठी चालवूं नका असा हुकुम खुद्द महाराजांचाच असल्याचें कळलें.

तुरुंगांतील पहिल्याच रात्रीं तिला एकान्तवासाची अडचण भासली. अन् आता हा देशभक्तांच्या मार्गांतील न चुकणारा तुरुंगाचा त्रास कसा सोसायचा याविषयीं तिला प्रश्न पडला ! परन्तु, दुसऱ्याच दिवशीं त्या सर्वांची सुटका झाली. तिला कळलं मग, कीं परिषद् इतरांनीं कशीबशी पार पाडली अन् तिला अटक केल्याचें अधिकाऱ्यानीं महाराजांना कळवितांच तिला सोडून देण्याविषयीं महाराजांनीं उलट कळविलें. त्याबरोबरच महाराजांनीं, संस्थानात असली दंगल केल्याबद्दल, अधिकाऱ्यांना दोष दिला. ' अन् मी लौकरच येतों आहे; शांततेनें वागा ' असेंही त्यानीं कळविलें होतें. दुसरें दिवशीं परिषदेच्या मागण्यांचा महाराज विचार करीत आहेत असाही जाहीरनामा फडकला.

पुण्यास रतनपूरहून विजयी होऊन परत आल्यावर शोभनेनें सर्व हकीकत विजयास सांगितली. त्यावर विजय म्हणाला, " सर्व प्रत्यक्षच पाहिलं मीं ! जातांना तूं एक शीख पाहिलास ना ? कोण होता तो ? "

" म्हणजे ? तरी मला त्याच वेळेला कोठेंतरी त्याला पाहिलाचा भास झाला ! माझी शपथ मोडून तुम्ही आलांत तिकडे ? " शोभनेनें प्रश्न केला.

" नेहमीं सर्वांत शेवटचं सांगणं खरं मानायचं असतं अन् प्लॅटफॉर्मवर 'परिषदेंत भाग घेऊं नका,' इतकंच तू सांगितलं होतंस ! मला राहवेना ! म्हणून मी आलों. पण तुझी आज्ञाही मानलीच कीं मीं ! विजयाला संस्थानांत बंदी होती. पण तत्पूर्वी त्याला संस्थान ओळखतच होतं कुठं ! अन् वेषांतर केल्यावर तर नाहींच नाहीं ! त्यांतून मागाहून ती सर्व जागा दुलडीशिवाय अशीच होती ! "

यावर शोभनेनें सांगितलें, " मी आजचे दिवस विश्रांति घेणार आहे ! उद्यां काकाबरोबर सकाळींच जायचं आहे मला ! त्यांच्या एका मित्राकडे जेवायला जायच आहे ! परवां मात्र विजय, तुम्ही अन् मी ! बोलू या विजयावर ! या परवां आमच्याकडे ! "

विजयाने ' हो ' म्हटलें.

---

## प्रकरण ११ वें

## पूर्वतयारी

गेल्या चार पांच दिवसांपासून स्वामींची अगदीं दुर्दशा झाली होती. नित्यनैमित्तिक कार्यही त्यांच्याकडून होईनासें झालें होतें गेले दोन दिवस. त्यामुळें अजय हल्लीं आश्रमांतच रहात असे. स्वामींचे हातपाय चेपावे, व्यायामशाळेंतील दररोजच्या घडणाऱ्या हकीकतींवर चर्चा करावी अन् रात्रीं स्वामींना झोंप लागल्यावर मग बिछान्यावर पडावें हा नियम असे त्याचा.

पर्णकुटीच्या ओंवरींत आपल्या बिछान्यावर अजय पडला होता. गवताळ जमिनीचा हिरवा पट्टा लांबच लांब दिसत होता त्याला. पाण्याच्या झडीचा झर्र् आवाज होतच होता. पर्णकुटीच्या पागोळ्यांचा चुळचुळ आवाज होई. अन् लांब असलेल्या एका विहिरीवर कोल्हेकुई झाली थोडा वेळ तीही त्याला ऐकू आली. एक प्रकारचा जमिनीचा सुगंधही दरवळत होता तेथें.

ओसरीवरील कोनाड्यांत मिण्मिण् करणारी एक पंति होती.

त्या अंधुक उजेडांत स्वस्थ झोंपीं गेलेल्या स्वामींचें मस्तक त्यानें पाहिलें. शांतपणें ते निद्रिस्त होते. त्यांच्या त्या विशाल कपाळावर एक उभी आठी उमटली होती अन् वाऱ्याच्या वेळोवेळच्या झुळुकेंत त्यांच्या दाढीचे मऊ पांढरे केस विकल होत होते.

" मामा ! " त्यांच्याजवळ जाऊन हळूंच अजय म्हणाला, " सांगून टाका तुमचें तें काम ! " त्यांच्या अंगावरील पांघरूण त्यानें सारखें केलें नि परत जाऊन तो बिछान्यावर निजला. दुसऱ्या दिवशीं अजय जागा झाला, त्या वेळेस पूर्ण समाधानांत होता तो !

मनुष्याची अशी एक मनःस्थिति असते कीं, सूक्ष्म पण महत्त्वाच्या दुःखानें पीडित झालेलें त्याचें अंतःकरण एकाएकीं, जणूं तें दूर झाल्यांच्या आनंदानें भरून येतें, नि सत्यसृष्टींतही अल्पावकाशांत तसेंच घडून येतें. स्वामी किती तरी उशीरापर्यंत उठलेच नाहींत आज. जे उठले, ते मात्र पूर्ण समाधानांत; जणूं कांहीं त्याना काहींच आजार नव्हता असेंच परक्या माणसाला वाटावें.

"आज बरं वाटतं आहे मला!" ते म्हणाले.

"माझं असमाधानही मावळलं आहे, पण तें कायम आहे कीं नाहीं शंका आहे!"

"ते कां?"

"मामा, तुमच्या व्यथित सूराची आठवण झाली कीं लागलीच वाईट वाटतं हो! ग्लीसन्‌बद्दल मागें एकदां तुम्ही म्हणाला होतां ना? पंचवीस वर्षांपूर्वीच्या दडपशाहीचा संबंध दिसतो आहे! त्या स्पेशल ट्रायब्यूनलमध्यें होता तो. काय? त्या वेळीं त्यानें केलेल्या हत्याकांडांत तुपचा हात होरपळला आहे?"

"होय! अन् तो माझा भाऊच होता! अकालीं हल्ला झाला. माझं क्रांतीच संघटन उघडकीस आलं! मरणाची भीति म्हणून नव्हे पण विफल मृत्यु म्हणून मी फरारी झालों. म्हटलं, मरायचंच तर एक बळी घेऊन तरी मरूं. नाहीं तर—"

"नाहीं तर काय?"

"आमचं तर असं आव्हानच होतं परकीय सत्ताधाऱ्यांना कीं, माझ्या देशबांधवांचें प्राण अधिकारमदाच्या धुंदींत अन् सत्तेच्या वरचढपणानें तुम्ही घ्याल, माझ्या नंदनवनासारख्या देशाची संपत्ति लुटून तुम्ही त्या मातृभूमीला असंमृद्ध करून सोडाल, रक्ताला चटावलेल्या वनचर पशूप्रमाणें समशेरीच्या जोरावर नंगा नाच घालून तुम्ही देशभक्ताचं रक्त सांडाला, अन्यायाच्या पायावर उभारलेल्या नि लुटारूपणाच्या भिंतींनीं अडविलेल्या तुरुंगांतही आम्हांला कांहीं काळ डांबाल; परन्तु पापाचा घडा एकदां भरला,

तीच समशेर तुमच्याविरुद्ध फिरूं लागली, लोकमताची फळी एकदां एकसंघ व अविभाज्य झाली म्हणजे मग, हे राज्यकर्त्यांनो, तुमच्या दुर्दशेची तुम्हाला कल्पना आहे का ? ”

आपल्याच डोळ्यापुढें आपण वर्णित असलेला प्रसंग परत दिसावा म्हणजे आपण ज्या अनिमिष नेत्रांनीं पहातों त्याच नजरेनें स्वामी पहात होते.

“ किती गरीब अन् मायाळू होता माझा भाऊ ! त्याची आठवण झाली कीं, त्यामुळेंही थोडा वेळ समाधान वाटतं ! अन् माझ्या लाडक्या बाळाचा वध करणारा हा नराधम पुढें येतो माझ्या ! ” स्वामींचा कंठ गहिंवरून आला.

“ जया ! मीं हा वेष सुखासुखी स्वीकारला असं का तुला वाटतं ? बऱ्याच वर्षांपूर्वीची ही एक लाट पसरली क्रांतिकारक आंदोलनाची, तींत मीही होतों. मात्र त्या वेळेस बादा वटहुकमाखालीं वगैरे जे दडपशाहीचे प्रकार झाले त्यांतून मी निसटलों. परन्तु तत्पूर्वी माझ्या बाळाला मी मुकलों. त्या वेळच्या कलेक्टरला मारण्याचा जो कट झाला त्यात बाळही सापडला. त्या वेळचे जे तीन देशवीर फाशीं गेले त्यात माझा बाळही एक होता. ”

दुःखाच्या आवेगानें स्वामी सांगत होते तें ऐकून जयाच्याही डोळ्यांत अश्रू चमकले.

“ अन् तुला माहीत असेल कीं, त्या आंदोलनांतील एक क्रांतिकारक फरारी झाला होता. तोच मी. या जुलमी लोकांच्या हातांत सापडून मीही मरणाच्या स्वाधीन झालों असतों. म्हणून माझ्या बाळाला—फारच लहान होता तो त्या मानानें—एकटा टाकून मीं अज्ञातवास पत्करला. पण किती झालं तरी तो माझाच भाऊ; माझंच रक्त त्याच्या अंगांत सळसळत होतं. पंचवीस वर्षांपूर्वींचा तो प्रसंग आठवला कीं अजूनही भडकून येतं हृदय. ओठ पिळला तर दूध गळेल अशा कोवळ्या तरुणांचे किती बळी हवे आहेत माझ्या मातृभूमीला ? केव्हां या स्वातंत्र्ययज्ञांतून इष्ट स्वातंत्र्यसंपदा बाहेर येणार देव जाणे. दोन तपापूर्वीपासून मी अज्ञातवासांत होतों. हल्लापूर्वीच माझं अन् बाळाचं गुप्त असे दोघटचं बोलणं झालं होतं; तेव्हां

तो म्हणाला होता, 'दादा असे खिन्न कां होतां! या हल्ल्यांत जरी मी पकडलों गेलों तरी मृत्यूला कवटाळण्याला मुळींच भीति वाटत नाही मला! माझ्या स्वातंत्र्याच्या जे आड येतील त्यांना तुडवलंच पाहिजे!' मी त्याला तसें न करण्याविषयीं परोपरीनें विनविलं. त्यानें तात्पुरतं होही म्हटलं! पण कृत्रिम संयम हा जिवंत लालसेला कोंडू शकत नाही! मीं उत्तर हिंदुस्थानांत असतांनाच त्याची अटक अन् फांशीची शिक्षा ऐकिली मीं.

"हल्लीच माझ्या त्या मित्राला मी भेटलों. त्यानेंच फांशीपूर्वी शेवटची भेट घेतली होती बाळाची! त्याच्याजवळ बाळानें मला निरोप सांगितला होता; तो म्हणाला होता, 'दादा! माझ्या मृत्यूनें कष्टी होऊं नका! हेंच माझं मागणं आहे; क्रियेला प्रतिक्रिया पाहिजेच; या गुलामगिरीच्या नरकयातनेंतून मीं लवकरच सुटेन अन् तुमची मार्गप्रतिक्षा करीत खुशाल बसेन; एवढं करून मग लवकर मला भेटाल ना! माझा जीव तिकडे कासावीस होत असेल; कराल ना दादा एवढं!'

"बाळाचं हें प्रेमाच शेवटचंच सांगणं होतं; त्यानतर सरकारची करडी नजर चुकविण्याकरितां मीं हा वेष स्वीकारला; कालाच्या उदरात बाळाचा देह नष्ट झाला; त्याची ती इच्छा मात्र अतृप्तच राहिली आहे अजूनपर्यंत! मी मग बऱ्याच ठिकाणीं वैराग्याच्या वेषानें हिंडलों. शुभ्रशीळेच्या तीर्थांत दोन तीन वर्षांनीं एक दोन महिने राहिलों, अन् सात आठ वर्षांपूर्वींपर्यंत माझ्या नांवाचा पत्ता लागेना, यानं सतत वैषम्य वाटून पोलिसांनीं अधिक जोराचा तपास चालविला असतांही दैवकृपेनं मी सांपडलों नाहीं अजून!" स्वामींनी सूर खालच्या आवाजांत आणला.

"हिंदुस्थानी उत्तम बोलता येत असल्यामुळें माझा विशेष संशय आलाच नाहीं कुणाला; अन् सात वर्षांपूर्वी तर मी मेलों, असा निकालही घेतला पोलिसांनीं. तेव्हां या आश्रमांत प्रवेश केला मीं. फरारी होण्याच्या वेळेला मी तारुण्यांत होतों अन् आतां वयामुळें बराच फरक—न ओळखतां येण्याइतका हि—झाला आहे माझ्यांत! म्हणून सुखानं इथें राहूं शकतों

पण बाळाची ती इच्छा अजुनपर्यंत पुरी झाली नाहीं माझ्या हातून." स्वामी हताशपणें रडूं लागले.

"या वृद्धापकाळीं ती होईल असं वाटत नाहीं. मग अगदींच मार्ग न सांपडला तर अयशस्वी कां होईना पण तसा प्रयत्न करायचा हें मीं नक्की ठरविलं आहे! म्हणजे निदान भेकडपणाचा दोष तरी लागणार नाहीं; हृदयाचं दुःख हृदयालाच कळतं! परन्तु दुसऱ्या हृदयाप्रमाणेंच समजतों ना मी तुला? बोल, जया बोल; ही माझी इच्छा पुरी करशील?"

"त्यांत विचारायचं काय मामा? तुमच्या या सकंप शरीराला हें काम मुळींच झेंपायचं नाहीं; अगदीं अचुकपणें मी तें करीन!" त्यानें त्यांच्या कानांत सांगितलें.

"लक्षात ठेव! उगीच आत्माहुति पडता कामा नये! नाहीं तर तुझ्या वियोगाचं दुसर दुःख कोसळेल माझ्यावर?"

"त्याबद्दल अगदीं निर्धास्त रहा!"

सायंकाळीं स्वामींच्या अंगांत कडकडून थंडी भरायला लागली. त्यांचें अंग हिवानें थडथड उडत होतें. त्याना तसेंच पांघरूण घालून अजयानें निजवलें. कांहीं वेळानें स्वामींना तापही भरला. तापाच्या भरात ते वाटेल तसें बडबडत. त्या भ्रमांत मधूनच ते व्याख्यान देताना बोलत तसें बोलत; मधूनच व्यायामसंस्थेविषयीं प्रश्न विचारीत नि मागाहून कण्हत स्वस्थ पडत. त्या दिवशींची त्यांची स्थिति अत्यवस्थ होती. त्याना क्विनाईन नि दूध दिलें अजयानें. रात्रीं त्यांना घाम सुटला. तापही निघाला. पण त्या तापानें जो थकवा आला त्यामुळें त्यांना उठतांसुद्धां येत नाहींसें झालें. डॉक्टरांना प्रकृति दाखवितां नुसत्या हिवतापाचा हा परिणाम नाहीं असें त्यांनीं निदान केलें; यांच्या डोक्याला त्रास होईल असें कांहीं झालें असलें पाहिजे, असें मत होतें त्यांचें. स्वामींची प्रकृति अशक्त झाली होती. तरी ते पूर्ण शुद्धींत होते. त्यामुळें ते नि अजय एकमेकांकडे पहात, तेंव्हा कांहींच कारण नाहीं झालें असेंच म्हणाले!

दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं अजय ज्या व्यायामसंस्थेंत कार्य करीत

होता, त्या संस्थेच्या व्यायाममंदिरांत शिरणारा प्रत्येक तरुण आज कांहीं तरी विशेष गडबड दिसते आहे व्यायामशाळेंत, असाच तर्क करीत व्यायामास सुरुवात करी, ”

मधल्या चौकांत संस्थेचे सर्व कार्यवाह जमा झाले होते. अजयाची आज्ञा मधून मधून सुटत होती.

“ आप्पा, या लाठ्या मोजून घे; नि नतर ते लेजीमचे जोडही. ”

“ हो, ते केव्हाच मोजले आहेत मीं ! ”

“ एकूण पुनर्घटना झाली आहे संस्थेची ! ”

“ हूं ! ”

“ काय रे जया ? एवढ काय झालं आहे आज ? अश्रमात म्हणजे अगदीं विलायतलाच जायला निघाला आहेस नाहीं का ? ”

“ मामाचा आजार असा तसा दिसत नाहीं आहे ! आश्रमांतून वेळांत वेळ काढून मीं यायला तयारच आहे. पण त्याचं काय सांगावं ? वैद्या-प्रमाणेंच शिक्षकही नेहमीं जागेवरच पाहिजेत. तुमच्यासारखे कर्तव्यदक्ष सहकारी असल्यावर मला काय भीति आहे. ”

“ हो ! जसा कांहीं राजकारणातच पडणार आहेस नाहीं, संबंध सोडायला ?”

“ गुळल्या राजकारणात नाहीं; जहाल राजकारण, क्रान्तीचं राजकारण आहे ते ! शारीरिक संपत्तीची विषमता नष्ट झाली पाहिजे. सर्व तरुण मालक आहेत या संपत्तीचे ! ... विसरलांत वाटतं ? ”

या त्याच्या विनोदावर सर्वजण हंसले.

इतके दिवस ज्याला पुढारीपण होतें तो असा कां वागतो आहे, अ... कोणालाही अंधुक संशयही येऊ नये म्हणून त्यानें ही व्यवस्थाही हंसत खेळत ने सर्वांची खात्री होईल असे कारण सांगूनच केली. त्याचबरोबर आपल्या ...ार निवडक निवडक निवडले त्यांना सायंकाळीं सांकेतिक स्थळीं ...सऱ्या दिवशीं येण्यास सांगितलें. यापैकीं प्रत्येकाची मनोवृत्ति त्यानें ...ळोवेळीं चांचपली होती. यांतील प्रत्येकजण आपल्या निश्चयाशीं पूर्णपणें ...हकार्य करील अशी त्याची खात्री होती. त्यांना त्यानें बोलाविलें तेंही

किती गुप्तपणानें ! न जाणो हाच पुरावा एखादे वेळेस कटाचे अस्तित्वही सिद्धत्वाला म्हणून पुरावा सांपडायचा ! अशा गुप्ततेमुळें अजयानें संस्थेची चाळवाचाळव कांहीं एका विशिष्ट हेतूनें केली आहे असा दवीरु चौघां-शिवाय कोणालाही मुळींच संशय आला नाहीं.

आश्रमांत गेल्यावर स्वामींची मन:स्थिति शांत झाली याचें जितकें अज-याला समाधान वाटत होतें, त्यापेक्षां थोडीशी जास्तच विवंचना त्या उद्दि-ष्टाची पूर्ति कशी होईल याविषयीं त्याच्या मनांत वावरत होती. त्या कार्याकरितां लागणाऱ्या दुर्घट कौशल्याचाही त्याला फार विचार करावयाचा होता. यापुढील आठ दिवसांतही स्वामींची प्रकृति म्हणण्यासारखी सुधारली नाहीं तरी मनाच्या सुस्थितीमुळें ती अधिक खालावलीही नाहीं विशेष. कारण शारीरिक कष्टाची परिसीमा झाली तरीही मनांतील कणखर निश्चि-तीचे जोरावर मनुष्य पुष्कळ दिवस तें सहन करूं शकतो; उलट मनाचा एखादा कोमल तंतू जोरानें छेडला गेला तर त्याच्या बेसूर सुरानें मनुष्याच्या मनांतील वातावरण इतकें दूषित होतें कीं, त्या दूषित वातावरणांत तो गुदमरूनही जातो !

ग्लीसन्‌साहेबाशिवाय अजयाला कांहीं दिसत नव्हतें. शिवाय तें कार्य घसमुसळेपणानें करायचें नसल्यामुळें तर त्याचा हजारदा त्यानें स्वतःशींच विचार केला. पुष्कळ बेत सुचले त्याला; परन्तु त्यांतील सर्वांतील थोडथोडा भाग घेऊन एक हल्ल्याचा कट त्यानें रचला. सर्वच भाग हुषारीनें कल्पिलेला होता त्यानें.

अजय न् त्याचे मित्र यांच्या क्रान्तिमंडळाच्या बैठकीस निर्जन प्रदेशच अधिक योग्य होता. ओढ्याच्या जवळच जी एक गर्द झाडी होती त्यांतील एका झाडाखालीं एक ओटा होता. पाऊस कांहीं वेळ उघाडी देत असल्या-मुळें तो ओटा थोडा कोरडाच होता. याच जागीं आपल्या कटामागील तत्त्वज्ञान मित्रांना पटवून देऊन या रोमांचकारी कटाचा पाया अजयानें रचला.

क्रान्तिमंडळाची बैठक ऐन रंगांत आली होती.

जरा झाडांचीं पानें जोरानें सळसळलीं कीं जणूं कांहीं तो लोकसभेच्या

अध्यक्षाचा नादिष्ट घंटानादच आहे, असें मानून सर्वजण स्तब्ध बसत. त्या सभेला टेबल नव्हतें. पण स्वातंत्र्यवीरांच्या अतृप्त आकांक्षांची पूर्तता अजून करण्याच्या दुर्दांत इच्छेची भक्कम बैठक होती त्या सभेला. आरामांत बसण्याकरितां त्या सभासदांना खुर्च्या नव्हत्या, पण वचनपूर्तीच्या आवडत्या चित्राकडे पाहूनच त्यांना आराम वाटे; त्यांच्यापुढें कागद नव्हते, परन्तु हृदयाच्या कणखर पटलावर कोरलेला वृत्तांत लिहीत होते ते. वचन ही त्यांची शाई होती, कर्तव्यपूर्तीचा आनंद हें त्यांचें मौल्य होतें, तळमळ ही त्यांची प्रेरकशक्ति होती. अशा प्रकारच्या अभूतपूर्व सभेचे वरील स्वरूप रोमांचकारी नव्हतें असें कोण म्हणेल?

"...हं तर मी काय सांगत होतों!" अजयाचेंच भाषण चालू होतें. "सनदशीर मार्ग चांगला हें पटतं मला; पण सनदशीरपणानेंच असल्या अन्यायाचा आम्हीं डांगोरा पिटला तरी त्याचा काय उपयोग झाला? जालियनवाला बाग काय सांगते? बंगालांतील असंख्य शिक्षा काय जाहीर करतात? फांशी गेलेले आमचे हुतात्मे काय सिद्ध करीत आहेत? हेंच कीं, सत्तेपुढें शहाणपण चालायचं नाहीं! जिथें असले प्रकार हेच सनदशी-रपणाचे तेथें नेमस्तपणाचा काय उपयोग! रानटी पशूंच्या तडाख्यांत एखाद्या वैराग्यानें सनदशीरपणाचा आव आणण्यासारखंच आहे हें! नदीचा प्रवाह जोंपर्यंत तिच्या वाहत्या लाटीला वाव मिळत आहे तोंपर्यंत पात्रांतच मर्यादित राहिल, पण त्याच ठिकाणीं एखादा पर्वत आड आला तर? आड-मार्गानं समुद्राला मिळण्याकरितां—साध्य गांठण्याकरितां—ती आडरानांत शिरेल! उत्क्रांति अशक्य म्हणूनच क्रांतिकारक मार्ग! यांना बंड म्हणा हवं तर पण तें जुलुमाविरुद्ध आहे म्हणजे न्याय्यच! देशाच्या स्वातंत्र्याच्या प्रयत्नांत अपयश येतांच कडक शासनाचा डोंगर जोंपर्यंत तुमचा कडेलोट करण्यास उद्बोधित होतो तोंपर्यंत आम्हांलाही या गुप्त वाटेनेच मार्ग आक्रमावा लागेल."

"हें सर्व खरं! पण म्हणून हा वैयक्तिक हल्ला कां!"

"व्यक्ति जर राष्ट्राच्या आड येईल तर तीही बाजूला सारली पाहिजे!

कारणाशिवाय केवळ खुनशीपणानं वैयक्तिक हत्या नको या मताचा मीही आहे. पण सत्तेच्या जोरावर एकच व्यक्ति अन्याय करूं लागेल तर तो तिला पचूं देतां कामा नये!"

"त्या व्यक्तीनें काय अनर्थ केले आहेत?"

"अनर्थ? राक्षसाला नुसतं धिप्पाड मनुष्य म्हणण्यासारख आहे हें! अमानुष अन्याय केल्याचा पुरावा आहे त्या व्यक्तीविरुद्ध! त्यानें बळी घेतलेल्या, माझ्या देशबांधवाच्या रक्ताच्या, एका थेंबाच्या सूडाकरितां मी आपलं सारं हृदय सांडीन, ही तर आपली प्रतिज्ञा आहे!"

"अशी कोणती व्यक्ति आहे ती!"

"काय? असा कोणताच अधिकारी आठवत नाहीं तुम्हांला?"—डोंगराच्या विरुद्ध बाजूस जें एक सपाट मैदान दिसे त्या दिशेकडे पहात अजयानें विचारलें. लांब दिसणाऱ्या एका बंगल्याकडे बोट दाखवीत अजय म्हणाला—

"तो बंगला पाहिलांत कां? जा, त्याच्याजवळ जा! फार असह्य कथा श्रवण करण्यास लावील तुम्हांला तो! वैयक्तिक खूनही फारच अपुरा होईल या बाबतींत! किती जणाच्या घरांची राखरांगोळी केली यानें? कितीकांच्या शेतावरून नांगर फिरविले यानें! न्यायाचा देखावा मांडून क्रान्तिकारकांना फांसावर पाठविणाऱ्या त्या ट्रिब्यूनलमधून कितीकांना फांशीं देलें यानें! किती जणांच्या आयकांमुलांना निराधार करून त्यांचा तळतळाट घेतला यानें! किती काळ्या पाण्यावर धाडले यानेंच! बस् बस्! सर्व सांगत सुटलों तर एक पुराणच होईल!"

"त्या पुराणांतले देव व्हायच आहे आपल्याला?"

"देवपण फुकट मिळत नसतं! खडतर तपश्चर्येचं भरभक्कम आसन लागतं त्याला?"

"तपश्चर्या? क्रान्तिचर्या म्हण हवी तर! अन् हो—" तोंच अजयाचा मित्र पुढें म्हणाला, "मला असं सुचवायचं आहे कीं, आपल्यापैकीं कोणीही व्यायामसंस्थेचा सभासदही असूं नये नुसतां!"

"बरं आहे! मग उद्यांपासून पांच सहा दिवसांच्या अन्तरानें सर्वांनीं राजीनामे देऊन टाका!" अजयानें सांगितलें.

प्रकरण १२ वें

# नाना नाहींसे झाले

रतनपुराहून सुटका झाल्यानंतर शोभनेस आज संध्याकाळीं फार वाटत होतें, कीं विजय आपल्याकडे उत्साहानें येऊन बराच वेळपर्यंत बोलत बसेल. काकांचे बरोबर त्यांच्या एका मित्राकडे भोजनास ती गेली होती, त्या वेळींही क्षणोक्षणीं विजयाविषयींच्या स्मृति तिच्या मनांत उमटत होत्या., त्यामुळें आतां संध्याकाळ टळली, तरी तो कां येत नाहीं, याचें आश्चर्य करीतच ती अंगणांत फेऱ्या घालीत होती. अंधार पडला अन् अजूनही विजय कां आले नाहींत, असें वाटून विजयाच्या घरीं आपणच जायचें कीं काय, याचा ती विचार करीत होती, तोंच अंगणाच्या टोंकाला असणाऱ्या फाटकाशीं तिला कोणीतरी दिसलें. विजयच तो, असें समजून ती त्या बाजूला वळली तों तिची पूर्ण निराशा झाली.

“ काय हो दामले, तुम्ही इकडे कोणीकडे ? विजयांची न् तुमची भेट झाली होती का सकाळपासून ? ”

“ हो. सकाळींच झाली कीं ! ” अंगणांतील कॉटवर बसत दामले म्हणाला.

“ कांहीं म्हणाले नाहींत ना ते ? ”

“ हो ! अन् त्यांनीं हें द्यायलाही सांगितलं तुम्हाला ! ” असें म्हणून हातांतील एक पाकीट त्यानें शोभनेच्या हातांत टाकलें. त्यांत असें काय लिहिलें आहे, कीं येणें टाळून विजयानें पत्र आपल्या हातीं द्यावें, याविषयींची शोभनेच्या हृदयांतील उत्कंठा तीव्रतर होती. अन् ती लवकर पूर्ण करून

घेण्याचाही तिचा विचार होता. परन्तु नंतर दामलेनेंच बोलतां बोलत सांगितलें कीं विजय मुंबईस गेला होता सकाळच्या गाडीनें.

यावर शोभनेनें विचारलें, "कां ? एकाएकी काय काम निघालं मुंबईत ?'

तें त्यांत त्यानें लिहिलं आहे, असं म्हणाला तो !" त्या पत्राकडे बोट दाखवीत दामले उत्तरला. दुपारीं दोनदां मी येऊन गेलों, पण तुमची भेट झाली नाहीं !"

अन् नंतर तें पाकीट बाजुला टेवीत शोभनेनें प्रश्न केला, "काय म्हणतं आहे तुमचं रतनपूर ?"

" म्हणणार काय ? पण एक कुणकुण लागली आहे; परवांच्या दिवशींचा तो जाहीरनामा आहे ना ? या वर्षी तरी दिलेली ती तहकुबी कायमची सूटच ठरणार !"

हें कशावरून ? फक्त विजयांच्यावरील बंदीचा हुकुम काढून घेण्यांत आला, तें माहीत आहे मला !"

अशी कुणकुण आली आहे माझ्या कानांवर !" असें म्हणून दामले जाण्यास निघाला. तेव्हां शोभना म्हणाली—

" असं ! बरंच होईल. परत आयला नको–तिकडे !"

दामले गेल्यावर शोभनेनें पाकीट फोडलें. अन् त्यांतील मजकूर वाचला—

रमाकांताची तार आल्यामुळें, राईच्या मदतीला म्हणून मी मुंबईस जात आहें. तूं घरांत नसल्यामुळें मी भेटूं शकलों नाहीं. जातां जातां दामले भेटला, म्हणून त्याचेबरोबर हें पाठवीत आहे. सर्व कांहीं मुंबईस गेल्यावर लिहीनच ! धोका काय आहे, त्या बाबतीत मीही तुझ्याप्रमाणेंच अनभिज्ञ आहें.

विजय."

मजकूर वाचून शोभनेला विशेष बोध झाला नाहीं. मुंबईला विजय गेला आहे, हेंतकेंच तिला कळलें. कारण, पत्र वाचून झाल्यावर ती स्वतःशीच पुटपुटली; " रमाकांत कोण आहेत हे ? त्यांचा पत्तासुद्धां दिला नाहीं; अन्

राई ! तीसुद्धां कोण आहे कोण स माहीत ! पण करायच आहे काय ' विजयच येतील लागलीच किंवा ते लिहितील तरी ! ”

दुसऱ्या दिवशीं पहाटेस कोणीतरी दार खडकावलें असें वाटून शोभना दार उघडण्याकरितां गेली. ‘ विजयच परत नसतील ना आले ” एक अंधुक कल्पना दाराजवळ जाताना शोभनेच्या मनांत येऊन गली. तिनें दार उघडले अन्–

“ कोण ? विजयच आहेत ना ? ” काकांनीं निजल्यानिजल्याच आंतून प्रश्न केला.

“ छे ! छे ! रामभाऊ ! काय हो ? चिंचवडचं काम संपलं वाटतं इतक्यात ? ”

शोभनेनें केलेल्या या प्रश्नावर रामभाऊ आत आले नि मुंडासें सावरत म्हणाले,

“ हो, पण विजय यायचा म्हणज काय, कुठें बाहेर गांवाला गेला आहे होय ? ” असें म्हणून आत येतांच, आपल्या हातातील लहानसें बोचकें खालीं ठेवलें रामभाऊनीं !

“ हं ! कालच मुबईला गेले ते एकदम ! काकांनीं उत्तर दिलें.

“ मुबईला ? वा ! जोर दिसतो आहे स्वारीचा ! राई तिथंच आहे ना ? ”

“ म्हणजे ? तुम्हाला काय माहीत राई ? ” आतां यापुढें कसली येते आहे झोप, या विचारान बिछान्यावरच उठून बसत काकांनी विचारलें.

“ परवा काय सागत होतों मी ? अरेऽऽ, राई आणि विजय–” कॉटवर बसतां बसतां काकांच्या कानाशीं रामभाऊ गुणगुणले. त्यांचें सांगणें चालू होतें, तोंपर्यंत काका आश्चर्याचे उद्गार काढीत हते अन् रामभाऊ दुप्पट जोरानें हातवारे करून काहींतरी सागत हाते.

अल्पावधीतच तोंड बाजूला नेऊन रामभाऊ म्हणाले, “ हं; तो गणू पळून गेल्यापासून राई एकटीच ना ? परवापर्यंत आमच्या गांवाला होती मुबईला जायच्या आदल्याच रात्री—” परत एकदा काकाजवळ अगदीं हलके स्वरांत त्या दिवशींचा स्वतःचा ऐकू आलेला सर्व संवाद रामभाऊंनीं सागितला.

"बाकी माझा विश्वास बसत नाहीं यावर रामभाऊ !" पत्र उघडून ते पुढें करीत काकांनीं शेरा मारला.

"तुझ्या विश्वासाला काय करतो आहेस ? मला अन् त्याचं कांहीं शत्रुत्व नाहीं ना ! खोटं क[illegible]. मी सांगू ?"

"तरीच त्या दिवशीं विजयाची मुद्रा अस्वस्थ झाली बर का !" काका म्हणाले. दारांतूनच त्यांच्या या विचित्र हालचाली नि उद्गार शोभना ऐकत होती.

गणूचें नांव [illegible] त्या दिवशीं विजयाला तिनें आपल्या गणू गड्याची हकीकत सांगितली त्या वेळची त्याची विचारग्रस्त मुद्रा तिला आठवली.

"त्या गणूचा अन् या गणूचा कांहीं संबंध नसेल ना ?" चटकन् तिच्या मनांत विचार येऊन गेला. तोंच काकांनीं शेवटचा उद्गार काढला—

"असेलहि कदाचित् ! कोणीं सांगावा त्याचा नेम ? कारण राई न् गणू हीं दोन नांवं मात्र तूं न विचारतां सांगितलीस बुवा ! हा काय मजकूर तारेतला ! एवढ्या घाईनें लागलीच विजय मुंबईला गेले ते उगीच ? अन् तो पळालेला गणू ? तोच तो ! नेरळचा ! मुळीच संशय नाहीं !"

काकांचाही संशय प्रबळ झाला आतां.

रामभाऊ स्वतःच्या मनांत एक विशेष तामसी आनंद अनुभवीत होते. ते म्हणत होते, "जा, बैस म्हणावं खुशाल कुळांना शिकवीत ! करायचं काय तें कार्य ? अब्रू घड तर सर्व ठीक ! अशी नाचक्की करून टाकतों इथें, कीं जन्मभर कोकलत बसशील म्हणावं ! अरे खन्याला मरण नसतं ! म्हणून तर राईबद्दलची ती तार मुळीच माहीत नसतां मी लागलीच सांगितलं मुंबईला ती आहे तें ! अन् गणू तिच्याजवळ नसल्यानंच तुला हें फावलं. ही तरी संगति कशी लागते पण ' मला त्या दिवशीं दम देत होतास नाहीं का ' थांब लेका म्हणावं, इथें असेपर्यंत अशी समजूत पक्की करून टाकतों शोभनेची कीं यंव् रे यंव् ! परत तुझ्याभोंवतीं घोंटाळेल ती ? नांव कशाला घेतोस ?"

रामभाऊ याप्रमाणे विचार करीत असतांच काका तोंड धुवून परत आले. त्यामुळें त्यांचा तो पाशवी आनंद तात्पुरता थांबला.

"हें जर खरं असेल ना रामभाऊ, तर तुझे उपकारच झाले म्हणायचे आमच्यावर!" काका म्हणाले.

"उपकार समजलों! उलट मी हें सांगितलं नसतं तर एवढा विजयाचा गांवकरी असूनही त्याची योग्य माहिती दिली नाहीं, म्हणून नाना रागावला असता जन्मभर!"

"बरं चहा घेणार ना?"

"वा तर! कोट, टोपी काढून रामभाऊनीं खुटीला लावला.

घरांत चहा सांगून काकांनीं नेहमींच्या संवयीप्रमाणें एकदां स्वतःच हॉलमधून केरसुणी फिरविली.

"तुझें घर आहे म्हणून बरं आहे काका! पुण्याला आसरा आहे आम्हाला."

"आतां लवकरच सपणार तो!"

"तो का?"

"घाटत आहे, घाटत आहे, म्हणत होतों ना मी? टरलंच कायमचं तें आतां. कलकत्याला जावं लागणार आम्हांला आठ एक दिवसांत! त्याच काळजीमध्यें आहें मी! अरे नोकरी सोडावी तर हल्लीं दुसरीकडे मिळणार कुठें दुसरी चाकरी? बरं, न सोडावी तरी एवढं लांब जायचं आहे! शेवटीं दुसराच मार्ग पसत करायला लागणार मला; चार महिनेपर्यंत जायचं आहे."

"काय सांगतोस? कलकत्याला? अन् मग बिऱ्हाड मोडणार?"

"हो! विजयांना प्रथम सांगणार होतों सर्व हें आज! तर ते मुंबई-लाच गेले."

"आणि शुभा?"

"त्यांनीं जायचं कॉलेज रेसिडेन्सींत, असं ठरवलं आहे! करणार काय मग?"

त्यावर रामभाऊ आपली शेंडी हातानें पुढें ओढीत, वळून शोभनेला म्हणाले,

" वा ! छान ! व्यवस्था मिळते आहे कुठें इतकी ? "

परन्तु त्यावर ते शोभनेला तिचें मत विचारणार, त्याआधींच शोभना आंत निघून गेली होती. रामभाऊंच्या बोलण्याचें तिला मुळींच कौतुक वाटलें नाहीं. विजयबद्दलचे त्यांनीं काढलेले अनुदार उद्‌गार तिला ऐकवत नव्हते. मागील दोन्ही वेळचे ते विजयाचे मुद्रेवरील बदल तिला आठवत होत; तरीपण रामभाऊंच्या बोलण्यांत तिला कांहींच सत्य वाटेना !

" दुसरेंच कांहीं कारण कशावरून नसल ? " तिला वाटे, " हे एवढं खेडुतांत शिक्षणप्रसाराचं कार्य करतात, त्यांत राईचंही चांगलं पहाण्याचा त्याचा उद्देश कशावरून नसेल ? तारेबरोबर ते मुंबईला गेले यांतही तसल्या हेतूपेक्षां, तिच्या संकटनिवारणाचाच भाग असेल; तिच्याबद्दलची त्यांची आस्थाही त्यांच्या सहिष्णुतेची न् सहृदयतेचीच उपज कशावरून नसेल ? " असेंही तिला वाटलें.

शोभनेच्या मनांत विजयाच्या शीलाविषयीं संशय उपस्थित झाला म्हणून रामभाऊंना त्या दोन दिवसांत आनंदच होत होता. स्वार्थ साधण्याकरितां त्यांनीं विजयाची चळवळ अनिष्ट आहे हें जाणलें होतें. त्यांच्या आड येणाऱ्या विजयाच्या उत्तरानें रागावून त्यांनीं क्षुल्लक गोष्टींची शहानिशा न करतां, शोभनेच्या मनांत विष पेरण्यास सुरुवात केली. आतापर्यंत प्रेमाचा प्रत्येक दिवशीं वृद्धिंगत होत जाणारा अननुभूत आनंद ज्यांनीं भोगला होता, त्या या दोघां तरुण प्रेमिकांच्या आयुष्यात त्यामुळें कांहीं अस्थिरता उत्पन्न केली, याचें पुर्ण सोडतांना रामभाऊंना मोठेंच कौतुक वाटलें !

यावर शोभनेचा पूर्ण विश्वास बसत नव्हता, तरीही तिच्या मनांत या प्रकारच्या सत्यतेच्या छाननीचा विचार मात्र चालू झाला. ज्यांची धीरगंभीर न् प्रसंगोपात्त हळव्या विनोदाची मूर्ति पाहिल्यावर तिच्या सौख्यसागराला भरती येत असे, त्याचीच मूर्ति जरी आतां तिच्यासमोर सुस्पष्ट उठून दिसत होती तरीही आतां त्याच आकारवैशिष्टयाच्या विषयांत, तिला अल्पशी

मळीनपणाची छटा दिसूं लागली. मात्र ती छटा सत्य आहे कीं कल्पित आहे नि आपल्या मनाच्या भ्रमामुळेंच ती दिसत आहे याची मात्र तिला तितकीशी निश्चिती नव्हती.

विजयानें दुसऱ्याच दिवशीं पत्र टाकण्याचें लिहिलें होतें; त्यामुळें तो सर्व हकीकत दोन दिवसांत आपल्याला कळवील न् या सर्व भानगडीचा, त्या पत्त्यावर भेटूनही, वाटलें तर खुलासा करून घेतां येईल, या कल्पनेनेंही शोभना जरा स्वस्थ झाली; परंतु पुढें दोनच काय पण चार दिवस लोटले तरी तसलें कांहींच वर्तमान न मिळाल्यामुळें विजयाचा तिला एक प्रकारचा राग आला होता.

अन् हे सर्व प्रकार अपुरे होते म्हणून कीं काय, पांचव्या दिवशीं सायकाळीं तिच्या बंगल्याच्या दाराजवळ जो एक अशिक्षित मनुष्य आला होता, त्यानें सांगितलेल्या हृदयविदारक कारुण्यमय कथनानें तर आपल्या या जीवनतारूचे तुकडे होऊन तें उदास अन् भकास परिस्थितीच्या किनाऱ्यावर आदळणार असेंच तिला वाटलें.

“ ताई साऽऽब ?” तो मनुष्य म्हणाला.

“ गणू ! तू रे, इकडे कुठे आत्तां ! ” आपण होऊन शोभनेनें विचारलें. जवळच काका बसले होते अंगणांत हेंही ती विसरली.

“ काय सांगू ! किती कमनशिबी मी ! ” तो पुढें चालत अंगणांत आला.

ज्या कॉटवर काका बसले होते, त्या कॉटच्या खुराजवळ अंगणांत त्यानें प्रस्थान मांडलें.

“ काका सुधीर गेला आपला ! ” भीत भीत, इतकी भयंकर बातमी मी कशी सांगू ! या भावनेनें त्यानें उत्तर दिलें. “ काल संध्याकाळींच ! ”

“ काय म्हणतोस ? ” उच्च सुरांत शोभनेनें विचारलें. तिच्या मनाला ती गोष्ट सहनच झाली नाहीं. वरील उद्गारांवर तिचे डोळे गरकन् वर फिरले; पापण्या मिटल्या गेल्या, अन् तिची तनुलता बाटोळी फिरत फिरत खालीं पडणार, तोंच, प्रसंग ओळखून काकांनीं तिच्या पाठीखालीं हात घालून तिला वरचेवर तोलून धरलें. “ शुभा ! शुभा ! ” त्यांनीं घाईघाईनें हांक

मारिली. " धोंडू ? पाणी आण, जा, पळ; " त्यांचा हा ओरडा ऐकून काकूच पळत पळत ओटीवर आल्या. " शोभना ! शुद्धीवर आलीस का तूं ? ए, हें बघ ! मी, काका, विचारतों आहे ! " असें म्हणूनही तिची काया तशीच ताठ राहिली तेव्हां [illegible] तिला उचलून वरील व्हरांड्यांत बाकावर नेऊन निजविली.

थोडा वेळ तसाच गेला.

थंड पाण्याने तिच डोक्यावर काकू थापटीत होत्या. [illegible] असथपण अन् भांबावल्या नजरेने म्हणत होत्या, " शुभा, शोभना, शुऽऽ " आणि असें म्हणून त्यांनीं तिला हलविलेंही. काकाही पंखा आणण्यास आत गेले. ते बाहेर येतात तों " अगऽ आईऽऽऽ " असा खोल सूर काढला शोभनेने.

काकूंनीं तिचे मस्तक आपल्या मांडीवर घेतलें होतें.

थोड्या वेळानें हुषारी आली तिला !

पाण्याने तिचे केस ओले चिंब झाले होते. त्याच ओघळीने तिच्या स्तनभारावरील कापडही अर्धवट भिजून आतील गोरकाया अस्पष्टपणे प्रतीत होत होती. आपल्या पदरानें काकूंनीं तिच्या कपाळावरील पाणी पुसून काढलें. अन् असें एकदा झाल्यावर त्याच ओल्या टोकानें त्या थोडा वेळ तिच्या मस्तकावर वारा घालीत होत्या !

" शुभा ! शुद्धीवर आलीस ना ! "

अंऽऽ ! हं, कुठें आहे मी ? "

" इथें आपल्याच घरांत आहों आपण ! " लहान मुलीला, ती झोपेंत बावरली असतां, उठल्याबरोबर ज्या वात्सल्यानें आपण सावध करतों, त्याच मायेनें काका म्हणाले.

थोडा वेळ गेला. शोभना आतां चांगली सावध झाली होती. तिचा श्वासोच्छ्वास बरा जोरानें चालू झाला होता. त्यामुळें तिच्या वक्षःस्थलाची सूक्ष्म हालचाल होत होती. तिचे डोळे त्या धक्क्यामुळें क्वचित् बावळट देखत होते. अन् ती उठून बसली तेव्हां, " हें काय ? " म्हणून ओल्या ब्लाऊजवर मान वळवून खांद्याचे मागें ती चांचपत होती.

“ अहे ! मी शुद्धीवरच आहे ! कळलं मला सारं ! ” तिनें सांगितलें.

“ गणू त्या झोलींत जा मी येतेच ! ” काका म्हणाले.

खोलींत गेल्यावर सर्व हकीकत गणूनें काकांना सांगितली.

ती त्यांनीं तावडतोब शोभनेला सांगितली नाहीं; मात्र ते बाहेर आले ते रात्रीच्याच गाडीनें नेरळला जायचं आहे असें म्हणतच !

“ मींही येतें काका ! ”

“ नको शुभा, तूं कशाला येत आहेस ? ” ज्या तऱ्हेनें आपला नकार दाखविण्याकरितां आपण नाखुषीनें विचारतों, तसें काकांनीं विचारलें. “ चल, येत असलीस तर माझं कांहीं जात नाहीं ! पण, पहा बुवा ! ” नाखुषीवर सारवासारव केली त्यांनीं !

त्यांचा इरादा ओळखून शोभनेनंही तो नाद सोडला.

“ अग सर्वच वाईट हें खरें ! परन्तु इतक्या वर्तमानानंच तुझं हळवं मन हादरलं; नेरळला गेल्यावर तिथं आणखी कांहीं वाढलेलं असायचं ! ”

काका असे सहज म्हणालें खरे; परन्तु खरोखरीच सुधीरच्या अपमृत्यू-शिवाय आणखी एक हृदयद्रावक गोष्ट घडली होती नेरळला, हें वास्तविक त्यांना तेव्हां माहीत नव्हतें.

काका गेले त्या वेळेस शोभनेची मनःस्थिति मोठी विचित्र झाली होती खरीच ! वाईट गोष्टी घडूं लागल्या म्हणजे एकामागून एक घडत सुटतात याचाच अनुभव येत होता तिला. विजयाबद्दलचा कळलेला भाग अगोदरच तिला व्यथित करीत होता. त्याच्यानंतर त्याचं पत्रही तिला आलें नाहीं. त्यांत ही आपल्या लहान नि निष्पाप भावाची ताटातूट; आणखी दुसऱ्याच दिवशीं नानांचीही तिला अशीच बातमी समजली.

गाडींत बसल्यावर काकांनीं विचारलें—

“ काय रे ? काय, झालं तरी काय ? कशाला गेला होता सुधीर पाण्यावर ? ”

“ अहो कसा म्हंजे ? कालच देवीचा दिवस व्हता ना ? शेजारच्या चार बाया कसल्यातरी देवी घेऊन त्या बुडवायला जात व्हत्या ! अन् आमच्या दादांनीही हट्ट घेतला नं काय ? नाना सांगत व्हते कीं नगं

भाऊ ! पन् त्येचं मरनं म्हून त्येला न ऐकण्याची बुध्द् झाली. लई रडाया न् वरडाया लागला, तसा नाना शेवटीं म्हणाले, जा ! तरी पन् त्ये म्हणालेच, ही लांब रहा, फार जवळ जाऊं नगस."

"हं !" काकांनीं हुंकार दिला.

"झालं, सारं इस मिलिट बी नसतील झालं. तंवा यक मुलगा आला सांगत, "सुधीर पाण्यांत पडला !"

"पण तो गेला कशाला होता इतक्या पुढें ?"

"अहो ! पुढें कसला ? कांठावर बसला व्हता. तवा, अदुकर ते तलाव पंजे कसा पडका झालाया; पायाचा दगड निसटला अन् त्येच्यासगटच सुधीर खालीं गेला; पन् काका, जवळची बाई फार चलाख हं ! निगुद् पाण्यात उतरली अन् कंबरभर आंत गेली. हांत बी फिरवला तिनं पन् काय बी उपेग नाई झाला."

सुधीरच्या या अपघातानंतरची सर्व हकीकत गणूनें काकांना सांगितली.

तीन चलाख, पोहणारीं माणसें आंत उतरविण्यांत आलीं. जवळ जवळ दीड एक तासाच्या मेहनतीनंतर सुधीरला त्याचा हात लागला. पण त्याला बाहेर काढला तो त्याचा प्राण केव्हांच या मृत्युलोकांतून निघून गेला होता. पंचनाम्याची इत्यादि भानगड होण्याला पुढें वेळ लागला अन् दोन तास लागले, हें सर्व होऊन, दहन करायला सुधीरचें !

"नाना काहीं म्हणाले का त्या वेळेस ?" या त्यांच्या प्रश्नावर गणूनें सांगितलें कीं, नानांना फारच दुःख झालें. इतकें कीं, लहान मुलाप्रमाणें ते धाय धाय रडले. सुधीरवर त्याचें खरेंच तसेंच प्रेम होतें. हें काकांना माहीत होतें. तो जवळ नसला कीं, घडीभरही त्यांना चैन पडायचें नाहीं. असा त्यांच्या हृदयाचा अलौकिक ठेवाच काळानें हिरावून घेतला यामुळें त्यांचें तें निरतिशय दुःख साहजिकच होतें. त्याच्या बाललीलांनीच पत्नीविरहाचें दुःख शीतल मानीत आले होते ते आजपर्यंत ! त्याचा मृत्यु हा त्यांना एक जबरदस्त धक्का होता.

पहाटेस काका नेरळच्या स्टेशनवर उतरतात तों, सर्व बाजारांत सामसूम

होती. पहांटेच्या गोड झोपेंत सर्व जीव रममाण झाले होते. रस्त्यांत आदल्या दिवशींचा कचरा पडला होता. म्हणूनह एकाकीच ते शोभनेच्या घरांत शिरले. नजीकच्या मंडळींनाही त्याच रात्रीं घडलेल्या आणखी एका दुर्दैवी घटनेचें वृत्त समजलें नव्हतें!

घराचें पुढचेंच दार सताड उघडें होतें, आणि वारा घोंघावत होता, तो त्या दाराशींच!

"काय रे; हें काय?" असें म्हणून काकांनीं नानाच्या नांवानें दोनदां हांक मारली. कोठूनच 'ओ' आली नाहीं. मात्र तो गळका ऐकून एक शेजारील गृहस्थ तेथें आले.

"तुम्ही केव्हां आलांत?" काकांना त्यांनीं विचारिलें.

"हा येतो आहे इतकाच!"

"म्हणजे? रात्रीच्या गाडीनेच निघालांत वाटतं?" हा प्रश्न विचारतांच अपघाताची स्मृति त्याना झाली असावी; कारण, 'हॅं, झालं खरं बुवा असं!' असेंच त्याचे बोलणें म्हणत होतें.

आंत जाऊन त्यानीं स्वयंपाकीणबाईंना जागें केलें नि विचारिलें, "नाना कुठें आहेत?"

"त्यानींही 'नाना कुठें गेले आहेत म्हणजे? ओटीवर निजले होते ते! अकराच्या टोल्यापर्यंत खोकत होते तेंही मीं ऐकलं होतं;' असं सांगितलं."

"काल सकाळपासून काहीं बोलले होते ते?"

"छे बाई! नाहीं म्हणायला चार वाजतां ते काहीं तरी लिहीत होते तेवढंच. म्हटलं टाकीत असतील कुणाला पत्र! मीही त्यांना कांहीं विचारलं नाहीं. काल रात्रीं त्यांचा शोक मात्र कांहीं औरच होता हो! वारंवार ते रडत होते. आठवणी काढीत होते. मलाही भीति वाटायला लागली म्हणून यांनाही बोलावलं मी." ह्या शेजारच्या गृहस्थाकडे हात दाखवीत त्या बाई म्हणाल्या.

"हो!" त्यांनींही दुजोरा दिला; "मी आल्यावर त्यांना गप्प बसवलं चुचकारून!"

या सर्व गोष्टींमुळें थक होऊन तीं मंडळी माजघरांत झोपाळ्यावर येऊन बसणार तोंच एक पांढरें कांहींतरी दिसलें काकांना !

त्यांनीं तें उचलले ! पाकीटच होतें तें. झोपाळ्यावर बसतां बसतांच तें त्यांनीं फोडलें. आंतल्या कागदवरील वृत्तांत स्वतः वांचून मग शेजारच्या गृहस्थाजवळ शून्य हृदयानें, तो काकानीं दिला.

तो वाचून ते गृहस्थही उदासीनच राहिले.

दुसऱ्या दिवशीं घराला कुलूप लावून सकाळच्याच गाडीने काका परत पुण्याला गेले; कारण, पत्रातील वृत्तांतच नाना इतक्यात परत येत नाहींत, असें सांगत होता. गणू अन् त्या बाई यानाही काकानीं तात्पुरते पुण्यास नेलें; परन्तु, ते स्वतःही दोनच दिवसात कलकत्त्याला रवाना झाले, तेव्हा ती दोन आश्रित मंडळी आपापल्या सोयीप्रमाणे दुसरीकडे गेली.

दुसऱ्या दिवशीं शोभनेला काकांनीं दिवाणखान्यांत बोलाविले

" शुभा, तुला आश्चर्य वाटत असेल कीं, गणू वगैरेंना इथें कशाला आणलं मीं ! तुला आणखी हकीकत मी सांगणार आहे. परन्तु त्याच्या अगोदरच तूं आपलं मन घट्ट कर; झालं याबद्दल उगीच स्वतःला त्रास करून घेऊं नकोस. मी तुझ्याजवळ आहे तोंपर्यंत नानाप्रमाणेंच मी तुझी काळजी घेईन हें नक्की समज ! "

असें म्हणून त्यांनीं तें नेरळचें पत्र तिच्या हातांत कापऱ्या हातानें दिलें तेथेंच पलंगावर तिच्या दंडांना धरून तिला त्यांनीं बसविले. डबडबलेल्य नेत्रांनी शोभना एका शब्दामागून दुसऱ्या शब्दावर डोळे फिरवित होती.

" चि. शुभास,

अनेक आशीर्वाद; सुधीरच्या अपघातानें माझ्या प्रेमळ हृदयावर किती जबरदस्त आघात झाला तें तूं जाणतच असशील. त्यानन्तर त्या दुःखाचा विसर पडावा म्हणून मीं किती प्रयत्न केला !

माझं दुःख विसरण्याचा मीं शक्य तितका प्रयत्न केला, पण बांध घालून भरतीची हद्द कमी करतां येत नाहीं. आतां या वेळींही माझं डोकं नुसतं फिरून गेलेलं आहे. भणभण चालू आहे. निर्दय

देवानें माझ्यावर असा कां घाला घातला हेंच मला समजत नाहीं ! माझ्या हृदयाचा कलिजा त्यानं हिरावला, त्यामुळें वैराग्यानें मीं हें घर सोडून जात आहें.

मनुष्याच्या पश्चात् त्याचा पैसा व कर्ज हीं बाहेर येत असतात. त्याही बाबतींत मी तुला फार त्रास देणार नाहीं. कांहीं एका परिस्थितींत माझ्या प्रियपत्नीच्या—तिच्या आईच्या—आजारीपणांत मीं आशेनें अतोनात पैसा खर्च केला; त्यामुळें जें काहीं कर्ज झालं, तें आपल्या नेरळच्या घरांत सहज फिटू शकेल; अन् मग माझी बँकेमधील सुमारे दोन हजारांची रक्कम तुझ्या जीवनपथावर पाथेय म्हणून मी तुला देऊ शकतों. हें सर्व तुला सांगण्याचं कारण, मीं तुझा पिता आहें. त्यामुळें तुला आयुष्यात त्रास न पडूं देणं हें माझं कर्तव्य आहे. ही जबाबदारी मी पार पाडूं शकतों आहें, या समाधानाच्या छायेकडे पहातच मी हें घर सोडीत आहें.

विजय सत्शील आहेत; त्यांच्याबद्दल तुझी वृत्ति मीं जाणली आहे. त्यांच्यासारख्या आदरणीय तरुणाचा हात सोडू नको ! काकाच्या आज्ञेंत रहा; त्यांच्या संमतीनं तू लवकरच जीवनांतील सहभागी बनून विजयाबरोबर रहावेंस, अशी माझी इच्छा आहे. ईश्वर कृपाळू आहे ! त्याच्या कृति अतर्क्य असतात; त्यामुळें पुष्कळदां मनुष्य त्यांचा विपरीत अर्थ करतो ! कोणीं सांगावं ? थोड्याच दिवसांत परत आनंदांत आपली भेट होणार नाहीं कशावरून ?

आयुष्याच्या प्रवासांत तुला पूर्ण सौख्य इच्छिणारा, तुझा पिता

नाना."

"काय नशिबांत होतं माझ्या ?" असे उद्गार काढून पत्र संपतांच शोभना रडूं लागली.

प्रकरण १३ वें

# मुंबईची दुर्दैवी घटना

रमाकांतांच्या तारेवरून विजय मुंबईला जाण्यास निघाला, त्या वेळेस त्याची मनःस्थिति निरनिराळे तर्क करण्यांत गुंग होती. ताईवर असें काय संकट आलें आहे? शंकरनेंच तिला फसविलें नसेल ना? कीं गिरणीच्या कामांत कांहीं अपघात झाला तिला? कांहींच त्याला निश्चित समजेना! निघतांना, आपणांस मुंबईस किती दिवस रहावें लागेल याचा कांहींच नेम नसल्यामुळें निघण्यापूर्वी शोभनेची एकदां भेट झाली असती तर बरें झालें असतें, असें विजयाला वाटत होतें. आणि त्याची ही रुखरुख गाडीनें पुणें स्टेशन सोडल्यावर थोडा वेळ कायमच होती.

कल्याण स्टेशनवर गाडी थांबली. खाद्यपेय विकणारे मुलगे आपल्या-जवळच्या पदार्थांची ओरड करीत होते. गाडींतून उतरणाऱ्यांची गर्दी उडाली होती. सर्व स्टेशनभर ती आरडाओरड दुमदुमत होती. विजय गाडीच्या दाराजवळ गेला, अन् त्या दाराच्या खिडकींतून त्यानें बाहेर डोकें काढलें!

गार्डच्या दिशेत त्यानें बाहेर पाहिलें, तों एके ठिकाणीं त्याचें लक्ष खिळलें. आणि त्याला जो मनुष्य दिसला त्याला तो हांक मारणार, तोंच एक वृद्ध गृहस्थ हातांतील गांठोडें सांवरत, त्या दाराच्या मुठीपाशीं हातानें, बाहेरच्या बाजूनें खडखड करूं लागले. त्यांना आंत येण्याकरितां विजयानें दार उघडलें नि पुन्हां तें बंद करून त्या मघांच्या मनुष्याकडे पाहिलें.

सैनिकी वेषांतील एक सोल्जर होता तो! त्याच्या डोक्यावरील हेल्मेट् पाहून तसलीच हॅट वापरणाऱ्या कॉलेजांतील एका प्राध्यापकांची आठवण झाली विजयाला. त्याच्या हातांतील बंदूक त्यानें डयूटी करून

फलाटावर टेकून ठेविली होती. खाकी रंगाच्या कोटावर, त्याच्या खांद्यावर एकेक तांबडी पट्टी होती. त्याचीं पितळेचीं बटणें नि इतर कड्या लांबून चमकत होत्या. अन् पायांत जाडा भलाकचका बूट होता त्याच्या. त्याची दृष्टि आपल्याकडे आहे असें पाहतांच दाराच्या खिडकींतून डोकें अन् दोन्ही हात बाहेर काढून, वांकून टाळी वाजवीत विजयानें त्या मनुष्याला खुणाविलें.

तो मनुष्यही बुटांचा आवाज करीत विजयाकडे आला.

त्याच्या त्या ऐटबाज चालीकडे पहात काहीं उतारूंचें लक्षही त्याच्याकडे वळलें.

"What a surprise to see you, Fred?" ("काय रे! फ्रेड, इकडे कसा तू?") दार उघडून त्याचा हात हलवीत विजय प्लॅट्फॉर्मवर उतरला.

"I am travelling to Vikaspur!" ("विकासपूरला चाललों आहें.") आपल्या निळया डोळयाची हालचाल करीत फ्रेड म्हणाला.

"What's this?" त्यांच्या हातांतील बंदूक हाताळत विजयानें विचारिलें.

"Why? A gun! It's a toy to our children!" ("कां? आश्चर्य वाटलं तुला? बंदूक आहे ती! हं! खेळणं आहे तें आमच्या मुलांचं!")

"And ours can't get even a toy-gun!" ("हो! अन् आमच्या मुलांना खेळांतील बंदुकसुद्धां मिळत नाहीं!") विजयानें हंसत उत्तर दिलें.

"O! you witty chap!" ("काय गमत्या आहेस रे!") असें म्हणत फ्रेडनें खिशातून सिग्रेट्-केस् काढली. विजयाच्या नेहमींचा नकार माहीत असताही ती त्याच्यापुढे धरली; अन् त्यानें नाहीं म्हटलें त्याबरोबर एक सिग्रेट आपल्या तोंडात धरून शिलगाविली.

"What are you there for?" ("काय काम आहे तुझं तिकडे!") विजयानें चवकशी केली.

" I am appointed as the personal secretary to the D. S. P. there!" सफाईदार इंग्रजींत फ्रेडनें उत्तर दिलें.

" I see!" गाडीची शिटी वाजली, त्याबरोबर गाडींत चढत विजय म्हणाला, " I am going to Bombay, at Ramakants'!" ( " मी मुंबईला रमाकांताकडे जात आहे ! " )

" Wish to see you in Vikaspur next mouth !" (" विकासपूरला भेटूंच आपण. ")

"Why ! of course!" (" हो ! हो ! नक्कीच ! " ) चालत्या गाडींतून विजय ओरडला. त्यानें फ्रेड्कडे पाहिलें. फलाटाचें टोंक... पोंचला होता; लांब फ्रेड्चा हातरुमाल हालत होता.

रमाकांतच्या खोलीवर विजय पोंचला, त्या वेळेस रुग्णालयांत जावयास निघाला होता रमाकांत !

" आलास ! छान ! " विजयाला पहातांच स्टेथॉस्कोप खिशांत घालीत रमाकांत उद्गारला. अन् नन्तर इतक्यांत बाहेर पडतां येणार नाहीं म्हणून खिडकींतून, रस्त्याच्या समोरच्याच बाजूला तळमजल्यावर असलेल्या उपाहारगृहामधील मुलाला एक कप दूध आणण्यास सांगून, त्यानें खुर्चीवर बसतां बसतां विजयाला विचारलें,

" स्नान करायचं असेल ना तुला ? "

" हो. " विजयानें मान हालवली.

" केव्हां मिळाली तार ? "

" सकाळींच. पोस्टमननंच उठवलं मला ! " केसांवरून अर्धवट फिरविलेला हात तसाच धरीत विजयानें उत्तर दिलें.

" असं का ! " आपल्यापुढील टेबलावर पाय ठेवीत खुर्चीत मागें रेलून रमाकांत म्हणाला " बरं असं कर ! मला घाई नाहीं आज; तूं येतो आहेस कीं नाहीं हें मला समजत नव्हतं ! तूं आला नाहींस तर आपली स्वतः सर्व तयारी केलेली असावी, म्हणून ऑफिसांतून लवकर परतण्याचा विचार होता माझा. "

"काय झालं आहे रे?"

"तें सर्व सांगतों; पण प्रथम जेवण उरकून घे आपलं तूं!"

भोजनोत्तर सर्व हकीकत रमाकान्तनें विजयाला सांगितली. तो म्हणाला "शंकरनें राईला त्या गिरणींत नोकरीला लावली, तें तुला माहीतच आहे!"

"हो; मला विचारून ती आली होती!" विजय उत्तरला.

"आज पहांटेस कोणींतरी दार खडखडावलें; म्हणून मी उठून तें उघडलें, तों एक भागावलेली अशी दिसणारी बाई दारांत उभी होती. 'दादा' मला मदत हवी आहे तुमची!' असें म्हणून ती गयावया करूं लागली. म्हटलं, कोणी आजारी असेल; गरीबच दिसते आहे; तेव्हां मीं तिला विचारलं,

'कुठे असतां बाई तुम्ही?'

'परळ विभागांत!' असें म्हणून तिनें सर्व पत्ता सांगितला. मजजवळ आहे तो टिपलेला. मी विचारलें—

'कसला आजार आहे बाई?'

'आजार? धुंदी आहे मेल्याची.' ती चिडून म्हणाली. म्हटलं कोणी दारू झोकली असेल हिच्या नातेवाईकांपैकीं; म्हणून मीं विचारलं,

'किती वेळ झाला त्याला दारू घेऊन?'

यावर तिची मुद्रा परत भांबावल्यासारखी झाली. आणि ती जें बोलली त्याचा स्पष्ट अर्थ न कळून मीं तिला धीर दिला—'अशा घाबरूं नका बाई. या, इथें बसा; सगळं नीट सांगा मला.' यावर सतरंजीच्या टोकाला अंग चोरून बसत, माझा गोंधळ ओळखूनच कीं काय, ती म्हणाली, 'तुमचाच ना, हा पत्ता?' तिनें दिलेल्या कागदावरून डोळे फिरवीत मीं 'हो' म्हटलं; 'विजय तुमचा मित्र नव्हं?' तिनें परत विचारलें. माझा होकार मिळतांच, पुढं तिनें सर्व वृत्तान्त सांगण्यास सुरुवात केली. ती म्हणाली,

'त्यांनींच राईला सांगितलं होतं कीं, कांहीं लागलं तर रमाकांतकडे जा! राई म्हणून विजयांच्या गांवची एक बाई इथें गिरणींत कामाला आली

आहे. मी राईच्याच जवळ रहातें. तिथेंच कामाला आहे मी, ' अशा प्रकारें उलगडा करीत ती म्हणाली, ' दादा, विजयदादा राईला म्हणत होता कीं, इकडे येऊं नकोस! पण राईनें तें ऐकलं नाहीं; तिची प्रकृति तर ढासळलीच आहे इथें आल्यावर, पण दुसरही संकट आलं आहे तिच्यावर! शंकरानें तिला इकडे आणलीं तेव्हांपासून तिची खेडवळ भाषा मात्र सुधारली आहे बरीच! रहाणीही थोडीबहुत बदलली आहे. पण ' शंकरनें तिला प्रथम इकडे आणली ती वरवर चांगल्या हेतूनेंच, असें तिला दाखवलं; तरी पण अंतस्थ हेतु मात्र निराळा होता त्याचा. तिला प्रथम तो गिरणीच्या मालकाकडे घेऊन गेला त्या वेळेस हिच्यावरचा मास्तरच फक्त तिथें होता. त्याच्या बोलण्यांतही तिला कांहीं शंका आली असं ती म्हणते. पण पुढें दोन महिने तिला त्याचा कांहींच परिणाम भोवला नाहीं. कांहीं वेळां तो मास्तर तिला अधिक आपुलकी दाखवी पण तोंडानें म्हणे, ' शंकरच्या-मुळें तुला इतकी सवलत आहे हं!' तिलाही तें खरं वाटे! कारण, शंकरही तासन् तास तिच्याजवळ गप्पा मारी अन् गोड बोले. बरेच दिवस झाले तरी तो तिच्याबरोबर पाट लावण्याची गोष्ट मात्र काढीना! त्या वेळेस तिच्या मनांत थोडं वेडंवेरं येई! पण तें तेवढ्यापुरतंच!

' एक दिवस, त्या मास्तरनें तिला घरीं जायच्या वेळेस गिरणी सुटतांना गांठली. ' राई आज तूं फार दमलेली दिसतेस.' तो म्हणाला.

' कसलं दादा? आपली कृपा असली म्हणजे झालं!"

' माझी पूर्ण कृपा आहे. तूं मात्र तयार पाहिजेस.' असले कांहींतरी उत्तर देऊन तो मोठ्यानं खिदळला.'

' दोन चार दिवस गेले.

' परत एकदा तो तिच्याजवळ आला. तिच्या पाठीला त्यानें हात घातला. कामात तर कांहींच चूक नव्हती, मग हा हात कशाला घालतो आहे अशाच संभ्रमांत होती राई! इतक्यात त्यानें हात झटकता बाहेर काढला. ' हाय.'

" काय झालं हो?"

'ही सुई बोचली.'

तिनें आत पहात म्हटलें, 'कुठें? इथें तर कांहींच नाहीं!'

'अशी आहेस!' असें म्हणून त्यानें तिच्या गालावर, कोणी पहात नाहीं असं पाहून, एक हात फिरविला.

'राई चपापली. मास्तर फिरून आपल्या जागेवर जाऊन बसला. ती तरी काय करणार बोलून! वरील सर्व प्रकार ती रोज शंकराला, तो तिच्याकडे आला म्हणजे सांगे; परन्तु रात्रीं पुष्कळ वेळ शंकर गप्पा मारीत बसे तेवढ्यापुरता. मास्तरनें असं कांहीं केलं तर त्याचा जीवही घेण्याची प्रतिज्ञा करी अन् निघून जाई! मग राईच्या मनानें पक्कं घेतल कीं, इथें कांहींतरी निराळाच प्रकार आहे. चवकशी केल्यावर, शंकर कितीतरी दिवसांपासून गुप्तपणें दुसऱ्याच एका बाईबरोबर लग्न करण्याचं ठरवून बसला आहे, हें तिला काल सकाळींच कळलं, गिरणीच्या वेळांत! तस त्याला विचारून इथून लागलीच निघून जायचा राईचा बेतही होता. परन्तु, शंकर दिसतांच त्याच्या सांगण्यावरून राई मास्तरच्या खोलींत गिरणीच्या वेळांतच काल शिरली तेव्हां शकरनें तिला बजावलें, कीं, "याद राख, यांचा अपमान करशील तर! इथं मीं तुला आणली, यांनीं तुला मोठा रोज लाविला तो काय उगीच? बसतीस त्या इनामगांवांत कुजत! मास्तरांचा अपमान झालेला मला खपायचा नाहीं! तुझे गेल्या आठवड्याचे पैसे तुला मिळणार नाहींत आज; ते मी घेणार आहे संध्याकाळीं! तुझ्याविषयीं यांनीं चांगलं मत दिलं कीं मग मी ते तुला देईन. सही करून टाक आतां या कागदावर!" गरीब बिचारी राई! ती म्हणाली, 'सही करून टाकू! पैसे गेले तर गेले. संध्याकाळीं निघून जाऊं म्हणजे झालं!' पण ती घरीं परत जाते तों शंकरानें तिला कोंडूनच ठेवलं. मास्तरानीं आज बाहेरच्या कामगारांना दम भरला अन् त्याचा तर प्रत्यक्ष मालकाशीं बसिला! तेव्हां सर्वजण गप्प बसले. मी सुद्धां बोलूनच आले आहे इकडे!"

त्या बाईच्या तोंडची ही हकीकत ध्यानांत घेतो आहे, तोच दार

उघडलें गेलें अन् ते दोघे बाहेर पहातात तों रमाकांताला तीच सकाळची बाई दिसली.

"हं! हीच आली होती सकाळीं बरं का! हिनें सांगितलेली बातमी ऐकली अन् पहांटेसच अर्जंट् तार केली तुला!" असें म्हणून रमाकांत त्या बाईकडे वळला अन् म्हणाला, "काय पाहिजे आहे आतां?"

"दादा! राईला आजही कोंडूनच ठविलं आहे. रात्रभर शंकर तिथेंच होता, त्यामुळें मी कांहींच करूं शकलें नाहीं! सकाळची हकीकत मीं तुम्हांला सांगितली, अन् तसं राईला कळवलं; तेव्हां, परत गिरणींत जायच्या वेळेस तुम्हांला संध्याकाळच्या आंत बोलावलं आहे, असा निरोप तुम्हांला सांगायला तिनें सांगितलं. म्हणून आलें आहें मीं."

"असं ना?" रमाकांत म्हणाला. "हें पहा, हेच ते विजय. तिला म्हणावं, संध्याकाळच्या आंत तुला येऊन घेऊन जातों आम्ही! कांहीं काळजी करूं नको. मात्र हें तूं कोणाला कळवूं नकोस हं!"

"छे छे! असं कसं करीन मी?" असें म्हणून ती बाई निघून गेली.

"तुला हॉस्पिटलमध्यें गेलंच पाहिजे का रे?" विजयनें रमाकान्तास विचारलें.

"हो! वाटलं तर लवकर येऊं शकेन परत. पण गेलं हें पाहिजेच!"

"तरी हरकत नाहीं! परत ये लवकर. मी वाट पहातों आहे. जाऊ दोघेही." असें विजय म्हणाला.

त्यानंतर सायंकाळीं चारचे ठोके पडून गेले. अजून रमाकांताचा पत्ता नाहीं म्हणून विजय गॅलरींत आला. तेव्हां रस्त्यावर रहदारी नेहमीप्रमाणेंच चालू होती.

पांचाचेही टोले पडले. त्यानें रस्त्यावर पाहिलें—

रस्त्यावरची गर्दी वाढूं लागली शाळा सुटल्यावर. त्याच नादांत एक लहान मुलगा रस्त्याच्या बाजूच्या दुकानांच्या पाट्या पहात चालला होता. दुसऱ्याच बाजूला एक बरा मोठा मुलगा गळ्यांतील पाकीटाचा पट्टा सारखा करीत दुसऱ्या हातानें पहिल्या मुलाचा खांदा हलवून समोर

पहाण्याविषयीं त्याला सूचना देत होता. एक हमाल, आपल्या डोक्यावरील डोईजड भरगच्च पाटी नेहमींच्या शिताफीनें तोल सांभाळीत घेऊन गेला. एक ट्रॅम खण्खण् आवाज करीत निघून गेली. ट्रॅमच्या मागील बाजूस ट्रॅम कंडक्टर समोर पहात हात रेलून उभा होता तोही त्याला दिसला.

अजूनही रमाकांत आला नाहीं हें पाहून आतां अधिक थांबण्यांत अर्थ नाहीं असा विचार करून विजय निघाला.

त्यानें कुलुप लाविलें.

दगडी जिन्यावरून तो सफाईनें उतरलाही.

खालीं आल्यावर जी ट्रॅम मिळाली तिनें तो राईच्या घराकडे निघून गेला. रमाकांत परस्पर गेला असेल अशी समजूत होत त्याची ! राई रहात होती, त्या कोंदट अशा मजुरांच्या वस्तींत शिरतांना विजयाला कसेंसेंच वाटलें. तो यंत्राच्या खडखडाचा आवाज कर्कशपणें उमटत होता. सायंकाळीं कामावरून सुटलेले कामगार अतिशय घाईनें घरीं जात होते. त्यांच्या बहुतेकांच्या हातांत तें दुपारच्या भाकरीच्या रिकाम्या डब्याचे बोचकें होतें. अर्धवट कपड्यांत ते कसे तरी वावरत होते. बोलतांना ते आपल्या शरीराची एखाद्या निर्घृण तुरुंगांतून सुटका झाल्याप्रमाणेंच बोलत होते. कांहीं जणांचे सर्व अंग घामानें चिबचिबीत झालें होते.

ट्रॅमच्या नाक्यावर उतरून विजय, ज्याच्या दुबाजूस त्या कामगारांच्या चाळी होत्या, अशा अरुंद रस्त्यावरून जात होता. सात साडेसातचा सुमार असेल. त्यानें हातांतील पत्ता परत एकदां नीट वाचला. वाटेनें त्या कामगारांच्या मानानें कितीतरी श्रीमंत अशा आपल्या पोशाखामुळे आपणाकडे त्यांचें विशेष लक्ष आहे हें पाहून विजयला कसेंसेंच वाटलं. "अन्नाची तातातुट पडते आहे ह्या गरीबांना अन् बाहेरच्या जगांत त्याची दाद तरी आहे का !" त्याला वाटलें. 'आर्थिक विषमतेवर कोणी कोरडं ओढूं लागलें कीं भाई म्हणून त्याची वेड्यांत गणना करण्याचा जणूं परिपाठच असतो. त्याच्या भाषणांतील अतिशयोक्तीचा भाग सोडला तरीपण त्या जिव्हाळ्याखालीं जें सत्य तत्त्व आहे तें विसरून कसं चालेल ! समाजांतील जन्म

त्या त्या मनुष्याचं दैव ठरवूं लागला, अंगी असलेल्या इतर पांढरपेशा गुणाला परिस्थितीमुळें वाव मिळू शकत नसला, तर करायची काय ती समाजरचना? ती बदलली पाहिजे. मग सर्वच उलटापालट करायची कीं थोडा बदल पुरे, तो प्रश्न निराळा." त्या अंधारनगरींतून फिरतांना इथून तिथून सर्व दैन्य दिसलें त्याला. स्वार्थसाधु लोकांच्या आणि लुटारू लबाडांच्या अक्षम्य वृत्तीचा तो प्रत्यक्ष परिणाम होता. "व्यसन मुळें त्यांचं जीवित अधिक दुःखकारक होतं," त्याच्या मनांत विचार आला "असं, पुढारी मोठ-मोठ्यानें ओरडतात!" व्यसनं! हो पण तीं तरी त्यांना कोण लावतो? जीवनांतील शुद्ध असह्य होते, म्हणूनच मद्याला स्पर्श करण्याची बुद्धी होते मनुष्याला! सकाळ सायंकाळ राबून त्यांच्या शरीराची दुर्बलता वाढवून त्यांचा योग्य मोबदलाही न देणाऱ्या व्यक्तीकडे दोष आहे याचा! दीनांची संस्था म्हणून टेंभा मिरविणाऱ्या पण वस्तुस्थितींत मिरासदारांचा कळप असलेल्या संस्थेतील अधिकाराच्या जागेवर असणाऱ्यालाही असं म्हणायला धीर होत नाहीं कीं, 'मी वरिष्ठ हुकुमशहांच्या मर्जीची पर्वा करणार नाही यापुढें! माझ्या हातांत जी सत्ता आहे मग ती कितीही थोडी असेना! तिचा उपयोग संकटग्रस्तांची गरज भागविण्याकडे करीन, मग गैरमर्जी होऊन मला अधिकार-त्याग करावा लागला तरी हरकत नाहीं. कर्तव्य अन् विवेकबुद्धीपेक्षां दिखाऊ अधिकारपद नि शिस्त मला मुळींच जास्त नाही." कारण इतका विचार केला कीं, याच अधिकाऱ्यांना असं कळून येईल कीं, चांगल्या गोष्टीला नेहमींच जनतेचा पाठिंबा राहील! कांहीं अपवाद असतील त्याला; पण ते स्वार्थी नि ढोंगी लोकच! अन् जनतेच्या हृदयांतील अधिकारपद हेंच नकली अधिकार-पदापेक्षां अधिक मानाचं, मोलाचं!"

या विचारांत विजय जरा पुढें गेला. एका अशक्त अन् वृद्ध म्हाताऱ्याला त्यानें पत्ता सांगून नक्की ठिकाण विचारलं; हात दाखवून त्यानेंही बरोबर दिशा दाखविली. त्याच दिशेंत विजय दोन फर्लांग गेला; एका पडक्या चाळीच्या तिसऱ्या मजल्यावरील शेवटच्या कोंदट खोलीशीं तो गेला. त्यानें दारावर धक्का मारला. पण कोणीच आलें नाही बाहेर. आणां काय

करायचें या विचारांत तो होता, तोंच खिडकींतुन कोणीतरी आपल्याला पहात आहे असें त्याला दिसलें. जवळ जाऊन त्यानें पाहिलें. राईच होती ती. त्यानें बाहेरची कडीही काढली.

" आलास ? " गळ्यांशीं वांकून तिनें प्रश्न केला.

विजयला पाहिल्याबरोबर तिला अनुपम आनंद झाल्याचें दिसत होतें. शील बचावल्याचा तो आनंद होता. प्राणापेक्षांही स्त्रियांना शीलाची मातब्बरी अधिक वाटते, ती काय उगीच ! तिचा चेहरा बराच फिकट वाटला विजयाला. तिची काया कृश झाली होती. अन् आजारांतून उठलेल्या मनुष्यानें आपल्या पूर्वीच्या बालमित्रांत जाण्याची उत्कंठा दाखवावी, त्याप्रमाणे इनामगांवला जाण्यासाठीं ती खोली सोडण्याची तिला प्रबळ इच्छा झाली होती. विजयानें दाराला बाहेरून लावलेली कडी काढली. तेव्हां लागलीच तिनें दार उघडलें.

विजयाचें मन खोलींतलें दृश्य पाहून उदास झालें. भकास भिंतीवरील कोळीष्टकें जाळीदार मळकट धाग्यावर टांगल्याप्रमाणें हालत होतीं. धुरानें सर्वच खोली काळवंडली होती. मोरीच्या भिंतीवर पिकदाणीच्या भांड्यावरीलप्रमाणें तांबूलाच्या वाळलेल्या पिचकाऱ्या दिसत होत्या. त्या कुंद वातावरणांत हवा खेळण्यास अन् स्वच्छपणाच्या प्रकाशाकरतांही वरील एक बारीकशी खिडकी हाच एक अपुरा मार्ग होता. विजयाला वाटलें, " नरक नरक म्हणतात त्याचीच ही छोटी आकृति नाहीं का ! मानवी जीवनांतील सर्वसामान्य सौख्यासही आंचवलेले हे जीव ! यांनींच का माझा देश गजबजला आहे ! नारिंगाच्या गोलावर मुंगी फिरत असावी ना ! तसेच आजचे तरुण स्वतःच्या लहानशा जगांत वावरतात. त्यांना वाटतं हेंच जग आहे; परन्तु असं करतांना ते चुकतात. आरामशीर बंगले सोडून, ते इकडे यावयाची काळजी घेतील तर त्यांना कळेल कीं सत्यस्थिति निराळी आहे. मिष्टान्नांच्या पंक्ति झोडतांना, या ठिकाणच्या बुरसट अन् शिळ्या भाकऱ्यांची दुर्गंधी इथून त्यांच्या नाकांत पोचवेल तर मग ते जागे होतील कीं, जीवितांची ही प्राथमिक गरजही मिळत नाहीं पुष्कळांना ! उंची गरम कपडे

विसरून, या लोकांचीं कुडतीं त्यांनीं पाहिली कीं कळेल त्यांना, कीं लाज राखणं सुद्धां मोठं मुष्किलीचं काम आहे या गरिबांना. परन्तु आजूबाजूस पहाणार नाहींत ते आणि ही स्थिति जगाच्या समोरही यायची नाहीं! हरकत नाहीं! दुःखाची परिसीमा हाच कधींकधीं सौख्याचा उगम असतो ना!'

"विजय वाईट लागते ना ही माझी खोली?"

"कुठें येऊन पडली आहेस तूं राई? इनामगांवचं नंदनवन सोडलस अन् या अंधारकोठडींत येऊन पडलीस. प्रेमाची ओढ लागली होती तुला! माझं ऐकलं नाहींस—"

"कांहीं बोलूं नको!" त्याच्या तोंडावर तिनें हात ठेवला. "मीच वेडी आहे, दादा."

"तुझी खोली उघडी कशी? कोंडलं होतं तुला त्यानें?"

काळोख खोलींत घुसूं लागल्याने राई उठली. एक अर्धी मेणबत्ती जवळच्याच तिटक्यावर तिने उभी करून ती पेटविली आणि मग ती म्हणाली—

"हो; संध्याकाळ झाली, आतां कुठें मी पळून जाणार आहे, अशा विचारानं तूं यायच्या अगोदर एकच मिनिट शंकरनें कुलूप काढलं! मी विचारच करीत होतें? पण माझं मन पुन्हां सांगूं लागलं, 'माझा दादा माझ्यावरील प्रसंग टाळण्याकरितां पुण्याहूनही लागलीच धांवून येईल!' हे घे दादा!" असें म्हणून ती उठली. फळीवर एक टिन्‌चा धुरकट डबा होता तो तिनें उघडला. त्याच्या हातावर तिनें कांहींतरी ठेवलें नि म्हटलें— "मांडून मला खातां आलं असतं पण तूं आलास म्हणून अन्नं खाऊं शकते आहे मी. म्हणूनच मीं थोडी वाट पाहिली. शिळ्या भाकरीच्या गाकरांचा खाऊ आहे हा दादा; मी दुसरं कांहीं सुद्धां देऊं शकत नाहीं तुला." डबा लावून तो ठेवण्याकरितां उठतांना ती उद्गारली.

"राई! असं म्हणूं नकोस. तुझी हीच भेट मला किती अभिमानाची आहे! बहिणीचं प्रेमळ हृदय यात आहे ना? झालं तर! पण राई! मी एकट्याच खात नाहीं हां! तूंही घे!" असें म्हणून त्यांतील थोडा भाग त्यानें तिच्या तोंडांत टाकला.

कृतज्ञतेनें ऊर भरून आल्यामुळें, तिनेंही न बोलतां तो स्वीकारला. जन्मानें नाहीं तरी हृदयानें बहिणभावंडंच होतीं तीं !

" उठा दादा, आलाच तो ! "

", कोण ? "

" हाच मास्तर मेला ! " खिडकींतून बाहेर दृष्टि टाकली राईनें.

आतांच परिक्षेची वेळ आहे असें समजून विजय त्या मोरीच्या ओट्या-आड लपला. राईला त्यानें चांगलीच पढवून ठेविली होती काय बोलायचें त्याविषयीं !

मास्तर आंत शिरला. मद्रासी तऱ्हेचें धोतर तो नेसला होता अन् तसाच दिसत होता तो.

पाठोपाठ शंकरही होताच. आंत येतांना कांहीं गलका ऐकूं येत होता रस्त्यावर. ' जरा दम धरा ' असें कांहींसें मास्तर म्हणाले त्या लोकाना ' अन् त्यांच्याशीं कांहींतरी बोलून शंकर खालीं गेला.

मास्तर फारच बडबडत होता. मग तो काहीं झोंकून आला होता कीं काय न कळे !

" राई, आज तूं गिरणींत नाहीं आलीस ? " तिच्याजवळ जात तो म्हणाला.

त्याचा हात झिडकारीत तिनें उत्तर दिलें, " इथें अडकलें होतें मी ! "

" का ? माहीत आहे ? " परत त्यानें तिच्या अंगावर झेंप टाकली.

" हं ! बाजूला व्हा मास्तर ! माझ्या अंगाला हात लावाल तर मला मुळींच खपायचं नाहीं; तुमच्या चिंधड्या उडतील इथें ! " असें म्हणत तिनें त्याला जे लोटलें, तें झिंगत झुकांड्या खात तो त्या मोरीजवळ आदळलाच इतक्या जोरांत !

विजय झटकन् बाहेर झाला.

" खबरदार ! " मास्तर परत उठलाच नव्हता, तिकडे पहात विजय राईला म्हणाला.

दोन जिने उतरून तीं दोघें रस्त्यावर येतात तों सबंध बाटभर काळोख पडला होता. कांहींही दिसत नव्हतें.

"तुम्ही इथें कसें रहातां, राई?" असें विजय तिला म्हणत आहे तोंच त्याच्या पायाला कोणी मिठी मारली. त्यामुळें तो खालीं पडला. पडतां पडतां नगरपालिकेच्या अंधुक कंदिलाचा प्रकाश चमकला. बाजूची एक पांढरी भिंतही दिसली त्याला अन् राईचा कातर आवाज ऐकूं आला—

"शंकर!" उचललेली काठी आणखी दोनदां शंकरनें विजयाच्या मस्तकावर हाणली; विजयाच्या कपाळावर एक प्रहार झाला नि तो निपचित खालीं पडला.

त्याच्याजवळ जाऊन राई ओरडली. सर्व बाजूचे लोक गोळा झाले. त्या भानगडींत दोन माणसें निसटलीं. त्यांपैकीं एक शंकर होता तें राईनें पाहिलें.

सर्वांनीं विजयाला उचललें. बेशुद्ध स्थितींत होता तो. लांब रस्त्यावर एक मोटरचा उजेड चमकला. तिकडे कांहींनीं पाहिलें.

मोटार जवळ आली. तींत रमाकांत होता!

"गर्दी कसली आहे?" त्यानें प्रश्न केला.

"बरे आलांत!" राईचा आवाज आला. त्यावर रमाकांत म्हणाला—

"उशीर झाला! एक अर्जंट केस होती त्यामुळें येतां आलं नाहीं लवकर."

"मार लागला आहे!"

"कोणाला? विजयाला?" मोटारच्या बाहेर येत रमाकांतनें विचारलें.

"हूं!"

"चला चला! जलदी करा!" विजयाचे जवळ जात तो म्हणाला, 'उचलून ठेवा माझ्या मोटारींत! अं' पोलीस घेऊन जाऊं म्हणत होतो, तर म्हणाला, 'मनगटांत पुरेशी शक्ति आहे माझ्या!'

यावर तीन चार जणांनीं विजयाला उचलून मोटारींत ठेविलें; मोटार सरळ रुग्णालयाकडे नेण्यांत आली. स्वतःच एक अधिकारी डॉक्टर असल्यानें रमाकांतनें सर्व व्यवस्था त्वरित लाविली.

"अरे याच्या डोक्यावर आईसबॅग पाहिजे बरं का!" चीफ सर्जन

विजयाचे कपाळावरील आणि तो पडल्यावर रस्त्यावरील एका बारीक टोकाच्या दगडानें झालेली त्याच्या पाठीवरील जखम बांधीत इंग्रजीत म्हणाले "अन् यांना हालू देऊं नका!"

"विशेष धोका नाहीं ना? किती वेळ लागेल त्याला शुद्धीवर यायला?"

या रमाकांतच्या प्रश्नावर हातांतील टॉवेल फिरवीत चीफ सर्जन म्हणाले, 'That's uncertain!" ("तें नक्की सांगता येत नाहीं!") "कुठें रहातात हे?"

"माझ्या घरींच!"

"I think he'll be all right within six to eight hours."

("सात आठ तास लागतील असं वाटतं त्यांना शुद्धीवर यायला.") विजारीच्या खिशांत हात घालीत सर्जन् म्हणाले.

रमाकांतनें त्या दाखान्याच्या सर्व जबाबदार मंडळींना विजयाविषयीं विशेष काळजी घेण्यास सांगितलें. राई विजयाजवळच बसली होती.

दुसरे दिवशीं पायऱ्या चढतां चढतां रुग्णालयाच्या पोर्चमध्येंच उभे असलेल्या चीफ सर्जनना रमाकांतने विचारलें, "काय म्हणतो आहे विजय?"

"बरा आहे!"

डॉक्टरांच्या वरील उद्गारांचें कारण सकाळपासून विजय मधून मधून पाणी मागत होता. मुसुंब्याचा रसही एकदां त्यानें घेतला होता हें होतें. परन्तु अजून पूर्णपणें शुद्धीवर त्याचें येण्याचें लक्षण दिसत नव्हतं! डॉक्टरांच्या मतें, तो तशाच स्थितींत आणखी चार दिवस रहाणें अशक्य नव्हतें, अन् त्यांत त्यांना कांहीं धोकाही वाटत नव्हता!

"He's surely secured to complications, now!"

("आतां निश्चित अधिक अस्वस्थ होणार नाहीं तो?") विजयाच्या कॉटशेजारीं जाऊन त्याच्या डोक्यावर हात फिरवीत चीफ् सर्जन म्हणाले.

बातमी कळल्यावर दादांनीं वहिनींना मुंबईस धाडून दिलें. स्वतः तशीच गरज असती तर तो येणार होता. कारण अजून शेतकामाचा हंगाम होता त्याच्या.

गेले तीन दिवस वहिनींना विजयाच्या शुश्रूषेमुळें मुळीच उसंत नव्हती. हॉस्पिटलमधील त्या पांढऱ्या पोशाखांत वावरणाऱ्या परिचारिका, आपल्या सूटबुटाच्या ऐटींतच फिरणारे शिकाऊ डॉक्टर नि त्यांच्याशीं क्वचित्प्रसंगीं विनोद करून नवीन रुग्णांची स्थिति त्यांना समजावून सांगणारे अनुभवी डॉक्टर्स, यांची ये जा तेथें सर्वदा चालू असायची! तेथील औषधांची दुर्गंधी, आपापल्या नातेवाईकांच्या काळजीनें झालेले आपद्ग्रस्त चेहरे, रोगी लोकांच्या फिक्कट मुद्रा, त्याचा वहिनींना कंटाळाच आला. वेळींअवेळीं स्वतःच्या कामाकरतां आलेले बाहेरचे रोगी, विजयाच्या दालनांतही डोकावून जात. उल्हासाचा पूर्ण अभाव आणि आशानिराशांची शिवाशिवी हाच विशेष होता त्या जागेचा.

रमाकांताकडून पुस्तक मागवून घेऊन त्या वाचण्याचा यत्न करीत! परन्तु विजयाच्या काळजीमुळें तें त्यांच्या हातून होत नसे!

पाचव्या दिवशीं त्या दालनांतील उंच नि किंचित् दात पुढें असलेली नर्स् हसत अन् हेलकावणाऱ्या गतीच्या चालीनें मुख्य डॉक्टरांकडे गेली.

"Your patient is all right!" ("कालचे गृहस्थ शुद्धीवर आले")!

"Is it? that's good" ("असं का! वा!") त्यांनीं टाळी वाजविली. विजयाजवळ जाऊन मग ते म्हणाले—

"You are all right, my friend!" ("तुम्ही बरे झालें आहात!")

## प्रकरण १४ वें स्वामीनीं सांगितलेली जीवनकथा

मुंबईला वरील घडलेल्या अपघाताला वीस एक दिवस झाले असतील. तोंच विकासपूरलाही तसाच शोकजनक प्रकार घडला होता. क्रांन्तिमंडळाच्या परवाच्या सभेला सुरुवात झाली अन् जस्टिस् ग्लीसन् याना मारण्याचा कटही अजयानें रचला. परन्तु दैवदुर्विपाक कीं, आनंदस्वामींची प्रकृति जी ढांसळत होती, ती मुळींच सुधारली नाहीं. त्या दिवशींच्या झटक्यानंतर ते बिछान्याला खिळूनच होते. त्यांच्या मुद्रेवर जें अल्प तेज होतें तेंही प्रकाशयुक्त होतें. पण त्याचा उठावदारपणा पाणी शिंपडलेल्या फुलांच्या टवटवीतपणासारखा होता. तो टवटवीतपणा जसा अल्पकालीन असतो त्याप्रमाणेंच स्वामींच्या आयुष्याची कालमर्यादाही अल्पकाळच लांबणार होती. रात्रीच्या प्रहरीं मंदिराच्या अत्युत्तम कळसासुद्धां सर्व भाग तिमिरपटलांत बुडून जावा परन्तु भाविक भक्ताला भगवानाचा दिव्य मंत्रही अंतःप्रेरणेने ऐकूं यावा नि त्यामुळें त्या भीषणतेचा नायनाट व्हावा त्याच्या मनांतून, तशीच एक संदेशयुक्त भावना या निराशेतहि अजयाला ऐकूं आली.

मृत्यु हा अनुल्लंघनीय पर्वत असेल मनुष्याच्या जीवनप्रवासांत! पण त्यामुळेंच मनुष्याच्या पराक्रमाचे प्रतिध्वनि शेंकडों शतकें परत परत घुमत रहातात त्या माणसाच्या पश्चात् या पर्वतावर आदळून उलटत! रायगडनें शिवाजीचें देहावसान पाहिलें. परन्तु त्याचा इतिहास विदेशांतीलही सहृदय मनुष्य अजूनहि पाहूं शकत नाहीं काय? नेपोलिअन्चा अंत सेंट हेलिनाच्या उत्तुंग तटांनीं कदाचित् सद्गदित मनानें, पण पाहिला असेल; परन्तु त्याचें युद्धकौशल्य आज खुद्द आंग्लिकांनाही तारीफ करण्यासारखें वाटत नाहीं काय? शनिवारवाड्याच्या तटानें अभिमानानें उत्कर्ष पाहिला

अन् नंतर मृत्यूही पाहिला बाजीरावाचा! पण मृत्यूनन्तरही त्याच्या पराक्रमी घोड्याच्या कथा आजही उत्तरेतील सरित्प्रवाहांना पुनीत करीत आहेत ना?

पराक्रमानन्तर मृत्यु हें जीवनच आहे खरोखरी!

आनंदस्वामी आज मृत्यु पावले; पण त्यांनीं पसरविलेले क्रांतीचे लोण त्यांच्या मागील लोकांना स्फूर्ति देणारें झालें!

स्वामींची जर्जर काया वार्धक्यांत किती वेळ टिकाव धरणार! त्यांचें मन तारुण्यांतच होतें आतां! परन्तु मूर्ति नवी असली तरी देवालयच गेल्यावर तिचें चिरंतनत्व अनिश्चित होतें न् कदाचित् त्यांतच ती माती-मध्येंही मिळून जाते!

"अजय!" वास्तविक गेले तीन दिवस स्वामींनीं बोलणेंच सोडून दिलें होतें. त्यामुळें त्याची हांक आश्चर्याची वाटली जयाला!

स्वामींची चर्या गंभीर होती. पण उदात्त आत्मविश्वासाची नि धैर्याचीही त्यांत चमक होती. मृत्यु पुढें उभा राहिला होता तरी, त्याचेसमोर दंड थोपटून मनोधैर्य दाखवीत होते ते.

"अजय! आतां मी कहीं फार जगूं शकत नाहीं; तुझ्यासारखा एकनिष्ठ मुलगा माझेजवळ आहे या शेवटच्या घटकेला, यांतच समाधान वाटतं मला!"

"असं बोलू नका मामा!" अजयाचें हृदयही कळवळलें.

"मामा! तूं मला मामा म्हणून हांक मारीत आलास! परन्तु अज्ञानात होतास म्हणूनच तूं असं केलंस!"

"तुम्ही काय बडबडतां हे? निजा; स्वस्थ पडा जरा!" त्यांची उशी सारखी करून तिकडे बोट दाखवीत तो म्हणाला. "मी आहे ना! कश्शाची काळजी करूं नका!"

"नका कशी! अजून कांहींही पत्ता नाहीं ना अंमलबजावणीचा!"

"सर्व सिद्धता झाली आहे!. आता फक्त ठिणगी पडण्याचा अवकाश!"

परन्तु त्या अगोदरच माझी जीवनज्योत विझणार जया!" असें म्हणून

धैर्याचा बुरूजच ढांसळला म्हणूनच कीं काय तो धैर्यवान् पुरुषही ढसढसां रडूं लागला.

"मला कांहीं आशा नाहीं!"

"कसली!"

"त्या कार्याची पूर्तता डोळयांनीं पहायची!"

थोडा वेळ स्तब्धता होती. पावसाची झिरझिर चालूच होती. पण पुढे होणाऱ्या वादळाच्या पूर्वीचीच होती ती! पंतीचा पुसट प्रकाश प्रदीप्त करीत होता त्या आश्रमाला! अंगावरील पांघरलेल्या धोतरानें नाकापर्यंतचें तोंड झांकीत अश्रुपूर्ण नेत्रांनीं अभयाकडे पहात स्वामी म्हणाले,

"परन्तु लक्षांत ठेव. माझ्यामागें कां होईना! पण शक्य तितक्या जलदीनें झालं पाहिजे तें! कर्तव्यपूर्ति ही कधींही अकालीं नसते!"

स्वामी यावर थोडा वेळ जरी बोलले नाहींत, तरी बोलण्याची त्यांना फार इच्छा होती असें दिसलें. बोलण्याचा नुसता प्रयत्न करावा, त्याप्रमाणें तोंडाची हालचाल त्यांनीं केली. पण व्यर्थ—

"काय हवं तुम्हाला?" त्यांच्या पलंगाजवळ जमिनीवर गुडघे टेकीत त्यांच्या अंगाला स्पर्श करून अभयानें प्रश्न केला.

"पाऽऽणी!" आवाज आला नाहीं तरी तसें त्यांचें तोंड हाललें. अभयानें त्यांना पाणी दिलें. नि त्यावर त्यांना थोडी ग्लानि आली.

थोड्याच वेळांत एक धक्का देणारी नि अद्यापपर्यंत अज्ञात असलेली अशी, अजयाची जीवनकथा सांगण्यास लागणारी शांतताच होती ती, असेंच वाटावें कोणाला! कारण—घरांत जाऊन कसेंबसें थोडेंसें अन्न पोटांत ढकलून अभय बाहेर येऊन दोन तास झाले असतील! तोंच—

स्वामींनीं परत एकदां हांक मारली, अभयाला!

त्यांची ती अकल्पित हुशारी पाहून अभयाच्या मनांत चर्र् झालें. कारण दिवा विझण्यापूर्वीं त्याची ज्योत एकदां मोठी व्हावी तशीच ती हुशारी होती त्यांची. या नुसत्या कल्पनेनेंही त्याच्यावर दुःखाची झांपड आली, पश्चात्ता

कोरड पडली; त्यानें घसा खाकरून साफ केला अन् पंटात तांब्यातील थोडंसे पाणी ढकललें;

पाणी पिऊन आपल्या डोळ्यावरून थंड हात फिरविला त्यानें! जणूं पुढं दिसणाऱ्या भयंकर प्रकाशानें दिपून जाऊं नका असेंच म्हणत होता डोळ्यांना तो.

खरोखरीं त्याच्या हृदयांत धडकी भरली होती; परन्तु स्वामींना तें न दिसावें, म्हणून उसन्या आनंदी वृत्तीनें तो त्यांच्याजवळ गेला.

वादळी वाऱ्याचा घों घों आवाज चालू होता. आश्रमासमोरील वृक्षांच्या शाखा कंपायमान दिसत होत्या. त्यांच्या पर्णपुटामधून निसटणारा पर्जन्य आवाज करीत होता. झिर्र्र्र्—

" तुला काय सांगितल मी ? " स्वामी उद्गारले.

" केव्हां ? "

" दुपारीं ! माझी इच्छा मरणानन्तर तरी पुरी कर ! "

" हं, हं ! असं बोलूं नका मामा ! "

" मामा कसला मी, पोरा ? " त्याचा आवाज घोगरा झाला.

" म्हणजे ?

" मी वस्तुस्थितींत तुझा मामा नाहींच; " स्वामींनीं सुरवात केली. " परिस्थितीनें या नात्याला जन्म दिला ! " आपला अशक्त हात स्वामींनीं अजयाचे पाठीवरून फिरविला. चित्तवृत्ति विचलित करणाऱ्या त्या रहस्यस्फोटाच्या वृत्तकथनांतही वात्सल्यानेंच स्वामींनीं त्याला सांवरिलें.

" शुभ्रशीळेच्या तीर्थांत होतों मी त्या वेळेस ! माझ्या अज्ञातवासांत अनेकांच्या बरोबर अनेक प्रकारें भेटी झाल्या; पण तुझ्या ठिकाणीं जी ही भेट—हा प्रेममय ठेवा मला मिळाला, त्याचं विस्मरण या अंतिम घटकेलाही मला होणं शक्य नाहीं.

" दुसऱ्या दिवशींच मी तीर्थांतर करणार होतों म्हणून प्रातःकाळींच उठलों होतों मी; शय्या सोडून मी ज्या वेळेस रस्त्यालगतच्या, त्या तीर्थाला जवळच असलेल्या, ओहोळाजवळ आलों, त्या वेळेस सर्वत्र धुसारी

देणारं वातावरण होत. प्रातःकाळच्या मंद मारुताचा सुखकर झुळुकीनें माझं अंग पुलकित होत होतं; त्यांतील शीतलता अंगावर रोमांच उभे करीत होती. चंद्रराज नुकताच अस्तास गेला होता. दिशा उजळण्याच्या बेतांत होत्या. त्या जलप्रवाहाच्या अखंड गतीकडे कितीतरी वेळ पहात राहिलों मी! त्या प्रवाहाचा विवक्षित आवाज माझ्या कर्णरंध्रांत घुमूं लागला. मी खालीं वांकलों. माझ्याजवळच्या कमंडलूत प्रातर्विधीकरितां, पाणी भरून मी घेणार, तोंच त्या निर्झर जलौघाच्या आवाजात एक विभिन्न नि आर्त असा स्वर त्या बाजूकडून येऊं लागला. मी त्याच स्थितींत थबकून स्तब्ध राहिलों. मी माझा श्वासही आवरला थोडा वेळ। तो कंपित स्वर जरा जोरानें येऊं लागला!

"कमंडलू कांठावर टेंकला मी अन् रस्त्याच्या बाजूला धांवलों!"

"रस्त्यावर मी आलों तों एका झाडाखालींच तूं मला दिसलास."

स्वामींच्या या उद्गारांचें शेवटचें वाक्य बाहेरील मैदानात विजाच्या कडकडाटात अस्पष्ट ऐकूं आलें अजयाला. "धूम् धडाड् धाड्—" बाहेरील अंतराळांत मेघांचा भयप्रद स्वर उलट दिशेनेंही प्रतिध्वनित होत होता.

"तुझ्या शरिराला माझा हात लागतांच, तुझं रडं थाबलं। बालपणचा मुग्ध भाव तुझ्या तोंडावर खेळत होता! तुझ्या अधरद्वयांना मीं बोटानें हलवितांच तू हंसूं लागलास! तुझ्यावरील प्रसंगाची तुला आठवण नसावी! तुझ्या अंगाखालच्या रेशमी चौपटीशिवाय नि अंगांतील निळया मखमली-शिवाय तुला कांहींच आधार नव्हता अजया!"

स्वामींना दम लागला होता. त्यांना स्वस्थ रहाण्याविषयीं सांगायचें अजयाच्या मनांत आलें; पण आतांपर्यंत वेळोवेळच्या स्वामींच्या रहस्यमय उद्गारांची उकल पूर्णतेस जाण्याची ही शेवटची वेळ आहे बहुधा, हें ओळखून तोच स्वतः स्वस्थ बसला.

"ती तुझी बालवृत्ति पाहून मला सात आठ दिवसांपूर्वीच वाचलेल्या एका गोष्टीची आठवण झाली. त्यांत जें स्वप्न पडलेलं मीं वाचलं तेंच सत्यस्थितींत घडत होतं आज! कोणीतरी बाईनं त्या पुरुषाला एक मुलगा

दिला अन् ती म्हणाली 'महाराज! याचा स्वीकार करावा! दैवानं हा तुम्हांला दिला, दैवच याच्या रहस्याची उकल करील! हा निष्पाप आहे अन् कांहीं दिवस तरी त्याची मातापितरं तुम्हांला भेटणं शक्य नाहीं. तोंपर्यंत तुम्हीच याचा सांभाळ करा. तेव्हांपासून मी तुला भाचा म्हणत असे, पण—

"त्याची हकीकत ही अशी आहे. या आश्रमांत मी येण्यापूर्वीपर्यंत विकासपूरच्या माझ्या मित्रानेंच तुला प्रतिपाल केला; देवामध्यें जो बटवा आहे तो तुझ्याजवळच पडला होता त्या वेळेस; मी तो उघडला. आंत एक कागद होता. त्यावर लिहिलं होतं—

'अजयाकरितां—एक सोन्याचा बदामी ताईत;
मखमलीचा निळा अंगरखा;
अन् एक रेशमी चौपटी—

या सर्वांचा खर्च—रोख दिले. मध्यें तो आंकडा घातला होता. त्या कागदाखालीं चार दिवसांपूर्वीचीच तारीख होती. त्याखालीं अस्पष्ट अक्षरांत सही होती. त्यांतील फक्त पटवर्धन हीं अक्षरेंच महत्प्रयासानें मला समजलीं. सर्व गोष्टी अन् वस्तु तुझ्याजवळच होत्या त्या कागदांतल्या; माझ्या आयुष्यांतील सौख्याचा ठेवा मला मिळाला!"

स्वामींनीं रहस्यकथन संपविलें.

त्याना एक खोकल्याची ढांस आली, त्यांनीं छातीवर हात दिला होता. आणि तशा स्थितींतही त्यांनीं देवघराकडे हात दाखविला.

बाहेर पावसाचा फटकारा चालू होता. अन् दूर एक टिटवी भेसूरपणें ओरडली पाण्याच्या सरसरींत. तो आवाज भीतीदायकच वाटला अजयाला!

स्वामींना हेंच पाहिजे आहे देवघरांतून असें आपल्या अंदाजानें समजून तेथील बटवा अजयानें आणला. त्यांतील ते दोन कपडे स्वामींनीं बाहेर काढण्यास त्याला खुणावलें. ते अजयानें बाहेर काढून स्वामींजवळ दिले. त्यावर आपलें मस्तक टेंकीत स्वामींनीं हात पुढें केला. हातांतील ताईत अजयानें त्यांच्या हातावर ठेवला.

"मी तर चाललोंच जया ! पण सुदैवानें तुझी आई भेटली तुला, तर तिच्या या अशांत भावाची आठवण दे ! आणि माझं तें कार्य ?—तेंऽऽतेंऽऽ" स्वामींनी हात दाखविला. त्यांचा आवाज खोल गेला होता. जणूं आकाशांतील, लांब लांब जाणाऱ्या अन् कमी कमी होत ऐकूं येणाऱ्या अशा गडगडाटाशीं त्यांची वाचा साम्य दर्शवीत होती. लांब दृष्टी टाकली स्वामींनीं एक अन् त्यांनीं डोळे मिटले.

थोड्या वेळानें त्यांनीं डोळे उघडले; ते किंचित् वटारल्यासारखे दिसत होते. नुसती डोळ्याची हालचाल ते करीत होते. बाहेरच्या पर्जन्यनिनादानें ती अधिकच कावरीबावरी दिसत होती.

"कांहीं काळजी करूं नका मामा ! आठ दिवसाच्या आत मी तें करीन अन् आई भेटली तर तुमची आठवणही अवश्य देईन;" अजय म्हणाला.

"आऽऽऽहा !" समाधानाचा उद्गार स्वामींनीं काढला; न् तोच त्यांच्या आयुष्यांतील शेवटचा सौख्योद्गार होता.

त्यांचा आत्मा परलोकांत संचार करूं लागला होता. वेळोवेळचे विद्युत् प्रकाश सर्व आकाश तडकल्या दर्पणाप्रमाणें भासवीत होते. पर्जन्यनिनाद मर्मभेदकपणें ओरडत होता. आपणही कांहीं कमी नाहीं त्या बाबतींत असें मेघराज दाखवीत होते. झाडाची फांदी मोडल्याचा काडकाड् आवाज झाला न् विद्युत्प्रकाशानें स्वामींचें मृतमस्तक एकदां प्रकाशमान् झालें.

त्यांच्या मृतशरीरावर आवरण घालीत अजय एखाद्या लहान मुलाप्रमाणें अश्रू ढाळीत होता. त्यांच्या वात्सल्यप्रेमाचा विजय होता तो ! त्यांच्या त्या वृद्ध अन् आदरणीय गतप्राण कायेकडे पहातांच, गतायुष्यांतील सर्वच मायेची पाखर आपल्या अंगावरून दूर झाल्याचें वाटलें, अजयाला !

अन् स्वामींविषयीं तरुणांना वाटणारा आदर ?

तो तर त्यांच्या प्रेतयात्रेला जमलेल्या सर्व युवकांत सांगत !

एका मनुष्याच्या मृत्यूनें हळहळणाऱ्या हृदयांचा एवढा मोठा समूह कांवच थोड्या प्रसंगीं जमला असेल, दुसऱ्या कोणत्याही ठिकाणीं ! अश्रूंचा सडा पडला होता त्या दहनभूमीवर !

मृत्यूनन्तर स्वामींच्या मुद्रेवर एक प्रकारचे तेज विलसत होतें. त्यांना त्या स्थितींत पाहून ते स्वस्थपणें झोपींच गेले होते, असा भास होत होता! त्यांचे दोन्ही हात नमस्कार केल्याप्रमाणे जोडलेले होते. त्यांच्या गोऱ्यापान विशाल कपाळावर एक दोन आठ्या पडल्या होत्या. जटा मस्तकावर रुळल्या होत्या न् दाढीचा भव्यपणा कोणालाही आदरानें भारावून टाकणारा असाच होता!

प्रेतयात्रेसाठीं त्यांना उचलण्यापूर्वी त्या सर्व निष्ठावंत तरुणांपैकीं एकेक-जण पुढ येई, आपलं मस्तक नमवी न् परत जाई; अशा तऱ्हेने आपला आदर व्यक्तवीत होता प्रत्येक जण!

त्या तरुणांच्या शिवाय अलोट जनसमर्द लोटला होता प्रेतयात्रेला! त्यांच्या मृतकायेचा अग्निसंस्कार आटोपून घरीं येताना, त्या पाच क्रान्ति-मंडळाच्या सभासद युवकांच्या मनात स्वामींचें एकच सुभाषित घोळत होतें. जणू तोच त्यांचा संदेश होता त्यांना—

"कृतिप्रवीणतेच्या मंदिरातच स्वातंत्र्यदेवीची पूजा केली पाहिजे. वाचाप्रवीणतच्या देव्हाऱ्यात नव्हे!"

अजय स्वामींची उत्तरक्रिया संपवून घरीं आला, तरी त्याचा विचार चालूंच होता. स्वामींवर त्याची भक्ति होती. तो नेहमीं म्हणत असे—

"मामा, सत्कार्याकरितां वा कर्तव्याकरितां मी जें कांहीं कष्ट करीन नि जें कांहीं श्रेय मिळवीन त्याची तुम्हीं तारीफ केलीत अन् मला त्याविषयीं शाबासकी दिलीत, म्हणजे मला बरं वाटतं! तुमचा प्रेमळ हात माझ्या पाठीवरून फिरला कीं सर्व कृत्याचं सार्थक झालस वाटत मला!" "हो ना! मग मृत्यूपूर्वी तुझ्या पाठीवरून त्यांनीं ममतेनें हात फिरविला नाहीं का?" त्याचे मन म्हणे; त्याला तो उत्तर देई, "फिरविला परन्तु तो त्यांच्या आशेच्या पूर्तीपूर्वीचा! जें कार्य माझ्या अंगावर त्यांनीं सोपविलं नि जें मी पूर्णतेस नेईनच त्यानन्तर मला हांक मारायला कोण आहे आतां? त्यांच्या निधनानें सर्व आकाश कोसळल्याचं वाटतं आहे मला. या उभ्या जगांत मला आतां कोणी नाहीं. त्या रहस्यस्फोटानं जी माता माझी आहे,

ती जिवंत आहे की मृत आहे हें मला कळण्यालाही मार्ग नाहीं! या आश्रमांत आलं कीं सौख्योद्यानांत आल्यासारखं वाटे मला; पण आतां तें स्मशानवत् भासत आहे. जीवाचा विरंगुळा म्हणून नाहीं म्हणायला शकुन्तलाच काय ती एकटी राहिली आहे आतां!"

दुसरे दिवशी अजय शकुन्तलेकडे गेला, तेव्हां तात्यासाहेब आरामखुर्चीत वर्तमानपत्र वाचीत बसले होते. त्यांच्या हातांतील जळत्या सिगरेटची धूम्रवलयें हवेत तरंगत होतीं.

मामांच्या मृत्यूनं अजयाच्या मुद्रेवर अल्पशी उदासीनता दिसत होती. परन्तु नेहमींच्या खेळीमेळीच्या त्याच्या स्वभावात त्यामुळें बदल झाला नव्हता!

"बराच त्रास झालेला दिसतो आहे, जय तुम्हाला!" हातातील वृत्तपत्र बाजूला सारून तात्यासाहेब म्हणाले. "साहजीकच आहे! चांगली विश्रांति घ्या आठ एक दिवस!" हातांतील सरत आलेली सिगरेट् बाहेर फेंकली त्यांनीं अन् ते बाहेर जाण्यास उठले.

ते गेल्यावर, माणसांनीं गजबजलेल्या जागेंत खेळणाऱ्या लहान मुलास, सर्वजण उठून गेल्यावर मोकळेपणा मिळाल्याचा जो आनंद होतो तसलाच मोकळेपणा वाटला अजयाला! शकुन्तलेनं आणलेला कॉफीचा कप तो हातांत घेत असतांच, अजयाकडे "हा पाह्यलाच् का ? ज्यू दादा? माज्या नवा पोच्याख ?" असें म्हणत शकुंतलेचा धाकटा भाऊ प्रभा धांवतच आला. अन् हातांतील काठीनें त्यानें अजयाच्या हाताला धक्काही दिला.

शिताफीनें कप खालीं ठेविला नसता तर त्या बालवीरानें तो पाडलाही असता! अशा रीतीनें तो खालीं ठेवण्यांत कप् अन् तोंड यांत बरीच अडचण असते, तें अजयाला चांगलेंच पटलें! त्याला दोन्ही हातांनीं जवळ घेत अजयानें म्हटलें—"अरे! हो! हो! जरा हळुं!"

"हें बघ!" प्रभानें आपली गाडी सुरू केली. "मला एक लेजीम नि लाथी आनायच्ये! तात्या म्हनाले आहेत तच्यं!"

"अच्छं ?" त्यांचें तोंड वर करीत अजयानें विचारिलें.

" चलच् ! पहाऽऽ ! ताईला विचारू ! " असें म्हणून तो शकुन्तलेजवळ धांवत गेला अन् त्यानें विचारलें, " हो ना ग, ताई ? " अन् तिचा होकार मिळवून परत अजयाकडे आला, तो नि म्हणाला—

" आतां व्यायामशाळेंत नेनाल् ना तूं मला ?

" हो ! हो ! " असें म्हणत बशी कॉफीसहित त्याच्या तोंडाला लाविली अजयानें; नाहीं तर त्या बालराजानीं, कल्पनेचे किती किल्ले घेतले असते कोणास माहीत !

" किती त्रास झाला आहे तुम्हाला ? " कॉफीपान् संपताच शकुन्तलेनें अजयास विचारलें.

" असंं ! तुझं तोंडही तेंच सागत आहे ! "

" पुरे बरं ! जेव्हा तेव्हा माझ्या तोंडाकडे लक्ष असण चागलं नाहीं ! " तिनें आपल्या हातांत तोंड लपविलें; ती उठली अन् आंत गेली.

ती परत आली तेव्हा तिच्या हातात सोन्याच्या नव्या बांगड्या होत्या.

" या पाहिल्यात का ? नव्या आणल्या आहेत ! " ती म्हणाली.

" किती आनंद झाला आहे तुला ? तुम्ही स्त्रिया किती जरी शिकलांत तरी तुमची नटण्याची हौस काहीं संपायची नाहीं. त्याबरोबर मुरडण्याचीही ! आमच्या आप्पाचे वडिल आहेत ना ? ते एकदा म्हणाले होते—"

" काय ? "

" की हल्लींचा काळ असा आहे ! चरख्याशिवाय देशभक्त नाहीं अन् मुरक्यावांचून तरुण स्त्री नाहीं; मग ती कितीही सुशिक्षित असो. "

" अजय ! देवदयेनं मिळत आहे म्हणून घालते हें मी. "

" मी मात्र असा श्रीमंत नाहीं हं ! "

" नसलांत तरी त्यात मला वाईट वाटायचं काय कारण आहे ? अजय विवाह मतानं जुळत असतात, संपत्तीनं नव्हे. "

" माझं मतही असंच आहे. तुझ्या गुणाबरोबरच संपत्तीच्या सौंदर्यापेक्षा, तुझ्या सौंदर्यसंपत्तीचंच अधिक कौतुक करीन मी ! "

" चला;" शकुन्तलेनें दुसरीकडे पाहिलें.

" अन् अजय ? " तिनेंच पुनश्च म्हटलें.

" अं ! "

" हे पहा ! आतां तुमचा कार्यक्रम तुम्हींच ठरवायचा आहे यापुढें ! "

" हं ! होईल तें खरं ! आयुष्य हा भवितव्यतेच्या गोफणींतील दगड आहे ! जिथें पडेल तिथें पडेल ! "

" मला सांगितल्याशिवाय कांहीं करायचं नाहीं हं ! "

" चांगलीच अट आहे ! " अजयानें हंसत उत्तर दिलें. अन् असें म्हणून तो घरीं जाण्यास निघाला तो किंचित् द्विधा मनःस्थितींतच !

शकुन्तलेच्या या निस्सीम प्रेमाची गोड उर्मी, आपल्या कार्यांत हिला अशीच सोडावी लागेल, या विचारानें कमी सुखची वाटली त्याला ! त्या शुद्ध व सात्विक सौख्याची आतांच विटंबना होऊ नये म्हणून क्रांति-मंडळाच कांहीं एक वर्तमान तिला त्यानें कळविलें नाहीं. ध्येयप्रीतीच्या असामान्य लालसेनें भारावलेले वीर वैयक्तिक प्रीतीच्या कुंपणांत कोंडून कधींच राहूं शकत नाहींत. कार्यव्याप्तीच्या खुल्या मैदानांत दोन हात करण्यासही ते सज्ज होतात. त्यांतच त्याची मर्दुमकी असते. थोरपणाची कसोटी असते ! त्यागाचें वैभव असतें. " अशाच तऱ्हेच्या शकुन्तले-विषयींच्या प्रेमविषयक निर्णायक विचारात तो घरीं पोंचला.

तेव्हां त्याला ग्लीसनच्या हल्ल्यात आणखी एक संकट आलेलें कळलें. तें कोणतें ?

प्रकरण १५ वें

# वियोगनिःश्वास

विजयाच्या अपघातानंतर पंधरा एक दिवसपर्यंत तो रुग्णालयामध्येंच होता. उठून बसण्याच्या स्थितींतही तो नव्हता. त्यामुळें आपल्या म्हणण्या-प्रमाणें इतक्या दिवस तो शोभनेला कांहींच कळवूं शकला नाहीं. अज्ञानाच्या अंधःकारांत त्यामुळे शोभना वावरत होती. संशयाच्या पिशाच्चाचें बुजगावणें रामभाऊंचें सांगणे दाखवीत होतें. नाना आणि सुधीर यांच्या ताटातुटीमुळें तो भीषण अंधार अधिकच भयाण वाटला तिला. या सर्व स्थितींत आशेचा एकच किरण होता तिला; नि तो म्हणजे विजयाची त्वरित भेट. पण त्यांतही निराशाच पदरीं पडली तिच्या! कारण नानांच्या नाहींसें होण्याचें दुःख ती करीत होती. त्याचे दुसरेच दिवशीं काका कलकत्त्यास रवाना झाले, त्यामुळें शोभनेनेंही पुणें सोडलें. त्याच स्थितींत परत कॉलेजांत लागलीच जाणें तिला शक्य नव्हतें!

इकडे गेले पंधरा दिवसांतील रुग्णालयांतील कांहीं प्रसंग आतां तें सोडल्यावरही विजयाला आठवत होते!

"कोण? वहिनी? तुम्ही इकडे कुठें? हं हं! हॉस्पिटलमध्यें आहे ना मी?" शुद्धीवर येतांच विजयानें विचारलें. "राई सुरक्षित आहे ना?" असें म्हणून राईकडे त्यानें पाहिलें. तेव्हां ती म्हणाली—

"तुला किती त्रास पडला?"

तिच्या या उद्गारावर तो म्हणाला—"तें जाऊं दे! तूं वाचलीस ना?"

"फार बोलूं नका भाऊजी! त्रास होईल! वहिनी मग मध्येंच म्हणाल्या. डॉक्टरांचं सांगणं आहे तसं!" वहिनींनीं त्याच्या कपाळावरची कोलन-

वॉटरची घडी सारखी केली नि म्हटलें—"काय प्रसंग आणला होतात! पुण्याहून परस्पर इकडे आलांत, मला भेटतां की नाहीं हीच भ्रान्त होती. पण ईश्वर आपला नि तुम्ही वांचला!"

बऱ्याच घाबरलां होतां तुम्ही अस दिसतं आहे! किती नवस केलेत?"

"पुरं झालं," कुशीवर वळणाऱ्या विजयास मदत करीत त्या म्हणाल्या. "जेव्हां तेव्हां देवाची अशी टर उडवणं चांगलं नाहीं! स्त्रियांचं हृदय काय कळतंय तुम्हांला? जेवण जात नव्हत मला चार दिवस!"

बाजूच्या खुर्चीवर बसलेल्या वहिनींचा हात आपल्या हातानें हाताळत विजयानें क्षमा मागितली, "तुम्हांला दुखवण्याचा माझा हेतु नव्हता वहिनी!"

"अह! मीं कुठं म्हटलं तस? आतां बर वाटतंय ना?"

"हो, मुसंब द्या; म्हणजे आणखी बर वाटेल!"

वहिनींनी मुसुंबें सोलायला सुरवात केली. तेव्हा रमाकांत म्हणाला—

पांघरूण द्या बुवा! थंडी वाजते मला."

"पडलीच आहे! पाऊस कमी झालाय आतांशा थोडा!"

"थंडीचे दिवस आले म्हणजे रोज रात्रीं निजतांना इनामगावची आठवण होते मला; ती शेकोटी सकाळची! माजघरांतला जेवणाचा थाट! अन् तुम्हांला आठवतं ना! मुगाची खिचडी नि नारळाच खोबरं किती आवडत असे मला तें?" अन् यावर मुसंब्याची एक फोड त्यानें तोंडांत टाकली.

पुण्याच्या पुरंदऱ्यांच्या पत्त्यावरील पत्राचें उत्तर आलें नाहीं म्हणून एका मित्राला दुसरें पत्र टाकलें विजयाने! त्याचें उत्तर वाचता वाचता आतां वरील स्मरणचित्रें त्याला आटवत होती. जें उत्तर आले होते तेंही मग त्यानें वाचलें—"...काका तूं गेल्यावर चारच दिवसानीं कलकत्त्याला गेले. त्यांनीं जागा सोडली एवढीच माहिती मिळते आहे; शोभना कॉलेजांतही येत नाहीं हल्लीं!......"

नेरळला पत्र टाकून पाहिलें विजयानें मग! पण त्याचाही उपयोग झाला नव्हता कांहीं!

" आपल्या या येण्यानं असा एखादा प्रसंग घडला काय ? तो विचार करू लागला.

" की, रामभाऊंनीं कांहीं भरवलं तिच्या मनांत ?

" पण छे ! तुमच्या भुमकेच्या उठावणीनें शोभना कधींच असं करणार नाहीं. " त्याचें मन सांगत होतें त्याला.

पुढे आणखी एक आठवडा गेला, तरीही शोभनेची भेट न घडल्यामुळें त्याच्या मनांत खिन्नता पसरली होती. नदीच्या कांठावर पुरामुळें पाणी चढावें न् कृत्रिम ओलावा यावा त्याप्रमाणेच स्मृतिसिंचनानें तो थोडा आनंदांत रममाण होई; पण तो क्षणिकच ! दिव्याची ज्योत तेल नसलें तर किती वेळ प्रकाश देणार ? विजय पुष्कळदा समाधान पावण्याचा यत्न करी; परन्तु त्याची मनःस्थिति असमाधानीच राही परत !

अजूनही एकाद् महिना दुखापतीवरील पट्टी प्रत्यहीं बांधण्यासाठीं तिथेंच रहाण भाग होतें त्याला. त्यामुळें त्या दिवसांत त्याच्या मनाला एकच आशा होती कीं पुण्यास परत गेल्यावर आपण वाटेल ते करू, परन्तु शोभनेचा पत्ता काढूंच काढू ! त्यामुळें त्याची अगदींच निराशा नव्हती झाली.

विजयाची ह्या काळांतील अबोल वागणूक रमाकान्त नि वहिनी यांच्या हष्टींत पुष्कळच भरली. रमाकांताच्याही नोकरी सपण्याला जवळजवळ विजयाचा मुंबईला निवास होता तितकाच अवकाश होता. आठच दिवसांनीं नन्तर दादा आला होता त्याचीही तीच स्थिती झाली होती. विजयाचा विनोद फार लुप्त झाला होता अन् चिंता पसरलेली होती त्याच्या बोलण्यांत !

आज सायकाळीं विजय एकटाच समुद्रावर फिरायला गेला.

त्यानें समुद्राकडे पाहिलें !—भरतीची वेळ होती. लाटा आपटत होत्या किनाऱ्यावर; पांढऱ्या फेसाळ पाण्याची हूल उठे लाटेच्या मागोमाग ! जणू कांहीं तें त्याचें विकट हास्यच होतें ! पाणी वाळूवर पसरे नि परत खालीं उतरे ! आदल्याच दिवशीं वाळूचा किल्ला करून ठेवला होता कोणीतरीं; तोही त्या लाटांत विरून गेला. थोड्या वेळानें तेथें त्याचं ठिकाणीं दोन लहान मुलें घेऊन एक गृहस्थ आला. त्यांचें संभाषण चाललें होतें !

"कालचा किल्ला रे आपला !"

"भरतीच्या पाण्यांत गळा मोडून !"

"परत नवा करूं हं आपण !" तो गृहस्थ म्हणाला.

"आपल्या मागेही एखाद्या घटनेच्या जोरानें असाच आपल्या प्रेमाचा प्रासाद उडवून दिला नसेल ना? हरकत नाहीं. परत उभा करू आपण तो." विजय म्हणाला. त्यानें समुद्राकडे पाहिलें. संध्येच्या रक्तिमेत सर्वत्र लालच पाणी आहे कीं काय असा भास झाला त्याला. त्या जलपृष्ठावरील चकचकीत बारीक वर्तुळें पाहिलीं त्यानें. रुप्याच्या नाण्यांनीं कोणी हा आच्छादिला नाहीं ना? कीं, एखादा त्याच ठिपक्याचा शालू अंथरला आहे? छे! छे! लहान लहान चांदीच्या भांड्यांची उघडीं तोंडेंच असतील तीं! पाण्यांत बुडालेले असतील त्यांचे इतर भाग! अंहं! कोणींही आंत येऊं नये म्हणून जलदेवतांनीं रौप्यजाल टाकलें असेल, हे आपल्या डोक्यावरील बाजूला; अशा कितीतरी कल्पना सुचल्या असत्या एखाद्या कवीला ती चकचकीत वर्तुळें पाहून, असें वाटलें विजयाला. रक्तबिंबाप्रमाणें क्षितिजावर सूर्य दिसत होता! प्रक्षोभजनक राजकीय आंदोलनाप्रमाणें, उचंबळून येत होता उदधी! तिकडे तो पहात राहिला! समृद्ध सागराच्या गंभीरतलावरील रत्नभांडार मग त्याच्यापुढें उभें राहिलें. त्याच्या अस्तित्वाचें एकही चिन्ह वर दिसत नव्हतें. 'त्याप्रमाणेंच या वियोगपृष्ठाखालीं आपल्या पुनर्भेटीचें अस्तित्व अज्ञान नसेल ना?' आपल्या दुःखाविषयीं त्याला वाटलें.

जलाशयाचें तें बहुविध स्वरूपही त्याला आवडले नाहीं; त्याच्याकडे पाहून, तो आपली हंसून थट्टाच करतो आहे असें त्याला वाटलें. वाऱ्यानें ताठ भरल्यामुळें फडफडणाऱ्या लांबवर एका जहाजाच्या शिडांतही त्याला गम्य वाटलें नाहीं. जलकण एखाद दोन त्याच्या अंगाला चाटून जात तेही आपल्याला घाबरविण्याकरिताच, असें त्याच्या मनानें घेतलें. रस्त्यावरील रहदारींतील सर्वजण आपापले मार्ग आक्रमित होते. "माझ्या दुःखाची यांना कांहींच जाणीव नाहीं, ना!" आक्रंदित चित्तानें त्यानें विचार केला. तिकडून दृष्टि काढून त्यानें उजव्या हाताला पाहिलें. मलबार-

हिल्ची दाट झाडी होती. गव्हर्नमेंटहाउसचा एक उच लाल दीप त्याला दिसला. शेव्हरोलेट कंपनीच्या विद्युत् जाहिरातीची लकाकी त्याला कळली; न् जेव्हां त्याने दुसरीकड दृष्टी वळवली तेव्हां, रस्त्यावर विद्युतदीपाची लांबच लांब वळत गेलेली ओळ त्याला दिसली. विद्युत्रवीच्या ठिणग्याच होत्या जशा काहीं त्या !

रस्त्यावर भराभर मोटारी जात होत्या.

पोंगे वाजत होते, घर्घर् होत होती, काळ्याभोर डांबरी रस्त्यावर प्रकाशाचे किरण पडत होते.

एका फट्फटी मोटारचा आवाज सुरू झाला. तो जवळ जवळ आला. अन् एकदम मोटारसायकल थांबल्याचाही आवाज झाला. पुढील मोटारी पोलिसाच्या हातामुळें थांबल्यामुळे समोरच एक फट्फटी थांबली होती तीं विजयाला दिसली. गतीमध्यें असताना अकस्मात थांबल्यानें त्या फटफटीच्या मागील बैठकीवरील ती तरुण मुलगी, पुढील तरुणाच्या अंगावर लोटली गेली-तिचे बॉब् केलेले झुपकेदार केस उडाले. विचित्र आवाजात ती मजले हास-ल्याप्रमाणे हसली. अन् पुन्हां सर्व काहीं स्थिरस्थावर झालें.

विजयाला त्या दोघांच्या सौख्याचा हेवा वाटला !

मनुष्याच्या मनाची अशी वृत्तीच असते कीं, आपण दुःखात सापडलों असता आपणांस तसाच एखादा दुसरा मनुष्य आनंदात दिसला तर त्याचा हेवा वाटावा. मात्र असे वाटण्यात त्या दुसऱ्या मनुष्याचा आनंद नाहींसा व्हावा यापेक्षा आपला आनंद परत मिळावा, हीच इच्छा अधिक असते मनुष्याच्या मनात, हेंही तितकेंच खरें !

विजय घरीं जाण्यास उठला ! त्याचे पाय त्याला घरीं नेत होते इतकेंच; मन मात्र शक्य तितकें घरापासून सुदूर, शोभनेच्या शोधाच्या विवंचनेंत हिंडत होतें. अशा विचारग्रस्त स्थितींत चौपाटीवर जाण्याचा पूल तो ओलांडीत असतां एका पाटीवाल्या बाईस त्याचा धक्का लागला न् तिने थोडेसे दरडावून, त्याबद्दल नापसंती दर्शविली हेंही त्याच्या लक्षांत आलें नाहीं.

गिरगांवांत रमाकांताच्या बिऱ्हाडीं केव्हां आला हेंही त्याला समजलें

नसतें; परन्तु गिरगांव नाक्यावरच त्याच्यावर एक दगावण्याचा प्रसंग गुदरला होता; पण तो टळला त्यामुळे तें त्याला कळूं शकलें !

भरधाव मोटार येत होती. परन्तु तें न जुमानतां विजय तसाच नाकें ओलांडूं लागला. मोटार जवळ आली. तिच्या गतिरोधकांचा आवाज झाला अन् ती थांबली; विजय पुढें गेला. एक शेलकी शिवी हासडली गाडीहाक्यानें, अन् तो उद्गारला, " आणि ह्य इस्टूडट ! "

लांबवर एक आवाज उमटावा, तसा तो ऐकूं आला उद्गार विजयाला; घरीं आला तेव्हांही विजय याच तंद्रित होता !

असेच कितीतरी कंटाळवाणे दिवस मुंबई सोडीपर्यंत त्यानें घालविले.

इनामगावला धाडलेलें पत्रच परत आल्यामुळें ( दादा मुंबईला गेल्यावर ते शोभनेनें धाडलें होतें. पुष्कळ वाट पाहिली तिनें; ) शोभनेचें मनही सुस्थितीपासून दूर असेच होतें.

झाडाला पालवी फुटूं लागावी, पण त्याच वेळेला, वणव्यानें ते नष्ट व्हावें, तशी तिच्या प्रीतीच्या अंकुरोद्गमाची गत झाली होती. दुर्दैवी घटनांच्या सागरांत वाचविणारा अशा विश्वासानें विजयाकडे पहातां पहातां चुकामुकीच्या अज्ञात मत्स्यानें त्यालाच परत पाण्यांत ओढावें तशी त्या कौटुंबिक आपत्तींत विजयाची अनुपस्थिति वाटली तिला ! ज्वालाग्रही घरांतून एखादा वीर आपणास बाहेर काढील म्हणून ज्या दोरखंडावर तो वर येत असेल तिकडे मोठ्या आशेनें पहावें; पण एकाद्या आगीच्या झोतानें तो दोरच तुटावा; रानांरानातून बेसुमारपणें धावताना क्रूर श्वापदांच्या तडाक्यांत सांपडलें असता, एकादा शिकारी आपणास साहाय्य करील असें मानावें अन् तेवढ्यांत त्याच्यावरच मागाहून एका श्वापदानें झडप घालावी अन् तो नाहींसा व्हावा; तसा विजयाचा वियोग वाटला तिला. मात्र विजयाच्या प्रवासाला आचविण्यास भाग पडणारी अशी काय घटना आहे तें तिला कळलें नव्हतें !

शोभनेला वाटे—" विजय किती दुष्ट आहेत; बरं झालं मी त्यांना जोडीदार निवडलं नाहीं; या खडतर आपत्तींत धीर द्यावयाला मला कुणींच नाहीं !

या जीवनाच्या वावटळींतून हांक मारायला मला कुणीच नाहीं; या झंझावा-तांत मला आधार देऊन भूतलावरून उडूं न देण्याला मला कोणीच नाहीं. माझ्या प्रेमगंगेचा मार्ग चुकला का? माझी मनानें ठरविलेली कसोटी असत्य आहे का? जीवनयज्ञांत, माझी प्रीतीची आराधना स्वीकारण्यास विजय नालायक आहेत! प्रीतिचे रंग मोहक असले तरी ते नेहमीं खरेच असतात असं नाहीं! विजयांनीं दाखविलेलं प्रेम अगदीं फुलाच्या रंगाचं होतं. तुडुंब भरलेल्या अमृताच्या संचयांत म्हणून उडी घ्यावी अन् ती एकाद्या जलाश-यांतच पडावी अन् गुदमरण्याचा प्रसंग यावा तसंच नाहीं का हें? प्रेमसा-फल्याच्या ब्रह्मानंदनगरींत एकाद्या विजयी शूरकन्येप्रमाणें प्रवेश केल्याचा विजय मी मानीत होतें; पण आंत शिरतें तों काय? सर्व नगरी उध्वस्त दिसली! उदासीनता, विषण्णता, निराशा, सगळीकडून उभ्या राहिल्या आहेत! माझ्या सौंदर्यावरचच काय ते त्यांच प्रेम आहे त्याचं दुसरं काय?"

परत तीच विचार करी—"तुझं सौंदर्य? अन् त्याचा पराक्रम! आपल्या व्यक्तिमत्वानं स्वतःविषयी अहंकार वाहण्याचा अहंमन्य युवतींना लीलेनं झुलवाव असा त्याचा अधिकार आहे! त्याचं कर्तृत्व आहे! त्याचा पराक्रम आहे! समजलीस? यज्ञात प्रीति स्वीकारण्यास विजय नालायक आहे असं तूं समजतेस! पण कित्येकवेळां असले यज्ञ दैवी दुर्विलाच्या राक्षसांनींही उध्वस्त होतात हें विसरूं नको; झंझावातांत तो तुला हांक मारीत आहे; पण परिस्थितीच्या विपरीततेचा वारा तुला तें ऐकूं देत नाहीं, त्याला तो काय करणार? तो नुमती हांकच मारीत आहे असं नव्हे; तर मनानेंही तुझ्याच ध्यासांत तो निमग्न आहे. तूं जलाशयांत पडल्यानें गुदमरली आहेस असं म्हणतेस; परन्तु स्वर्गीय आनंदाच्या अतिरेकानेंही मनुष्य गुदमरतो अशा भविष्यकालाचें तें सूचक आहे हें माहीत आहे का तुला? कशाचे जोरावर आरोप करीत आहेस तूं हे? काय पुरावा आहे तुझ्याजवळ! बोल बोल!"

यावर ती म्हणे—

"खरेच स्तोत्र हे शब्द! मला तरी त्यांतच आनंद नाहीं कां?"

प्रकरण १६ वें

## मर्मस्थानें

सरकारी पत्रकांत "रजा, बदल्या नि नेमणुका" या सदरांत विकासपूरचे डिस्ट्रिक्ट जज्ज् मि. ग्लीसन् यांना दीड महिना सुटी मिळाल्याचें वाचल्यापासून अजयाला धक्काच बसला. "रजाच आहे, तरी पण, निवृत्तीपूर्वीचीच ती न टरो म्हणजे मिळविली," असें त्याला वाटलें. नन्तर त्याला समाधानही लाभलें वरील गोष्टींत; कारण ती सुटी ग्लीसन् ह्यांनीं हिंदुस्थानातच घालवयाची होती.

विकासपूरच्या मध्यभागीं लाबच लाब असा जो रुंद रस्ता होता, त्याच्या दोन्हीं बाजूंस धक्क्याप्रमाणें दाट झाडी, उभी होती. या रस्त्याला साधारण मध्यावर एक मार्ग उजवें बाजूस फुटे! त्याच वाटेनें सुमारें दोन तीन फर्लांग गेल्यावर विकासपूरच्या कोर्टकचेऱ्यांच्या इमारती लागत! दुपारीं या बाजूला जे विचित्र चेहरे दिसत ते पाहून चांगलीच करमणूक झाली असती एकाद्याची; आपलीं अगडबंब पागोटीं नि अनावर पोटें सांवरीत जाणारे शेट लोक, अखूड काचा मारलेले न् गंध लावलेले चिकू मारवाडी, त्यांच्या सपाट्यांत सापडलेले गरीब कर्जबाजार कुणबी, भांडखोर पक्षकार, त्यांच्यासह त्या त्या दिवशीं कोर्टाचे प्रश्न नि त्यांची उत्तरें इत्यादींची चर्चा करणारे वकील, यांनीं तो रस्ता बहुधा वाहता असे. स्वतःला मोकळीक असली म्हणजे कांहीं रिकामटेकडी मंडळीही कोर्टातील खटले ऐकण्यास जात असत त्या वाटेनें कधीं कधीं! ह्याच रस्त्यावरून कोर्टकचेऱ्यांच्या इमारतींचा चौक उजव्या हातास टाकून पुढें सुमारें दीड दोन मैलांवर "डोंगरी" नांवाची सरकारी अधिकाऱ्यांच्या निवासस्थानांच्या बंगल्याची वसाहत होती. त्या बाजूलाच रस्त्याचे उजव्या कडेनें तिरप्या दिशेत रेल्वेचा मार्ग जात

होता. या रेल्वेलाईनचे बाजूला भयंकर झाडी होती. इतक्या दाट जंगलाची ही जागा म्हणजे विजयाच्या कटातील पहिलें मर्मस्थान होतें. त्या डोंगरी वसाहतीच्या बाजूला जाणारा रस्ता हें त्याचें दुसरें मोक्याचें ठिकाण होतें अन् त्याच बाजूला जें एक प्रसिद्ध इराण्याचें उपाहारगृह होतें, त्याच्याच जरा आधीं, डोंगरीच्या बाजूला एक नाकें होतें त्या ठिकाणीं तर हल्ल्याचें मुख्य प्रारंभसूत्र होतें. रात्रीचे वेळीं डोंगरीकडून येणारी मोटार त्या नाक्याच्या अलिकडे थांबावी अशी एक व्यवस्था अजयानें केली होती. ती ज्या ठिकाणी थांबेल असा त्याचा अंदाज होता तेथून ग्लीसन् यांचेवर गोळी झाडायची नि रेल्वेलाईनच्या दाट झाडीचा आश्रय घेऊन पळून जायचें, असा एकंदर प्रकार होता त्याच्या या कटाचा.

विक्रमपूरला वरील मुदग नगरींत अश्राव्य दडपशाहीचे प्रकार आचरून राहिलेले डि. जज्ज् ग्लीसन् ' डोंगरी ' कडे रहात असत. तीस वर्षांपूर्वी त्यांची नेमणूक क्रान्तीची चळवळ दडपण्याकरितां मुद्दामच झाली होती. परन्तु जसजशी त्यांनीं ती नेस्तनाबूद करण्याचा प्रयत्न चालविले, तसतसे क्रान्तिकारकांचेही विदेशीयांवरील अत्याचार अधिकच बळावले. चेंडू जितक्या जास्त जोरानें दाबावा तेवढ्याच उशीनें तो उंच उडतो ना? वरील अधिकाऱ्याच्या भयजनक निर्णयाच्या दडपणानें स्वातंत्र्याची प्राप्ति अल्प-कालांत गाठूं इच्छिणारे तरुण थोडेच शमणार होत? उलट दूर सारून वाफ बाहेर जाण्याचा प्रयत्न करते तसेंच दडपण होतें तें त्यांना; त्या काळांतील ती चळवळ मेल्यानंतरही पुढें आतां अजयासारखा तरुण तसलें कृत्य करायला तयार झाला होता, हा त्याचाच पुरावा नाहीं का? त्या चळवळीला विरोध म्हणजे स्वातंत्र्याकरितां वाटेल तो स्वार्थत्याग, जीवाचा यज्ञ, धैर्याचा कोट, शौर्याची सीमा करणाऱ्या, एका रक्तानें नि एका वृत्तीनें निगडीत झालेल्या देशबांधवांच्या प्रयत्नांचा तटाला टकरा देण्यासारखेंच नव्हतें कां? एखादे ठिकाणीं एतद्देशीय बंधूला शासन होतांच त्याच्या प्रतिक्रियेचे निनाद सर्व देशभर उठत! आसेतुहिमाचल ऐक्याची, प्रेमाची, देशभक्तीची लाट उसळली होती हिंदुस्थानभर; कांहीं कारणानें

त्यांत अपयश आलें, तरी जेव्हां स्वतंत्र हिंदुस्थानांत या देशाच्या स्वातं-त्र्याचा इतिहास लिहिण्यांत येईल, त्या वेळेस तीस एक वर्षांपूर्वींच्या या आंदोलनाला मानाचें स्थान मिळेल यांत शंका नाहीं !

दीड महिन्याची ग्लीसन् यांची सुटी संपली !

जज ग्लीसन् यांची सुटी संपल्यानें ते परत कामावर आले होते !

ग्लीसन्च्या हल्याची देखरेख करण्यास नियमितपणें रहायला मिळावें म्हणून ‘Central’ हॉटेलमध्यें गेले पधरा दिवस रोज रात्रीं येण्याचा परिपाठ ठेवला होता जयानें. आज एक स्पेशल दूध नि पाव मागवून त्यानें पावाला लोणी लावण्याला सुरवात केली अन् तसें करतांना समोरच्याच टेबलावरील एका गोऱ्या सार्जंटकडे त्याने पाहिलें. ‘सेंट्रल हॉटेल’ त्या वसाहतीच्या जवळ असल्यामुळें नि युरोपिअनाची जी थोडीबहुत वस्ती होती विलासपूरला, तीही त्याच बाजूला जवळच असल्यामुळें पुष्कळ गोरे साहेब वरील हॉटेलला आश्रय देत असत !

“How Patodhan!” आपल्या सफाईदार भाषेत त्याच्या नांवाचा अशा तऱ्हेचा उच्चार करीत तो सार्जंट म्हणाला. त्या दिवशीं डी एस्. पी. कडे आपल्या वर्गाच्या नेहमींच्या संचलनाची अनुज्ञा काढण्याबाबत जय गेला होता, त्या वेळेस याच साहेबानें आपुलकीने त्याला अगत्य दाखविलें होतें हे त्याला आठवलें. त्यानें तशी आस्था का दाखवावी, हें अजयाला कळेना ! परन्तु त्याची तसली वागणूक पाहून अजयानेंही त्याला लागेल असें तिरस्कारयुक्त संभाषण केले नाहीं.

“Your parade a success ?” अजयाच्या पुढील काचेमधून एक बिस्कीट तोंडात टाकीत फ्रेडनें विचारले, तो फ्रेड होता हे वाचकांच्या लक्षांत आले असेलच ! अजयालाच विजय समजून त्यानें आपलें वर्तन असे केलें होतें त्याच्याशीं ! बरें, येथें येऊन विजय परेड कशाकरिता काढतो इत्यादी चौकशीही त्यानें केली नव्हती, त्यामुळेंही त्याला विजयाच्या नास्तिक्याबद्दल काहींच सूचना कळली नाहीं अजयाच्या बोलण्यांत ! फक्त मिरवणुकीवर जो नवीन निर्बंध विकासपुरात घालण्यात आला होता,

तो अजयाचे बाबतींत (विजयाचे बाबतींत असें फ्रेड समजत होता!) काढला जावा या एकाच उद्देशानें डी. एस्. पी. कडून फ्रेडनें ती परवानगी मिळविली होती.

"A nice one! Thanks to you!" (वा! अगदीं छान! आभार आहेत आपले) अजयानें त्याचे आभार मानले.

"Don't mention that! It's friendship, you must thank!" ("छे! छे! मित्राच कामच आहे तें!") असें म्हणून फ्रेड दुसरीकडे लागलीच वळला, हातातील छडी खालीं जमिनीकडे धरीत न् मधून हलवीत जाता जाता त्यानें कारण सांगितलें, "Well, I must hasten; I am busy with my boss!" अजय मात्र त्या वेळेस म्हणत होता:– "याच्याविषयींही काळजी घेतली पाहिजे. A Revolutionary should believe none from outside." (क्रांतिकारकानें बाहेरच्या कोणावरही विश्वास ठेवूं नये!) फ्रेडच्या (अजयाला त्याचें नांवही माहित नव्हतें) त्या असंबद्ध (असें अजय समजत होता) सलगीनें विस्मयित होऊन, अजय त्या दिवशीं जो 'सेंट्रल' हॉटेलच्या बाहेर पडला, तो आपल्या कटाविषयीं अधिक गुप्तता नि दक्षता राखण्याच्या हेतूनेंच! "सी. आय. डी. चा मनुष्य नसेल ना हा?" त्याला वाटले "काय जत आहे! पण म्हणावं असा का मी पत्ता लागू देईन?"

"फ्रेड कधीं पूर्वी भेटला होता का?" याचा अजयानें बराच विचार केला. पण त्याला नकारात्मक निर्णय मिळाला. "मग इतकी जानपछान करून घेण्यासारखें त्यानें आपल्याला कोठें पाहिलें होतें? पाहूं शकला असेल काय?" त्यानें विचार केला. पण त्याचाही अनिर्णयात्मक विचार केला त्यानें.

याचे दुसरे दिवशीं, त्या हॉटेलमध्यें न जाता परन्तु तिकडे येणारा जाणारा प्रत्येक मनुष्य, निदान फ्रेड् तरी, निश्चित ओळखतां येईल, अशा जागीं जवळच लपून बसला. त्या दिवशीं फ्रेड् काहीं आला नाहीं. त्याचे दुसरे दिवशीं तो त्याला दिसला. अन् मग चारपाच दिवसपर्यंत पाळत ठेवूनही फ्रेड परत दिसला नाहीं त्याला.

हल्ल्याला आतां आठवडाच उरला होता. तेवढ्या अवधींत जेव्हां फ्रेड पुन्हां भेटला नाहीं, तेव्हां त्या साहेबानें कोणत्या तरी गैरसमजुतीनें

आपल्याशीं तशी सलगी दाखवली असें समजून अजय स्वस्थ बसला. सर्व सिद्धता झाल्यावर त्याच्या मनांत विचार आला, "आपलं हें करणं बरोबर नाहीं !"

"कां ? काय चुकीचं आहे यांत" तोच स्वतः पुन्हां प्रश्न करी यावर."

"ग्लीसन् याच्या पश्चात् त्यांच्या पत्नीला त्रास होईल !" पहिला विचार म्हणे !

"मी ग्लीसन्ना मारणार आहे ! त्यांच्या मृत्यूमुळें काय अनर्थ होतील त्याला मी जबाबदार नाहीं !"

"तो कसा ?"

"यानें अन्याय केला, तो त्याचे परिणाम समजून केला का ? ज्यांना त्रास दिला यानें, त्याच्या आतेष्टांची पर्वा केली का ?"

"न्यायदेवता निष्ठुर असते !"

"अगदीं बरोबर हेंच म्हणतो मी; अन्यायाचा सूड घ्यायला मी निघालों आहे तो न्यायाच्याच आधारानें ! न्यायदेवता निष्ठुर असते ! माझ्या या न्याय्य सूडानें ग्लीसन् याचेवर अन्याय होत नाहीं ना ? मग इतरांवर त्या मुळें होणारा परिणाम मी पहात नाहीं !"

"तुझं आयुष्य मातीमोल ठरेल !"

"ठरो त्याची मला चिंता नाहीं; शारीरिक अर्थानें मातीमोल ठरेल, पण यापेक्षाही उदात्त, यापेक्षाही धैर्यवान, यापेक्षांहीं उच्च अशा दृष्टीनें पाहिलं म्हणजे तें म्हणणं चुकीचं आहे असें दिसेल ! या विवक्षित, व्यक्तिगत अत्याचाराला मला प्रवृत्त केलें तें त्या व्यक्तिच्याच गतकृत्यांनीं ! पराक्रम हीच जीवनाची शोभा आहे माझ्या मतें ! अन् न्यायाकरिता बलीदान हा पराक्रमच आहे एकप्रकारें ! शंभर वर्षे कुत्र्याप्रमाणें जगण्यापेक्षा दहा वर्षे मनुष्याप्रमाणे जगणें अधिक प्रिय आहे मला ! अन्यायाविरुद्ध चीड येणं यांतच मनुष्यत्व आहे ! अन् त्या अन्यायाविरुद्ध लढण्याचा निश्चय प्राणमोलेंही लढण्याचा निश्चय-इतरेजनांना जागृत करणं हें राष्ट्रहितच आहे ! मृत्यूचं मोल कदाचित् द्यावं लागेल या पूर्वतयारीनेंच मी हें करतों आहे ! पण शक्य तर तें न देण्याचा माझा विचार आहे."

त्याच्या परस्परविरुद्ध विचाराचा अखेरचा निर्णय वरीलप्रमाणें घेतला अजयानें !

---

**प्रकरण १७ वें**

# हल्ल्याच्या आदला दिवस

एक महिन्याच्या अवधीनंतर आनंदस्वामींच्या मृत्यूनें अजयाला झालेलं दुःख कमी कमी होत होतें, तर त्याच वेळेला अजयाचे अंतःकरणांत, त्या रात्रीं घडणाऱ्या प्रकारांत जर अपयश आलें तर काय होईल, हा प्रश्न एक-सारखा उभा रहात होता. अशा वेळीं स्वतंत्रतेतील शकुन्तलेची त्याची ती शेवटचीच भेट ठरली असती.

ज्या जलप्रवाहाच्या कांठावर तीं दोघें बसलीं होतीं, त्यांत एक दगड टाकला तिनें! तरंग आंतून बाहेर पसरत गेले. त्यांच्या त्या सूक्ष्म ऊर्मी-कडे लक्ष देत तिनें विचारिलें—

“ तुम्ही कोटल्या तरी अडचणींत आहात! होय ना अजय?”

“ शकू!” तिचे हात आपल्या हातांत घेत तो म्हणाला, “ गेला सबंध दीड महिना मी रोज तुझं समाधान करतों आहे अन् तुझं परत तेंच! मामांच्या वियोगानें झालेला फरक असला तर असेल हा! बाकी दुसरी मला काय विवंचना आहे!”

“ माझा नाहीं यावर विश्वास बसत! मनुष्य लपविण्याचा यत्न करील; पण त्याचा विवेक— ”

“ सदासर्वदा विवेक धरण बरं नसतं!” तिला मध्येच थांबवीत अजय उद्गारला.

“ म्हणजे! मनांत खळबळ असली तरी ती ओळखायला तूं मोठी मन-कवडीच कीं नाहीं!”

“ त्यामुळें नाहीं कळलं मला तें!”

“ नाहीं तर कशानं?”

"तुम्ही नित्याचे, त्यामुळं तुमच्या मुद्रेवरील बदल मीं चटकन् ओळखला!"

ती आपला हेका मुळींच सोडीना, हें पाहून अजयानं तें बोलणं तिथेंच थांबविलें. थोडया वेळानें त्यानें पुन्हां संभाषणास सुरुवात केली. माडीवरील उभ्या हातावर हनुवटी टेकून शकुन्तला त्याच्याकडे पहात होती.

"काय होणार आहे कुणास माहीत?"

"कोणाचं?"

"आमच्या पहारेकऱ्याचं! मी पाळतीवर असतो त्याच्या; असं म्हटलं, त्या सी. आय्. डी. च्या मनुष्यानं!"

"का? तुम्ही कुठें कशाकरिता कट करता आहां कीं काय?"

"छे छे! त्याचा आपला संशय तसा!"

"काय साधण्याकरितां असं त्याचं म्हणणं?"

"अर्थात् देशाच्या स्वातंत्र्याकरितां!"

"म्हणजे? तुम्ही का हल्ला करणार आहांत कोणावर?"

या तिच्या प्रश्नानें आपली चूक कळली अजयाला. त्यामुळें मानेनें त्या प्रश्नाला नकार देत, त्यानें तो विषय सोडला. यानन्तर मात्र त्यासंबंधीं एकही उद्गार न कळत का होईना त्याच्या भाषणांत आला नाहीं.

"तुम्ही असं कांहीं करू नका! डोकं शांत ठेवत जा! तुमची बेफाम वृत्ति मला माहीत आहे; म्हणूनच तिला लगाम घालणं माझं कर्तव्य आहे!"

"कां? काय होईल आपली ताटातूट झाली तर?" अजय गंभीरपणें हसला. त्याच्या विचारग्रस्त मुद्रेवरील तें हास्य रानवट जमिनीवर एकटेंच पारिजातकाचं फूल दिसावें तसं होतें!

"काय होईल? संबंध जीवन निरर्थक होईल माझं! तुमच्या वियोगाच्या आवेगांत मनाच्या अनावरतेनें सर्व व जुमा लाथ लाथाडत धांवत जाईन मी अन् जीव तोडून हांका मारीत सुटेन 'अजय, अजय!' या माझ्या हांकेच्या आर्त स्वरानं तुमचं अंतःकरण गलबलायला लागलंच पाहिजे;

परन्तु यानन्तरही तुमची गांठ पडली नाहीं तर माझी हांक ऐकून तेवढ्याच प्रेमानें 'ओ' देण्याकरितां तुम्ही या जगांतच नाहीं आहांत, हें निश्चित समजून तुम्हांला त्या चिरंतन सौख्याच्या अंतराळांत भेटण्या-साठीं मीही झट्पट् हें जग सोडून जाईन! पण जाऊ द्या! या वेळीं या अप्रिय गोष्टी नकोत!"

"तुझी ही माझ्यावरील भक्ति माहीत असतांही मी तुला सोडून जाऊं शकेनच कसा? कितीही जोराचं वादळ होऊं दे, त्या भयाण वाऱ्याच्या रानटी आवाजांतही मी मोठमोठ्यानें ओरडत राहीन 'शका, शका'! चल, या ग्रस्त करणाऱ्या प्रदेशांतून आपण दोघंही जण दूर–दूऽऽर जाऊं! मग कितीही संकटाची परंपरा जरी आली तरी त्या वेळींही तुझा हात मी सोडणार नाहीं; त्या स्थितींत तुला एकाकी सोडून दुसरीकडे जाणं शक्यच होणार नाहीं. तुझा आनंद तोच माझा आल्हाद! तुझं सौख्य तेंच माझं सुखनिधान! तुझ्या सहवासाशिवाय क्षणभरही मी जिवंतच राहू शकणार नाहीं!"

"हं!" त्याच्या त्या निःस्सीम प्रेमानें शकुंतलेचें हृदय भरून आलें होतें.

त्या प्रेमी युगलाच्या संभाषणांत मग बराच वेळ खंड पडला. दोघेंही आपापलें हृद्गत सुप्त अंतःप्रवाहांतूनही एकमेकाला ऐकवूं शकत होतीं. आत्यंतिक भावनेच्या भरांत काहीं वेळा असें घडतें कीं, त्या दोन व्यक्तींचे विचार वाग्गुंफेतून प्रकट होत नाहींत, तरीही एकमेकाच्या मनांतील खळख-ळाट अंदाजानें परस्परांना पूर्ण अवगत होऊं शकतो!

आतां अंधार पडायला लागला होता.

त्या अंधुक प्रकाशांतही शकुन्तलेची भावनाप्रधान मुद्रा अजयाला दिसली. नेत्रकटाक्षांनीं ती त्याला आकृष्ट करीत होती. तिच्या पापण्यांची हालचाल तिच्या हृदयाची हालचालच व्यक्त करीत होती. उजव्या बाजूस बसलेला जय हा आपल्या प्रीतीचा विजय आहे असेंच ती मानीत होती. सस्मित मुखानें आपले ओठ विलग करून ती बाजूच्या अजयाकडे पहात होती.

तिच्या बिंडणीजवळची आकर्षकता अजयाला मुग्ध करून सोडीत होती. तिच्या कांहीं वेळच्या चाळ्यामुळें केशकलापाची कपाळावर जरा खालीं आलेली एका बाजूची तिरकी कुरळ तिचें मूळचें अरुंद कपाळ केशभारानें अधिक व्यापून टाकत होती. तिचा डावा गाल कंपित झालेला त्यानें पाहिला तो खराच कीं अजयाला तसें अंधकारांत दिसलें कोणास ठाऊक !

"शकूऽऽ" त्यानें मारलेली हांक, कर्णरंध्रें बधीर झाल्यावर आवाज ऐकूं यावा, तशीच तिनें ऐकली.

"अजय !" अस्पष्टसें ती पुटपुटली. त्याच्या खिशांतील पांढरा रुमाल तिनें बाहेर काढला. आपल्या हातांभोंवतीं गुंडाळल्यासारखा केला नि ती तो त्याच्या कोटाच्या खिशांत परत ठेवणार तोंच तिच्या लक्षांत आलें. एक कागदही बाहेर पडला होता. तोंच तो कागद उडून त्या जलप्रवाहाच्या कांठावर पडला. त्यावरील ओलसर धूळ तिनें पुसली नि तो उचलून परत अजयाला देऊन विचारिलें—

' काय आहे हें ?"

"उद्यां एका मल्लविद्याविशारदांना द्यायचा कागद आहे तो ! त्यांचे एकदां प्रयोग करायचे आहेत आपल्या आखाड्यात; माझा पत्ता आहे त्यावर !" असें म्हणून तो मळका कागद तसाच अजयानें वरचे खिशात खोंचला पुन्हा.

"तें बाऊं द्या !" असें म्हणून शकुन्तलेनें तो रुमालही पुन्हां त्य खिशांत खोंचला नि म्हटलें, "किती लबाड आहांत तुम्हीं, जय ! अलिकडे चार दिवसांत निवांतपणें माझ्याशीं बोलायला तुम्हांला वेळच होत नाहीं ना !' तिनें विचारिलें न् तसें करतांना त्याचा कोटाच्या खिशावरील हात तिनें धरला

"असं कां ? बरं आहे; आतां बराच वेळ बसतो इथें गप्पा मारीत !'

"असं नुसतं बोलू नका !"

"मग काय ? करून दाखवूं !" अजयानें चटकन् कलाटणी दिली तिचें मुखकमल त्यानें हातानें वर उचललें, आपले नेत्र तिच्या नेत्रांशीं

भिडविलें अन् तिच्या खांद्यावरील आपल्या हातानें तिचें वामांग पुढें ओढीत तो अलगद वांकला.

तांबूस प्रकाश नाहींसा झाला. क्षितिजाकडे तो पळाला असावा कीं संध्येबरोबर तो लुप्त झाला, कोणास माहीत.

शकुन्तलेच्या त्या भेटींत मृदु हिरवळीवरून अचपल कुरंगाप्रमाणें आपण दुडुदुडु धांवत आहोंत, असें त्याला वाटत होतें. सुंदरशा पुष्पगुच्छाचा वास यावा तशी गोड गुंगी त्याला आली अन् रम्य प्रदेशांत खूप हिंडल्याप्रमाणें त्याचीं गात्रें सुखावलीं होतीं.

त्यानें शकुन्तलेच्या गालावरील आपले अधर दूर नेले त्या वेळेस चद्रकोर अंबराच्या प्रासादावर शंकराच्या मस्तकावरील आपलें उच्चस्थान अभिमानानें घोषित करीत होती उंचीवरून ! तीं दोघं परत जायला निघालीं तेव्हां अजय शकुंतलेला म्हणाला, " तूं म्हणतेस पण मला उद्यां भेटता यायचं नाहीं ! "

" बरं मग ! परवां ! "

" तेंही सांगतां येत नाहीं ! "

" कां ? "

" मित्राबरोबर जावं लागेल एखाद्वेळेस; माझ्या पाठीमागें किती निकड आहे कामाची, माहीत नाहीं तुला ? आतां गेल्यावरही स्वस्थ बसून चालायचं नाहीं ! लगेच त्या कार्याच्या पाठीमागं लागलं पाहिजे. परवां बहुधा येईन. परन्तु नाहींच आलों तर काळजी करूं नको ! तुझ्याशिवाय क्षणभरही चैन पडत नाहीं मला; पण कर्तव्याकरितां त्यावर पाणी सोडायला लागतं मधून मधून. "

अजयानें विचार केला—

आपल्या या दुहेरी बोलण्यांतील खरा अर्थ हिला त्या कार्याच्या यशस्वीतेनन्तर कळेल अन् कदाचित् त्यांत आपटी मिळाली तर तरीहि समजेल. "

" पण तें शक्यच नाहीं. यश हें आलंच पाहिजे, " असें त्याचें मन त्याला सांगत होतें. तीं दोघें मग घरीं परत जावयाला निघाली.

त्यांच्या पायाखालचा रस्ता मागें सरकत होता त्याचप्रमाणें डोक्यावरील

दूधगंगेचा पट्टाही खालींवर हाललेला दिसत होता त्यांना. "पृथ्वीवरील तो मार्ग हा आपल्या जीवनाच्या मर्दुमकीचा नि त्या पराक्रमानेंच अढळ न् उच्चस्थान मिळायचं तें मात्र या ओजस्वी रत्नभांडाराप्रमाणें वर–उंच. एखाद्या ऋषीनें आपल्या शिष्यांना जें ध्येय सांगितलं तें सदोदित त्याच्या-पुढं असावं त्याप्रमाणें ध्रुवाचा तारा कायमचं ठाण देऊन बसला होता एका बाजूला. सप्तर्षींचा तो समूह त्या उंचावरून काय पहात होता पलीकडे? भारताच्या स्वातंत्र्याचे पडसाद ते ऐकत होते कीं सप्तसमुद्रापलीकडच्या लोकांची कृत्यें एकेका समुद्राच्या हद्दींत त्याच्यापैकीं एकेकानें पारखावीं असें त्यानीं आपसांत ठरविलं होत? कीं सप्तरंगी भास्वताच्या तेजाशीं स्पर्धा करण्याकरितां ते सातहीजण एकदम प्रकाशित होत होते? हौतात्म्यानें अद्वितीय धैर्य दाखविणाऱ्या प्रत्येक मनुष्याचा अल्पसा अंश त्यांच्यांत मिसळत होता काय म्हणून इतके दिवस त्याचें तें स्थान अढळ रहावें!" याप्रमाणें अजयाचे विचार चालू होते.

चंद्रकोरीचे वरील बाजूस धूसर मेघ विस्कळीत रीतीनें जमले होते. त्यांच्याकडे पाहतांना अजयाला वाटलें, "आपण ही जी प्रीतिपूर्वक हालचाल शकुन्तलेबरोबर करीत आहों ती तिची फसवणूक नव्हे ना?"

"अहं! मुळींच नाहीं;" त्याला उत्तर मिळालें. "प्रीतिसंगमाच्या आनंदोत्सवात मंगलवाद्यें वाजत असतां प्रियतमेबरोबर हिंडणार सम्राट् माहीत आहेत ना? पण म्हणून पराक्रमाचा मोकाही त्यांनीं साधलाच ना? तोही तितक्याच विजयश्रीनें! झालं तर! तुझ कर्तव्य पूर्ण करण्याच्या आड तुझा हा विहार आला नाहीं म्हणजे तुला अल्पही दूषण नाहीं. मंगल-वाद्याची मौज उपभोगतांना रणवाद्यांच्या उत्तान आवाजाबरोबर पराक्रम करण्याची तुझी तयारी असली म्हणजे झालं! मात्र या दोहींतून जर एका-चीच निवड करायची झाली, तर मात्र तुला कर्तव्याचेच बाजूला झालं पाहिजे!"

त्याच्या त्या विचारांची सांखळी शकुन्तलेच्या घरांशीं तिनें केलेल्या

हस्तांदोलनानें तोडली ! त्या खुणेबरोबर शकुन्तलेच्या घरापाशीं रस्त्याच्या कडेला झाला तो आणि म्हणाला—

"कदाचित् ही शेवटचीच भेट आपली; " पण लागलीच त्यानें जीभ चावली, " म्हणजे परवाच्या आधींची अशी "— त्यानें सांवरून घेतलें.

त्या फाटकाजवळ मघल्या पातळाचा घोळ ओंचत ठेवून एक पाय फाटकाच्या आंत अन् एक रस्त्यावर असा तिनें ठेवला असतांनाच अजयानें तिचा हात सोडला. मात्र तिची ती बावरलेली मूर्ति तो बराच वेळ विसरूं शकला नाहीं.

आज सायंकाळची सहल सुखकारक झाली असेंच शकुन्तलेला वाटत होतें. तरी त्या वेळची अजयाची ती विचलित चित्तवृत्ति, तीमुळें त्याच्या संभाषणांतील चुकारल्याप्रमाण जिव्हेची गडबड, त्याच्या नेहमींच्या आर्जवी स्वरांतील माधुर्य कमी होऊन कठोर निर्दयतेचा थोडासा भाग या सर्व फरकांमुळें त्या रात्रीं, बिछान्याजवळ जातांना तिची मनःस्थितिही तितकीशी ठिकाणावर नव्हती. मऊ मखमलीच्या गालिचावरून चालताना आपण मयसभेच्या सभागृहांत तर वावरत नाहीं ना असा भास व्हावा, मधुर स्वरविलापानीं सुखाधीन होत असतांना, यापुढील स्वर रणघंटेचे कठोर सूर असणार नाहींत ना असें भय वाटावें, सृष्टिसौंदर्याचें उच्चतम व सर्व उपांगानीं सज्ज असें उद्यान पहातांना यांत कुठें विषारी झाडाची अन् लतापल्लवांची लागवड होत नाहीं ना असा संशय यावा तसें तिला वाटत होतें ! त्या सायंकाळीं तिला जें ऐकू आलें तें कर्णमधुर होतें ! दिसलें तें चित्तहारी होतें ! स्पर्श झाला तो सुखावह होता ! पण या सगळया गोष्टी स्वप्न्या होत्या तरी त्या क्षणिक नाहींत ना, असा संभ्रम वाटण्याचें मात्र ती टाळूं शकली नाहीं

" शकू ! " तिच्या आईनें हांक मारली !

" तुला जेवायचं कां नाहीं ? फार विचारग्रस्त तोंड दिसतं आहे तुझं ! "

" छे ! छे ! " ती म्हणाली.

" मला काय करायचं आहे त्याच्याशी ! आपलं हें दूध घेऊन तूं नीज म्हणजे बरं ! "

मातेच्या अद्वितीय मायेला शकुन्तला झिडकारूं शकली नाहीं. तिनें मुळींच नकार न दाखवितां तें दूध पोटांत ढकललें.

अन् बिछान्यावर अंग टाकलें.

अंगाला एक प्रकारची उकाळी येत असतांही निद्रेच्या स्वाधीन होण्याचा तिनें प्रयत्न केला.

दिवा मालवून ती अंधारांत पडली होती इतकेंच !

पलीकडे दिवाणखान्यांत तात्यासाहेब पत्नीजवळ विचारपूस करीत होते.

" मुळींच जेवली नाहीं ती ! "

" अहं ! "

" मीच जातों विचारायला; जेवतोंच आहें मी ! खाईल चार घास ! "

" तिला जेवण नको आहे; दूध प्यायला लावल, तही बळेंच ! "

" का ? ताप आला आहे कां ? "

" कुणास ठाऊक ! "

" अच्छा ! उद्यां सकाळीं पाहूं; " ते शेवटीं म्हणाले.

प्रकरण १८ वें

# वचनपूर्ति

आज घराबाहेर पडताना, आपल्याला या जगाबाहेरही जावयास लागणार आहे, याची ग्लीसन्‌ना मुळींच जाणीव नव्हती. गेल्या तीस वर्षांत न्यायाधीशाची जी नोकरी पत्करली होती, ती त्यांनीं त्यांच्या मताप्रमाणें उत्कृष्टपणें बजावली होती. असें करतांना, 'वंदे मातरम्‌!' घोषणेवरून पुष्कळांना त्यानीं कारागृहांत पाठविलें होतें. परन्तु त्या घोषणेप्रमाणेंच ती सत्यस्थितींत आणण्याकरिता, वाटेल तो त्याग करणारे वीर आहेत, हें माहीत असूनही, त्या नरश्रेष्ठाच्या त्या कृतींत, ग्लीसन्‌ यांनीं अडथळा आणला होता. परन्तु अशाप्रकारें आपल्या देशबंधूंच्या सत्कृतींत विघ्न आणणाऱ्यांना शासन करणारेही दुसरे देशबांधव असतात हें त्यांना माहीत असलें तरी आतां त्यांच्या तें लक्षात नसावें अन्‌ असाच एक तरुण, आपल्या मागावर त्याच उद्दिष्टानें प्रेरित होऊन पाळत ठेवीत होता न्‌ आज आपलें साध्य पूर्ण करणार होता हेंही त्यांना माहीत नव्हतें!

ते त्या अज्ञानांत होते हेंच बरें होतें—

नाहीं तर—

नित्याप्रमाणें युरोपिअन्‌ क्रीडामंडळाकडे जातांना ते आपल्या पत्नीला म्हणाले नसते—

"Good night darling! Where is my babe?" (अच्छा नमस्ते! बाळ कुठें आहे?"

असें म्हणून त्यांनीं एक सिगारेट शिलगावली हॅट्‌ सारखी केली नि ते बंगल्याच्या बाहेर आले.

बंगल्याच्या पायरीवरून ते उतरत होते, तोंच त्याची पत्नी बाहेर आली. आपल्या पायघोळ झग्याची बाजू हातानें तिनें उचलून धरली आणि कडेवरील मुलाला झोंपेंतून जागें केलें. निद्रिस्त डोळे उघडून तो मुरडत आपल्या पित्याकडे पहात होता.

" O you sweet little one ! " ( " काय रे गुलामा ! " ) त्याचा बाळसेदार हात ओढीत नि उजव्या हातातील काठी डाव्या हातावर अड-कावीत, दोन्ही हातानीं ग्लीसननीं आपल्या मुलाला घेताना म्हटलं.

पतीच्या हातात असणाऱ्या आपल्या बालकाकडे कौतुकानें पहात त्याचा एक गालगुचा घेतला तिनें ! ग्लीसन् वाकून त्याच्याकडे पहात होते. त्यांनी मुलाला परत पत्नीजवळ दिलें अन् हातातील सिगरेट फेकून दिली.

" Come up my darling ! I am to be off now ! " ( " चल, आटप, मला लवकर गेलं पाहिजे." )

त्यानीं हात पसरले. त्यांची पत्नी मुलासह पुढे झाली. तिला करपाशांत अडकावून तिच्या मस्तकाचें चुंबन घेतलें ग्लीसननीं नि मग " Yes, चलो," असें म्हणून बंगल्याच्या पायऱ्या ते उतरले. ते दोन चार पावलें चालून गेले. मोटारच्या दाराजवळ अदबीनें उभ्या असलेल्या गणू पट्टेवाल्या-कडेही न पाहतां तसेंच आंत जाऊन ते मोटारींत बसले.

गाडीहाक्यानें मोटार सुरूं केली. मोटारच्या खिडकींतून एकदां ग्लीसन्नीं दुसऱ्या जळत्या सिगारेटसह हात हालविला.

मोटार लांब गेली. तिकडे त्यांची पत्नी पहात राहिली बराच वेळ ! तिनें बंगल्याचें दार लावून घेतलें नि मुलाजवळ लडिवाळपणानें बोलत ती आंत गेली. तिच्या मनांत त्या वेळीं काय होतें ? बरा घेळापूर्वींच तिनें थोडी नाखुषी दाखविल्याबरोबर ग्लीसन् म्हणाले होते,—

" No ! no ! no ! You must not fear like that ! Gleeson's wife should be as bold ! ( चू चू, असं भिऊं नये ! तूं ग्लीसनची पत्नी आहेस ! " )

ग्लीसन्, कटाच्या महत्त्वाच्या मर्मस्थानावर जाण्यापूर्वी, त्या ठिकाणींच असलेला अजयाचा मित्र म्हणाला,

"काय रेऽऽ? घाबरला आहेस होय?"

"छे छे!" अजयाचा दबलेला आवाज आला.

"चेहरा टाकल्यासारखा बोलतो आहेस. बाकी काळोखच आहे म्हणा! तो मला दिसण्याची कांहीं भीति नाहीं तो!"

त्या तशा स्थितींतही विनोद करणारा मित्र म्हणजे कटांतील आपला भाग लीलेनें पार पाडणारा सहकारी होता अजयाचा.

समोर एक तारा निखळला तेव्हा तो अजयाला म्हणाला—

"अर्रर्र, जया अपशकुन!"

"छे? भलतंच? हें तर आपलं ध्येय आहे. वाचलेलं आठवतं मला कुठं तरी—"Great men are like shooting meteors who consume themselves for the good of others—" ("थोर मनुष्यें हीं दुसऱ्याच्या सौख्याकरितां स्वतः नामशेष होऊन जाणाऱ्या निखळलेल्या तारकाप्रमाणें आहेत.")

अशा प्रकारचें हें बोलणें संपवून त्याचा मित्र आपल्या नियोजित स्थळीं जाणारा तोंच ओरडला हलकें—

"घात झाला रे, घात! हा पट्टा तुटला ना!" कंबरेवर हात दाबीत तो म्हणाला.

प्रसंग ओळखून मुळींच विलंब न करतां, वरील खिशांतील रुमाल काढला अजयानें! नि म्हटलें—

"हें घे, चल आटप लवकर!"

तोच पट्टा नीट बांधून त्याच्या मित्रानें अजयाला नमस्कार केला.

गुन्हा (हो, चालू निर्बंधानें तो गुन्हाच होता) उघडकीस आलाच तर तो स्वतंत्रतेंतील शेवटचाच प्रणाम होता त्या मित्रांचा.

सेंट्रल उपाहारगृहाच्या अलिकडे दोन फर्लांगवर मोटार येतांच त्या मोटारींत ग्लीसन् यांनीं थोडी हालचाल केली.

त्या नाक्याच्या टप्प्यांत मोटार आली. तिच्या पुढील दिव्याचा प्रकाश समोर पडला होता. त्या प्रकाशांत, नाक्यावर इतके दिवस नसलेला पोलिस आज कसा तिथें दिसत होता, याचें आश्चर्य करीत होते मोटारींतील ग्लीसन्साहेब.

ते पुढील जागेच्या पाठीच्या चौकटीवर हातानें आधार घेत पुढें झाले.

"गन्नू! पोलिस इदर कायकू?" आपल्या हिंदींत त्यांनीं विचारलें नि त्या प्रश्नाच्या उत्तरासाठीं आपल्या घरच्या खाजगी पट्टेवाल्याकडे पाहिलें त्यांनीं.

त्या त्यांच्या खेडगुजरी हिंदीनें त्याच विस्मयांत पडलेल्या गणू पट्टेवाल्यास कांहीं बोध होऊन, तो उत्तर देणार तोंच त्या पोलिसाचा "स्टॉप हॅंड" वर झाला. हा सर्व प्रकार अतिशय जलदीनें झाला!

अजय उभा होता त्याच्या थोडी पुढें मोटार रस्त्यावर थांबली. त्याच जागेवर अजय विलक्षण शिताफीनें सरकला. ग्लीसन्ला विचार करण्यासही वेळ मिळाला नाहीं.

ग्लीसनच्या अदाजानें अजयानें झाडलेली एक गोळी साहेबांच्या अंगावर पडली. त्यांचा विव्हळण्याचा आवाज आला. लागोपाठ दोन गोळ्यांचे आणखी आवाज झाले. साहेब मागें धाडकन् आपटले. आवाजांनीं भयभित होऊन गणू मागें वळून पहातो तों वळतांना समोरील पोलीस शेताकडे पळाला. लागवर दुसरा एक कांचा मारलेला, टोपी नसलेला मनुष्य त्याला मिळाला अन् ते दोघे वायुवेगानें रस्त्याच्या झाडींत अदृश्य झाले. मोटारींतील दृश्य हृदयविदारक होतें. साहेब मागील बाजूला रेलून अस्ताव्यस्त पडले होते. मोटारच्या आंतील निळसर दिव्याच्या प्रकाशात त्यांचा एक हात छातीवर होता. त्या कपड्यांतूनही रक्ताचे ओघळ वहात होते. तिथेंच पहिली गोळी बसली होती. त्यावरील उघड्या पजाच्या हतानें ते त्या जागीं सांवरून धरणार तोंच दुसरी गोळी त्यांच्या कपाळास चाटून गेली होती नि विरुद्ध दिशेच्या काचेच्या तावदानाचा चक्काचूर झाला होता.

साहेब जागच्या जागींच गतप्राण झाले होते.

मोटार वेगानें क्रीडामंडळाकडे नेली गाडीहाकयानें ! स्वत: पोलिस सुपरिंटेंडेंटच प्रथम भेटले तिथे त्याना सर्व वृत्तांत कळवून रुग्णालयाकडे मोटार वळविण्यात आली. परन्तु ग्लीसन् मृतप्राय झाले याविषयीं डॉक्टराच्या अधिकृत निर्णयावाचून कांहींच अधिक मिळू शकलें नाहीं तेथून ! सर्व अधिकारी मंडळी मग हल्ल्याच्या जागीं गेली.

"What a tragedy!" पो. सु. उद्गारले. ("काय झालं हें ऽ !")

"And with such a skill—" फौजदारांनीं सांथ केली. ( " अन् इतकं बेमालूम " )

आपल्याबरोबरचे दोन शिपाई त्यानी बाजारांत पोंचविले. गॅसच्या मोठाल्या बत्त्या आणण्यांत आल्या. बाजूच्या सर्व जागेला गराडा देण्यांत आला. अंतराअंतरावर जरा पानाची हालचाल झाली कीं त्यांच्यापैकीं एक-दोघे जण तिकडे धावत, झुडपातून हातातील लाठी फिरवीत न कांहींच हातीं न लागल्यानें निराश होऊन परत स्वस्थ उभे रहात अन् त्या सळ-सळीकडे आशेनें बघणारे अधिकारीही हिरमुसले होते.

त्या नाक्यावरून एखादी खाजगी मोटार वेग कमी करीत वळून दुसऱ्या रस्त्यानें परगांवला जाई; तीमधील उतारूही नाक्याजवळचा तो प्रकाश, खाकी वेषांतील पोलिस अधिकाऱ्यांची ती गडबड, एका बाजूस पंचनामा लिहित बसलेल्या लेखनिकास बारीकसारीकही माहिती सांगण्यांत गुंतलेले फौजदार नि त्यांत दुरुस्ती करणारे पोलिस सुपरिंटेंडेंट, यांच्याकडे कुतुहलानें पहात त्याची मोटार परत सुरू होई अन् वरील दृश्य त्यांच्यापासून अदृश्य होई. एक शिपायांची पलटण तेथे पसरलेली होती. त्या लोकानीं आजू-बाजूचा सर्व मुलूख धुंडाळला. तोंच हल्ल्याच्या जागींच पण शेतात, जिथे अजयानें रुमाल काढून आपल्या सहकाऱ्याला तो दिला होता, त्या ठिका-णचा एकजण ओरडला,

" अरे हें काऽऽय ? "

त्याच्याकडे सर्वांचें लक्ष गेलें.

" काय ? " सर्वजणांनीं विचारलें.

हातांतील कागद त्यानें उंच धरला.

एकाद्या लोहचुंबकाला बाजूने खिळे चिकटावे त्याप्रमाणें सर्व बाजूंनीं ते पोलिस वरील ठिकाणीं गोळा झाले. ते तसे एकदम गेल तेव्हां कांहीं तरी सापडलं असलेंच पाहिजे, अशा समुजतीनें अधिकारीही त्या समुदाय-कडे आशेनें पहात होते. आपापसांत त्या कागदाची फिरवाफिरवी करण्यांत वेळ घालविला तर शिस्तभंग होईल या भयानें ज्याला तो कागद सांपडला होता त्यानें तो आपल्याबरोबरीच्या एका शिपायाजवळून परत घेतला नि तो घोळका दुभंगला गेला, तसा वरील पोलिस धांवत आपल्या साहेबाकडे गेला.

त्याच्याकडे आशेनेंच अधिकारी पहात होते.

"What's it?" पोलिस सुपरिंटेंडेंट म्हणाले. ("काय आहे तें?")

त्यांनीं तो कागद हातांत घेतला.

तो वाचून त्यांना हर्ष झाल्यासारखा वाटला.

आपल्या एका समवयस्क अधिकाऱ्याला त्यांनीं तो दाखविला. दाढीला हात लावून आठवल्यासारखें करीत त्यांनीं डोळे वर अस्मानाकडे लावले. नि मग "हां! तेंच रे, तेंच!" असा अविर्भाव करीत फौजदारांच्या कानाजवळ ते गेले.

" How do you think ?" ("तुम्हांला कसं वाटतं?") त्यांनीं त्याला विचारलें

" Just so"—(तसंच तर काय!) फौजदाराने उत्तर दिलें.

" O. K. Tomorrow; morning; Let him have no time to hide any evidence!' (अच्छा, उद्या सकाळींच; त्याला मुळींच अवधि देऊं नका!")

" Good!" ("अच्छा!") एकदम दोघेही पोलीस ओरडले.

"अर्र्‌" डोक्याला हात लावीत नि मान खालीं करीत त्याच वेळेला अजयही त्याच्या घरीं ओरडला.

"काय झालं?" त्याच्या सहकाऱ्यानें विचारिलें.

त्याच्या कानांत अजयानें न कळत झालेली एक भयंकर चूक सांगितली. तें ऐकून त्यालाही अतिशय वाईट वाटल असावें अशी त्याची मुद्रा सांगत होती. किती कौशल्यानें त्यांनीं तें काम केलें होतें ! हल्लयाला निघण्यापूर्वी सी. आय्. डी. च्या एका इसमाला त्यांच्या सहकाऱ्यांनीं गोष्टी बोलण्यात कसें अडकविलें होतें, किती आस्था बाळगली होती त्याविषयीं ! परन्तु त्या सर्वांवर एका चुकीनें विरजण पडणार होतें. शकुन्तलेला दिसलेला तो संध्याकाळचा कागद, अजयाच्या हातून रुमाल काढताना तिथेच पडला होता हल्लयाच्या जागीं.

दुसऱ्या दिवशीं आपण रात्रीच्या वेळीं तुरुंगाच्या खोलींत फाशीं वा काळे पाणी या विवंचनेत एकलकोंडेपणाने पडलेले असणार या विचारानें अजयाची चित्तवृत्ति बेभान झाली. त्यानें आपल्या हातांतील पिस्तुल त्या सहकाऱ्याजवळ दिलें नि शून्य मनानें त्याला म्हटलें,

"जा ! मुळींच थांबू नको इथें, आतां धोका आहे. हें पक्कं समज कीं, माझा कितीही छळ करून पोलिसानीं त्रस्त केलं तरी तुझं नांव किंवा इतर कोणाचही, मी केव्हांही तोंडाबाहेर काढणार नाहीं. तुझा भाग तूं नीट पार पाडलास. माझ्या चुकीमुळें जो अनर्थ होईल तो भोगणं माझं कर्तव्य आहे, जा पळ."

पोलिसाचे दिखाऊ कपडे येतांनाच एका दगडाभोंतीं गुंडाळून एका पडक्या विहिरींत त्या मित्रानें टाकले होते.

मनःस्थिती अनावर करणाऱ्या त्या चुकीमुळें अजयाला झोंपच लागली नाहीं रात्रीं बराचवेळपर्यंत ! कच्च्या कैदेंतील कठोर कारावास त्याच्यापुढें उभा राहिला. पोलिसांच्या काळ्या यादींत त्याचें नाव बरेच दिवस होतें. 'त्या मोटारमधील ड्रायव्हरनें आपणाला पळताना पाहिलें होतें हेंही निश्चित ! मग आता त्या पुराव्यावर आपणांला त्यांनीं पकडलें अन् तोंड दाबून बुक्क्यांच्या मारानें जर्जर केलें, त्यांतूनही धैर्याची परिसीमा करून आपण गुन्हा नाकबूल केला, तरी वरील पुरावा आपणांस गोत्यांत आणण्याला—पुरेसा नाहीं का ?' त्याला वाटू लागलें. कष्टी मुद्रेनें आपल्याकडे शकुंतला पहात असल्याचें

त्याला दिसलें. 'झुजतां झुजतां आपण पडलो तरी ग्लीसन् तरी ठार झाला ना!' त्याला वाटलें. त्याच्या अंदाजानें तो नाहींसा झाला होता, असेंच अजयाला सांगितलें अन् तेंच खरें होतें. त्यामुळें हल्ल्याची वरील एक प्रकारची यशस्विता त्याला कांहीं थोडें समाधान देत नव्हती! झालें तें होऊन गेलें अशा विचारानें तो आपलें समाधान करून घेत होता. वाटेल त्या देहयातनांनींही आपला धैर्यमेरू सहनशक्तीचा कोट करून ढळूं द्यायचा नाहीं, असाच निश्चय तो करीत होता. एकीकडे त्या भयंकर देहदंडाच्या कल्पना त्याला भेडसावीत होत्या तर दुसरीकडे हवेमध्यें अधांतरींच आनंदस्वामींची समाधानी सस्मित मुद्रा मुखकमलापर्यंत त्याला दिसत होती. त्यांचें तोंड हललें. पण कांहींही आवाज त्याला ऐकू आला नाहीं! विचारमग्न दृष्टीनें तो त्यांच्याकडे पहात होता. त्यांनीं आपला वामहस्त हालविला. ते खुणावत होते, "चल, लवकर आटप! तुझा भेटण्यासाठीं मी तळमळतों आहें. माझ्या इच्छापूर्तीनंतर तुला शाबासकी द्यायला मी जिवंत नाहीं, असं तूं म्हणाला होतास ना? मग ये! ये! जया, माझा हा तृप्त वरदहस्त तुझ्या मस्तकावर ठेवू दे! माझा हा कृपाकर तुझ्या पाठीवर फिरूं दे!" अजयानें मनांतच उत्तर दिलें, "छे! छे! शक्य नाहीं तें; मी तुमच्याजवळ येईन हें नक्की; परंतु अल्पावकाशांत कीं कारावासाच्या अनन्वित देहयातनांनीं झिजून तें माहीत नाहीं मला; जा! स्वस्थ रहा तुम्ही! मी तुम्हांला भेटेन हें निश्चित समजा;" त्याच्या मनांत भविष्य काळांतील कितीतरी प्रसंग धिंगाणा घालीत होते. कल्पनेच्या कुंचल्यानें मनःपटलावर तो तें रंगवी, त्याच्याकडे दृष्टि फेकी अन् त्यांच्यांतील कष्टदायक नि भयप्रद भडक रंग न साहून नेत्र मिटून घेई. परन्तु त्यानें डोळे मिटले, तरी तीं चित्रें का त्याला भिंतीवर दिसत होतीं? तर डोळे मिटले म्हणजे ती नाहींशीं होणार! मनःचक्षु त्या तशा उपायालाही दाद देणार नव्हता. सर्वत्र अंधार मिट्ट पडला होता. न्यायालयांतील अभियोग त्याला दिसला. तात्यासाहेब आपल्या वकिलीच्या [illegible]न् अनुभवाची शर्थ करून सोडीत आहेत, परन्तु चक्षुर्वै सत्य प्रमाणें साक्षीदार आपलेंच नांव स्पष्ट सांगत आहेत हेंही त्यानें पाहिलें. त्यावर

त्यांचा तरी काय उपाय? सारें आकाश फाटले तर तें थेंडच आहे म्हणून एखादा खगोलशास्त्रज्ञही सांगू लागला तरी काय उपयोग? पंचांनीं मुळींच ते मान्य केलें नाहीं. सपशेल विरुद्ध पुरावा आपल्याला ग्रासून टाकीत आहे हेंही त्याला दिसलें. शेवटीं न्यायाधीशांनीं निकाल पुकारला. फांशी कीं त्यहूनही भयंकर असें काळें पाणी, ते त्याला नीट ऐकू आलें नाहीं! परन्तु शिक्षा एेकतांच एका बाजूने एका स्त्रीचा हुंदका आला; त्यानें तिकडे पाहिलें. शकुन्तला त्याला दिसली! आरोपीच्या पिंजऱ्याच्या कठड्याजवळच ती आली. त्या दारुण अन् वैताग आणणाऱ्या परिस्थितींतही आपण मुळींच शांति सोडली नाहीं हेंही अजयाला जाणवलें. त्यानें कठड्यावर टेकलेलें शकुन्तलेचें मस्तक वर उचललें. ती गद्‌गदा रडत होती. त्याच्याही डोळयात दोन अश्रुबिंदू चमकले न् त्याची अन् तिची शेवटीं ताटातूट झाली......

वरील दृश्यें पहाता पहातां वेळ किती लवकर जात होता रात्रीचा. पहाटेचा समय झाला! तेव्हा त्याला अल्पशी झोंपेची डुलकी आली.

त्याच वेळीं ग्लीसन् याची शवपेटिका, मलिकाच्या वेलींनीं नि फुलांनी सजविली जात होती. त्यांच्या मृत्यूची बातमी त्यांच्या पत्नीला कळविण्यांत आली, तेव्हा त्या पतिव्रतेचें हृदय शतशः विदीर्ण झालें. तिच्या डोळयांवर झापड आली. पतीच्या त्या मृतकायेकडे अन् त्या चिरविरहाच्या अंधःकारमय शवपेटिकेकडे पहाताना आपल्या लाडक्या बाळाचा हात तिनें पतीच्या मुद्रेवरून फिरविला, त्याच्या पायास स्पर्श केला, त्या विगतप्राण क्षणभंगुर शरीराकडे शेवटची दृष्टि टाकली अन् ती दूर झाली!

सर्व अधिकारी तें परिणामकारक दृश्य पाहून डोळयांना रुमाल लावीत होते! दुःखाचे निश्वास टाकीत होते!

आयुष्यात न ऐकण्यासारखे जुलूम केले तर आपल्यालाही असें बक्षिस मिळेल असें त्यांना वाटत होतें काय? कीं त्यामुळेंच अधिक संताप वाढून या कृत्याचा प्रवर्तक पकडून आणण्याची शिकस्त करण्याचा ते निश्चय करीत होते?

त्या जनसमुदायाच्या दुःखाश्रूंमध्येंच आपल्या राजवटीमध्यें लोकांना अप्रिय अशीं कृत्यें केलेले ग्लीसन् मृत्युशय्येसह प्रेतगृहांत पुरले गेले.

पडदा पडला !

एका जुलुमी राज्यकर्त्याचें चरित्र संपलें. जीवनक्रमाचा अंत झाला त्याच्या. मागील कृतकृत्यांचें भरपूर माप त्याच्या पदरांत पडलें होतें. या विधिघटनेकडे पाहून बोध आला होता का त्याच्या सजातीयांना ? मानवी भावनांचा तो खरा परिणाम होता—सत्तेचें प्रेम, नि प्रेमाची सत्ता यांमधील अंतर तिकडे पहतांच कळले असतें—जाणवलें असतें.

परिस्थितींत फरक होईल !

साधनांची अदलाबदल होईल !

परन्तु मानव्याच्या क्रियाप्रतिक्रियांचे नियम चिरंतन राहातील !



## प्रकरण १९ वें एका वृत्तानें केलेलें पुनर्मीलन

डॉक्टरांनीं सांगितलेला, विजयाच्या मुंबईतील निवासाचा आवश्यक काल केव्हांच संपुष्टांत आला होता. कॉलेजकरितां परत पुण्याला जावयाची तयारी तो करीत होता. त्याचीं दादा नि वहिनी पांच सात दिवसांपूर्वींच इनामगांवला परत गेलीं होतीं. रमाकांतची रुग्णालयामधील नोकरीची एकदोन महिन्यांची वाढलेली मुदतही संपली होती. त्यामुळें सायंकाळच्या गाडीनें विजय, राई न् रमाकांत अशीं तिघेंही मुंबई सोडणार होतीं. रमाकांत मात्र कल्याणला कांहीं कामाकरितां उतरणार होता. गाडी कल्याण स्टेशनांत शिरली तों विजयाच्या आग्रहावरून रमाकांत चहा घेण्याकरितां थांबला. विजय गाडीखालीं उतरला, सहज त्याचें लक्ष गेलें अन् व्हीलर स्टॉल्वरील वृत्तपत्राच्या ताज्या अंकाचा एक फलक वाचून तो आश्चर्य-चकित झाला.

डिस्ट्रिक्टजज्ज् यांचेवर हल्ला!
जय पटवर्धन यांना अटक!
विकासपूरचा गुप्त कट (?)

चारचे सुमारास निघालेला वृत्तपत्राचा तो विशेष अंक विजयानें कदा-चित् घेतलाही नसता. परन्तु त्या फलकावरील शेवटचा वृत्तांत वाचून त्याची जिज्ञासा वाढली. त्यानें एक आणेली टाकली अन् तेथून एक अंक उचलला!

एकापेक्षां एकेक लहान होत गेलेले त्या अंकांतील मुखपृष्ठावरील मथळे पाहून विजयाची उत्सुकता मात्र त्याच प्रमाणात वाढत गेली.

वृत्ताचा गोषवारा नन्तर त्यानें वाचला.

" विकासपूर—विकासपूरचे डिस्ट्रिक्ट जज्ज् अन् न्यायदेवतेचें एक फार जुनें प्रतीक–मि. ग्लीसन् यांचेवर काल रात्रीं सुमारें १० वाजतां कांहीं अज्ञात व्यक्तींनीं प्राणांतक हल्ला केला. गुन्हेगार फरारी आहे. पोलिसांना या सर्व घटनेचे मागें एक मोठा कट असल्याचा संशय येत असून त्यांचा तपास जारीनें चालू आहे."

नन्तर हल्ल्याची आणखी माहिती दिली होती. तीही त्यानें आधाशा-प्रमाणें वाचली.

" नेहमींप्रमाणें मि. ग्लीसन् हे युरोपियन् जिमखान्याकडे जात असतां 'सेंट्रल' हॉटेलनजीकच्या नाक्यावरील पोलिसानें त्यांची मोटार थांबविली. बरेच दिवस नसणारा पोलिस आजच तिथें कसा आला याचें आश्चर्य आपल्या पट्टेवाल्याजवळ ते प्रकट करीत होते तोंच त्यांच्या नोकरानें पिस्तुलाचा एक आवाज ऐकला नि मागोमाग ग्लीसन् यांचा विव्हळणारा स्वर ऐकला. त्याच्या मागोमाग पिस्तुलाचा एक भयंकर आवाज आणखी दोनदां ऐकू आला. मि. ग्लीसन् मोटारींतच कालवश झाले. मागें वळतांना, त्या नोकरानें, कोणीतरी दोन इसम रेल्वेलाईनचे बाजूला जोरानें पळाले तेंही पाहिलें. लागलीच पोलिसांत हें कळविण्यांत आलें. त्या सर्व जागेचा लागोलग सूक्ष्म तपास करूनही एका खरडलेल्या कागदाशिवाय कांहींहीं मिळूं शकलें नाहीं."

या सर्व वृत्तानें विजय स्तंभित झाला होता. तोंच त्याला खालील वृत्तांतही आढळला. एक छायाचित्र तिथें छापलें होतें. त्याच्याखालीं 'जय पटवर्धन' असें नांवही होतें. तें पाहून तर विजयाचें आश्चर्य दुणावलें. हुबेहुब आपल्याप्रमाणें दिसणारा हा कोण, "जय पटवर्धन!" नांवही आपलेंच! असा त्याला प्रश्न पडला. तें वृत्तही त्यानें वाचलें.

"छापतां छापतां—आमच्या विकासपूरच्या विशेष वार्ताहराकडून असें समजतें कीं, विकासपूरचे एक सार्वजनिक कार्यकर्ते श्री. जय

पटवर्धन यांना आज सकाळीं वरील हल्ल्याचे संबंधीं अटक करण्यांत आली आहे."

शोभनेच्या कॉलेजमधील मंडळाच्या उद्घाटनाकरितां ज्या शकुन्तलाबाई आल्या होत्या, त्यांचें बोलणें विजयाच्या मनांत उभें राहिलें. त्याही विकासपूरच्याच! आपल्यासारखाच कोणीतरी दुसरा एक तरुण विकासपूरला आहे, असाच त्यांच्या बोलण्याचा अर्थ नव्हता का?

ती अगाध घटना पाहून रमाकांतालाही कांहींच नीट कळेना.

"असा प्रकार तरी काय आहे विकासपूरचा!" तो विजयाला म्हणाला, "काय करायचं ठरवलं आहेस तूं यासंबंधीं?"

"थेट विकासपूरला जायचं म्हणतों! म्हणजे सर्व प्रकार समक्षच कळेल! अशक्य तर नसेल ना हा?"

"त्यात अशक्य काय आहे? जातो आहेस म्हणतोस तर गेल्याबरोबर विकासपूरचा पत्ता कळव मला अन् सर्व हकीकतही!"

"पाहूं या तर खरं! राईलाही नेतों बरोबरच! नेरळचा तो मनुष्यच आमचा गणू असावा असा माझा तर्क आहे!" वस्तुस्थिति जाणण्याच्या उत्कंठेनें विजयाचें मन भरून गेलें होतें.

गेल्या सुटीनन्तर पुण्याला जातांना त्याला उत्कंठा होती, त्याच्या दुप्पट आजची उत्कंठा होती.

भूतकाळाच्या पुष्कळ सुखकर नि असंख्य स्मृति गाडींतील मनुष्याच्या गर्दीप्रमाणें हुंडारून त्याच्याजवळ येत होत्या!

कल्याण स्टेशनपासून एखाद्या बैलावर गाडीच्या द्रुततर गतींमध्येंही, एक तरुण नि त्याची प्रिया (प्रियाच असावी असा विजयाचा तर्क!) गोष्टी करीत बसलीं होतीं; त्यांच्याकडे पाहातांना शोभनेच्या सहवासांतील स्वतःचा सौख्यमय काल विजयाला आठवला. तें दृश्यही मागें टाकलें गाडीनें. या त्याच्या मानसलहरीनेंच जें शोभनेचें चित्र त्याचेसमोर धरिलें त्यांत शोभनेच्या मुद्रेवर अधीरतेची छटा होती! विषण्णतेची काळसर सांवली पसरली होती. ती हंसली तेव्हां तिच्या गालावर नित्याच्या गोड

खळगारी त्याला दिसल्या. ही तिची उद्विग्नता आपल्या विरहामुळेंच उद्भवली असेल का ? ती आपल्याला विसरली नसेल ना ? तिच्या ठायीं वसत असलेल्या आपल्या एकनिष्ठ प्रेमाविषयीं तिचा विश्वास उडाला नसेल ना ? परत भेटताच ती आपले खुल्या अंतःकरणानें स्वागत करील ना ? असे बरेच प्रश्न त्याच्यापुढें उभे राहिले.

गाडी नेरळ स्थानकांत शिरली.

फलाटावरील मनुष्यें झराझर मागें सरकत होतीं.

स्थानकावरील एक हमाल त्यानें पाहिला. एक युरोपियन आपल्या हातांतील कुत्र्याची साखळी ओढीत आपल्या लठ्ठ बायकोशीं बोलत होता. तोही त्याला दिसला न् मग जी एक तरुणी गाडीच्या गतीमुळें विरुद्ध दिशेला सरकली तिला पाहून तर तो चपापलाच !

कोण होती ती ?

शोभना !

सकाळचें विकासपूरचें तें भयंकर वृत्त समजल्यापासून विजयाची नि आपली भेट आतां तुरुंगाच्याच दारांत होणार याबद्दल शोभनेला मुळींच शंका वाटत नव्हती. आतां उद्विग्नतेचा भर ओसरल्यावर नेरळच्या घरांतील सामानाची व्यवस्था नीट लावून परत आपल्या कॉलेजच्या अभ्यासाकरितां ती पुण्याला जावयास निघणार होती. वर्तमानपत्रें दररोज आस्थेनें वाचण्याचा क्रमच होता तिचा; तरी विजयाच्या विरहकालात तही वाचण्याचें तिने सोडलें होतें. परन्तु आतां सायंकाळच्या गाडीला पुण्याला जाण्याकरितां म्हणून ती नेरळ स्थानकावर आली त्या वेळेस विजयाला कल्याण येथें दिसला तोच फलक वाचून तिला धक्का बसला. तिनें तें वृत्त वाचलें नि त्यावरून विजयाची नि आपली पुनर्भेट कोणत्या ठिकाणीं होणार, याचा अंदाज, अजयाची हकीकत माहीत असूनही वरीलप्रमाणें केला. याकरितांच विजयांनीं आपणाला टाळलें नाहीं ना ? असा तिला प्रश्न पडला. तिच्या मनाच्या या अवस्था कां होईना, पण निश्चितीच्या समजुतीमुळें विजयाला तुरुंगाच्या दारांत पहाण्याऐवजीं आगगाडीचे दारांतच उभा पाहून तिला विस्मय वाटला.

गाडी थांबतांच विजय शोभनेकडे मागें फलाटावर धांवतच गेला.

त्याला पहातांच त्याच्याबरोबर जाण्याच्या तयारीनें तिनें आपल्या बॅगला हात घातला. तेव्हां आपणच तिची बॅग घेऊन विजय म्हणाला.

" तुझे हात या कामाकरितां नाहीं आहेत ! "

त्याची ती बलगी पाहून आनंद नि आश्चर्य यांचा मिश्र प्रवाह शोभनेचे मनांत उद्भवला. " अजूनही यांची मजबद्दलची प्रीति कायम आहे हं ! कां हें सर्व तोंडदेखल्या नि दिखाऊ आहे ! " क्षणांत तिच्या पुढून हा विचार गेला.

" विजय ? " जातां जातां ती म्हणाली.

" होय मीच ! "

" म्हणजे ? "

" चल, सांगतों मग तुला सर्व; मी पलीकडील डब्यांत बसलों आहे. " त्याच्या म्हणण्याला कांहींच उत्तर न देतां ती मूकपणें तिकडे गेली.

गाडी चालू झाली.

विजय नि शोभना याच्या आयुष्यांतल्या प्रेमप्रवासांतील खंड संपला.

शोभनेचें जें चित्र त्यानें बरा वेळापूर्वींच अजमावलें होतें. तशीच ती त्याला दिसली. शोभनेलाही विजयामध्यें किंचित् फरक दिसला.

त्याच्या कपाळावर मुंबईच्या अपघातांतील दुखापतींची खूण स्पष्टपणें दिसत होती. त्याचे केस पूर्वीप्रमाणेंच मऊ असेच होते. त्याच्या तोंडावर एक सूक्ष्म अवकळा आल्याचें वाटलें तिला. त्याची चालण्याची पद्धतही रुबाबदारच होती पहिल्याप्रमाणें. विजयाच्या आवाजांत अधिक मार्दव असल्याची तिची शंकाही बरोबर होती अन् तो थोडासा कृश झाला असल्याचेंही तिला दिसलें.

" आत्ता गांठ पडली शेवटीं. किती विचित्र आहे देव ! " तो म्हणाला.

" तुमच्याइतकं तरी खास नाहीं ! मुंबईला तुम्ही कां गेलांत, माहीत आहे मला ! "

" तुला मीं सांगितलंच होतं कीं ! "

"हं! तेंच रामभाऊंनीं नीट सांगितलं परत मला! माझ्यापेक्षां राई अधिक वाटली ना तुम्हांला!" अंतःकरणांतील सर्व उद्वेग शोभना बाहेर टाकीत होती. "यापुढं तुमचं तोंड पहायचं नाहीं, असं ठरवलं होतं मीं." तें तिचें बोलणें ऐकून बाजूलाच बसलेली राई दचकली.

"होतं! म्हणजे आतां नाहीं?" विजयनेंच प्रश्न केला तिला.

"नाहीं कस? तुम्ही येवढं तोंड देखलं कां होईना, पण पुढं आलांत म्हणून इकडे येणंच भाग होतं मला! नाहीं तर—"

ती काय बोलते आहे याचा अधुक अदाज आला विजयाला. स्त्रीसुलभ मत्सर होता तो! अन् त्याला कोणीं जन्म दिला हेंही त्यानें ताडलें. मग शांतपणें तो म्हणाला,

"तुला तरी माझ्यापेक्षां रामभाऊच विश्वासाचे वाटतात नाहीं का? काय सांगितलं माझ्याविषयीं त्यांनीं तुला! राईचं नांव काढतांच माझी उत्सुकता लागलीच मुंबईला जाण्याची होती, गणूचं वृत्त कळतांच तोच आमच्या गांवचा गणू का, अशीं वृत्तसाम्यामुळें मला शंका आली हेंच कीं नाहीं! माझ्या इनामगांवच्या चळवळीनें मूर्खपणें कुळं त्यांचेकडे राबत नाहींत म्हणून ते चरफडत आहेत माझ्यावर. परंतु सत्याला मरण नसत!"

'माझा तेवढा विश्वास नाहीं बसत!"

"नाहीं बसत? राइचीच साक्ष देऊं तुला? आणूं तिला इथें?" राई-कडे वळून तो म्हणाला, "सांग राई! सर्व खरी हकीकत सांग हिला."

विजयाच्या जवळ बसलेली बाइच राई हें पाहून शोभनेलाही कसेंसेंच वाटलें. तिच्या पावित्र्याबद्दल आपण शंका घेत होतों अन् तीही त्या स्वार्थी मनुष्याच्या सांगण्यावरून नि त्यानें दाखविलेल्या बाह्यतः सुसंगत वाटणाऱ्या गोष्टीवरून, याचें तिला वैषम्य वाटलें. मुंबईला एका बहिणीची अब्रू वांचविण्याकरितां विजय त्वरेनें गेला होता, असभ्य चाळ्यांकरितां नाहीं इत्यादी सर्व वृत्तांत राईनें तिला पटवून दिला. त्या सर्व सत्यकथनावरून आपली नि विजयाची कां चुकामूक झाली, काका कलकत्त्यास कसे गेले,

नेरळचें आपलें घर रिकामें कसें झालें इत्यादी वर्तमान विजयाला सांगून त्याला शोभना म्हणाली,

" क्षमा करा विजय ! माझीच चूक होती ! "

" तुमी नाहीं ती ! माझ्या दैवाची ! रामभाऊंनाही मी दोष देत नाहीं. पण अशाच घटना घडून आल्या कीं ज्या त्याचे म्हणण्याला दुजोरा देत होत्या ! "

असे म्हणून " जाऊ दे ! त्याचं वाईट वाटून घेऊं नको ! " असें म्हणून विजयाने तिचे समाधानही केलें.

" हें काय गौडबगाल विकासपूरचं ? शोभनेने पुढें पृच्छा केली.

" त्या दिवशीं मीं दोन फोटो दाखविले ना ? अजयाची शंका आहे मला ? "

" असं ? असेलही ! "

" त्याचा संबंध असावा असं आपलं मला वाटतं; " असें म्हणून विजयानें नन्तर विचारलें, " कुठें उतरायचं म्हणतेस ? "

" केव्हां ? विकासपूरला गेल्यावर होय ? "

" हं. "

" आपट्यांकडे उतरणार होतें मी ! त्यांनीं बोलावलच होतं मला नाहीं तरी एकदा ! "

" अच्छा ! बरं, पण नाना नाहींसे झाले म्हणालीस ना तूं ? "

" हं ! "

" त्यांचा कांहीं पत्ता ? "

" छे बाई ! ते गेल्यावर काकांनाही कलकत्त्यास जाणं अवश्यच असल्या-मुळें मी आत्याकडे रहायला गेलें. तुमच्याविषयीं माझं प्रेम कायमच होतं विजय ! मग मन कांहींही सांगे ना का ! दररोज दिवस उजाडावा नि मावळावा असे हे दिवस गेले. कालमानाप्रमाणें दुःखही कमी होतं म्हणतात ना ? पण माझ्या बाबतींत तर उलट झालं ! कसा तरी अभ्यास सुरू करणार होतें मी ! "

" नेरळला नव्हतीसच तूं म्हणजे ? "

" छे ! तुमच तें पत्र आज मला मिळालं. मी नेरळ सोडल्यावर येऊन पडलं होतं ! "

" हेंच पत्र माझ्या म्हणण्याची साक्ष देईल कीं ! त्यावरील तारीख फार जुनी आहे. "

" पुरे झालं ! पुन्हा तसं म्हणाल तर वाईट वाटेल मला ! "

" अस्स होय ? " विजय हांसला अन् शोभनेनेंही त्याचेंच अनुकरण केलें.

## प्रकरण २० वें बंधमुक्त क्रांतिकारक

अजयाला अटक करण्याच वेळीं त्याच्या खोलीचीही झडती घेऊन, त्या कागदपत्रांचा अजयाचे विरुद्ध पुरावा म्हणून उपयोग करून घेण्याचा पोलिसांचा विचार होता. त्याप्रमाणें झडतींत त्यांना थोडे कागद सांपडलेही. काय काय घडतें तें तें पहाण्याशिवाय आपल्या हातांत आतां काय आहे, अशा विचारांत अजय होता. त्याच्या अटकेची बातमी शकुन्तलेस कळली, त्या वेळेस ती तात्यासाहेबांशीं गप्पा मारीत होती. ती तात्यासाहेबांना म्हणाली—" तात्या, काय भयंकर बातमी आहे, माहीत आहे का ? "

" कसली ? ग्लीसन्च्या खुनाची ? "

" अहं ! त्यांत भयंकर असं कांहींच नाहीं ! अन् ती संभाव्यच गोष्ट होती इतकीं वर्षं ! "

" मग दुसरी कोणती ? "

" अजयांना अटक झाली आहे वरील प्रकरणांत ! "

" काय म्हणते आहेस ? मला नेहमीं वाटतच होतं ! अजय फार चळवळे आहेत ! स्वस्थ बसणं त्यांच्या अंगीं नाहींच ! मला वाटे, हा मुलगा असा भावनेच्या आहारीं जाऊन उठायचा अन् कांहींतरी अत्याचार करायलाही तयार व्हायचा ! खरंच ठरलं ते ! " आणि नंतर शकुन्तलेच्या तोंडाकडे पहात तात्यासाहेब म्हणाले,

" शकू, त्यात घाबरण्यासारखं काय आहे इतकं ? मी आहे ना ? अजयासारखे कितीजण तरी मी सोडवून आणले आहेत ! "

" त्यांतच अजयांची गणना करतां होय तुम्ही ? "

" छे ! त्यांचेवरील हा आरोप खरा ठरला तरी उदात्त हेतूचाच आहे तो. पण इंग्रजी न्यायालयांत स्वार्थाकरितां गुन्हा केलेले अन् वरील हेतूनें गुन्हा करणारे, आरोपी म्हणून एकाच वागणुकीनें अन् न्यायानें वागविले जातात ! मी माझी शर्थ करून त्यांची सुटका करीन, कांहीं आरोप त्यांच्यावर लादला गेलाच तर !"

त्यांचें तें आश्वासन फाजील आत्मविश्वासाचें होतें, असा जर तुमचा समज असेल तर तो चुकीचा आहे. विकासपूरच्या प्रांतांत तात्यासाहेब म्हणजे आपल्या सुटकेची निम्मी हमीच वाटत असे आरोपींना ! कोणताही अभियोग उभा राहिला कीं पोलिस अधिकारी बेजार व्हावयाचे त्यांच्या उलटतपासणींत उत्तरें देतांना ! त्यांचा तो पाढरा फेटा, सुरवार तंग, काळ्या फ्रेमचा चष्मा अन् गंभीर आवाज यांमुळें त्यांची न्यायालयांतील उपस्थिति उठून दिसत असे. दोन दोन दिवस अभियोगाच्या पुराव्याचा नुसता विचारच करीत ते कांहीं प्रसगीं; सर्व पुरावा नीट पाहून, त्यांची चौकसबुद्धि सूक्ष्मपणें फिरू लागे. उलटतपासणींत साक्षीदाराच्या पोटांत शिरून त्याला सांगायच्या नसलेल्या गोष्टी न्यायाधीशाला आपल्या टिपणां-मध्यें उतरण्यास कशा भाग पाडाव्यें तें तात्यासाहेबांनाच माहीत ! त्यांचें तक्रारीच्या वेळचें भाषण ऐकण्यास ही गर्दी जमे गुंतागुंतीच्या अभियोगाच्या वेळीं ! त्यांच्या भाषणांत बिनतोड युक्तिवाद जसा येई तसाच वक्तृत्वाच्या मनोवेधक प्रवाहाचा प्रभावी खर्च असे. त्यांच्या निर्बंध पांडित्याबद्दल म्हणाल तर मोठमोठ्या अभियोगांतील त्यांनीं मिळविलेल्या विजयाचीं अजिंक्यपत्रं त्या त्या न्यायाधीशाच्या निकालपत्रांतील त्यांच्या स्तुतिपर उतारेच दाखवूं शकले असते.

दुसरे दिवशीं वकील न देण्याचा अजयाचा विचार ऐकून शकुन्तला त्याला म्हणाली, " अजय ! मी वेळोवेळीं जाणीव करून देऊनही तुम्ही हें कृत्य केलत अन् आतां हताशपणें तुमच्या सुटकेच्या माझ्या प्रयत्नांच्याही आड येता आहां ! "

" प्रयत्न ! " अजयानें उत्तर केलं, " मीं केलं तें पूर्ण विचारानेंच केलं

आहे—अन् त्याचं प्रायश्चित्तही भोगायला मला मुळींच दुःख वाटत नाहीं! हुतात्मा मुक्ततेकरितां धडपडत नाहींत!"

"हुतात्मा? हो! चाफेकर, कान्हेरे, भगतसिंग! हे सर्व हुतात्मेच होते. अन् ते छातीचे वीरही होत. परन्तु त्यांनीही कोर्टातील कामात, इतरांच्या त्यांच्या सुटकेच्या प्रयत्नांत, मुद्दाम अडथळा केला नाहीं!"

"खरं आहे तुझं म्हणणं! पण, भेकडाप्रमाणे मी सुटकेकरितां धडपड करणं शक्य नाहीं!"

"अजय! तुम्हालाच कां सांगायला लागतं आहे मला? अहो, यात भेकडपणा कुठला आला आहे? हें राजकारण आहे; राजकारणात नीति असते पण ती सापेक्ष! तुम्ही आतां सुटलांत तर यानन्तर कितीतरी मोलाचं देशकार्य करतां येईल तुम्हांला! अन् या सर्व विचारांनेंही तुमचं मन वळत नसेल तर मी, तुमची शकुन्तला, तुम्हांला सांगते आहे, कीं तुम्हीं माझ्या मताप्रमाणें केलंच पाहिजे! स्वार्थीपणानें तुमचा वियोग टाळण्याकरितां नव्हे; कारण याहीपेक्षां उज्ज्वल त्याग केला आहे प्रेमदेवतांनीं, त्यांचे प्रियकर राष्ट्रकार्यांत पडले असतांना! पण, तुम्ही जर ही अल्पशी मागणीही मान्य केली नाहींत, तर तुम्ही निष्ठुर आहांत असं मात्र जन्मभर मी म्हणत राहीन!"

"अन् हेंच नेमकं नको आहे मला शकू! वाटेल तें झाल तरी याविषयींची मनाची प्रेमळता मी सोडणार नाहीं! तुझं म्हणणं मान्य आहे मला; उद्यांच तात्यासाहेबांच्या वकीलपत्रावर सही करीन मी! मग तर झाल?" अजयानें मान्यता दिली.

दुसरे दिवशीं अजयावरील अभियोगाचें काम पहाण्यास श्रोतृसमुदाय, वकील मंडळी अन् विकासपुरांतील देशभक्त लोक यांची अलोट गर्दी जमली होती न्यायालयांत. तें नुसतें प्रफुल्ल झालें होतें माणसांनीं!

विजय नि शोभनाही विकासपूरला आपट्यांकडेच उतरलीं होतीं.

विजयाचा अजयाशीं अलसा फरक होता शरीरसाम्यांत. अलसा म्हणजे त्याच्या कपाळावर गेल्या मुंबईच्या जखमेची एक खूण होती अन्

त्याची चालण्याची पद्धतही अजयाच्या पद्धतीपेक्षां पुष्कळशी भिन्न होती. यामुळेंच अजयाच्या संबंधीं विजयाला शकुन्तलेनें कांहीं प्रश्न केले नाहींत प्रथम.

"ह्यांचं नाव विजय पटवर्धन !" कोर्टांत जाण्यापूर्वी शोभना विजयाची ओळख करून देत होती शकुन्तलेला.

"कल्याणजवळ इनामगांवला यांचं घर आहे. तिकडचे हे एक ग्राम-प्रचाराचे प्रमुख कार्यकर्ते आहेत. आमच्या कॉलेजांतील यांची लोकप्रियता पुष्कळाच तो तुम्हीं फोटो पाहिलांत, त्या वेळेलाच मीं सांगितली. फार चांगले कार्यकर्ते आहेत हे बरं का ?"

"तें दिसतंच आहे !" शकुन्तला म्हणाली.

"कशावरून ?"

"तुमचे ते मित्र आहेत ना ?" विजयाकडे सहास्य मुखानें पहात शकुन्तलेनें मान हलवली.

"अन् ह्या ?" शकुन्तलेकडे प्रथम पाहून ती विजयाला सांगत होती.

"शकुन्तलाबाई आपटे. विकासपुरचे सुप्रसिद्ध वकील तात्यासाहेब आपटे यांच्या कन्यका नि स्त्रियांच्या उन्नतीच्या कार्यकारी पुरस्कर्त्या !"

"नमस्कार" विजयानें शकुन्तलेला ओळखीची पहिली सलामी दिली. त्याचा शकुन्तलेने स्वीकारही केला. ती सर्व जेव्हां न्यायालयांत पोंचलीं तेव्हां तात्यासाहेब साक्षीदाराला उलट तपासत होते.

अजयच्याच संस्थेंतील कांहीं दिवसांपूर्वी भांडून निघालेला एक तरुण होता. साक्षीदारच्या पिंजऱ्यांत त्याच्यावर काय प्रयोग केला पोलीसांनीं कुणास ठाऊक ! किंवा अजयाचा द्वेषच त्याला त्याच्या उलट साक्ष देण्यास उद्युक्त करण्यास कारणीभूत झाला असेल.

आरोपीच्या पिंजऱ्याकडे पहात तात्यासाहेबांनीं विचारलें, —

"अजय पटवर्धनांना तुम्ही ओळखतां ?

साक्षीदार— "होय; चांगलेंच !"

"त्याची प्रवृत्ती क्रांतीकडे होती असं तुम्ही म्हणतां ना ?"

"होय."

" त्याचा या खुनाशी संबंध कसा येतो ? "

यावर तो साक्षीदार जरी कावराबावरा झाला तरी पण पिंजऱ्याच्या आपल्या पुढीलच कठड्यावर हात फिरवीत तो म्हणाला,

" कसा म्हणजे ? त्यांच्या चळवळी पहा ! त्यांची वर्षदिनाची हस्त-पत्रिका— "

" हूं ! मला अवान्तर गप्पा नको आहेत. " तात्यासाहेबांनीं दम भरला. तेव्हां साक्षीदार म्हणाला, " यांच्या मित्रमंडळींतही चर्चा बरेच दिवस चालू होती ! "

" हें कशावरून ? "

" वर्षदिनाच्या पत्रकाचा मसुदा, त्यांच्या मित्रानें अजयाला पाठविलेल्या त्या पत्रकाबरोबरील तें पत्र— "

" कोणतं ? हेंच ना ? " पुराव्यांतील एक कागद दाखवीत तात्या-साहेबांनीं विचारलें —

" हं ! तें वाचूनच माझा तर्क म्हणतो आहे तसं ! "

" हें घ्या अन् परत एकदां वाचा —" साक्षीदाराच्या हातांत पत्र देण्यांत आलें. त्यानें तें वाचल्यासारखें केलें न् एक वाक्य त्यानें पुन्हां मोठ्यानें वाचलें नि म्हटलें—

" व कांहींही करून कार्यक्रम नीट पार पाडा. हें महत्वाचं आहे. "

तो काय म्हणतो तें तात्यासाहेब पहात होते.

" यांतील ' आंखून ' मधील ' खून ' शब्द अभिप्रेत आहे वरील हल्ल्यांशीं. "

" असं ! " तात्यासाहेब छद्मीपणें उद्गारले.

प्रेक्षकांत हंशा चालू होता.

" अन् कार्यक्रम हा दुसरा शब्द; त्याचा अर्थ ' कट ' म्हणजे मग, ' कांहींही करून कार्यक्रम व खून नीट पाडा ' असा सरळ अर्थ होतो आहे याचा " — ( हंशा )

साक्षीदारानें लावलेल्या अजब शोधानें न्यायाधीशासह सर्वांची हंसतां हंसतां मुरकुंडी वळली. तिथेंच तात्यासाहेबांनीं उलट तपास संपविला त्याचा ! नंतर पट्टेवाल्याची साक्ष झाली.

"तुमचं नांव काय ?" तात्यासाहेबांनीं विचारलें.

"गणू भिलारे !" साक्षीदार म्हणाला नि त्यासरशी विजय दचकला. त्याच्या गांवच्या गणूचें नांवही तेंच होतें !

"तुम्ही ग्लीसन्‌साहेबांचा खून झाला तेव्हां मोटारींत होता ना !"

"होय !"

"काय हकीकत घडली ?"

त्यावर त्यानें सर्व वृत्त सांगितलें. तो समोरील एक पोलीस एक तोतया पोलीस होता. त्याचा उपयोग हल्ला करणाऱ्यानें गाडी थांबविण्याकरीतां केला होता असें त्याचें म्हणणें होतें.

"त्या वेळीं दोघे कोणीतरी पळाले असें तुम्ही म्हणतां !" तात्यासाहेबांनीं पुढें सुरुवात केली, "त्यांत हे होते ?" त्यांनीं अजयकडे बोट दाखविलें.

"छे ! छे !"

"त्यांना पाठमोरे पहा अन् सांगा, पळणारा इसम तसाच दिसत होता का ?"

"छे ! छे ! मुळींच नाहीं. हे कितीतरी उंच आहेत. अहो, यांना बरेच दिवस ओळखतों आहे मी; हे असते तिथें, तर मी यांना आत्तां लागलीच हुडकलं असतं !"

ज्याचें तोंड आपण जन्मांत पाहिलें नाहीं, तो एकदम आपल्या बाजूला वळला याचेंच अजय खरें म्हटलें असतां आश्चर्य करीत होता. पण त्यात आश्चर्य काय होतें ? विजयाला गणून पाच वर्षांपूर्वीपर्यंत पुष्कळदा पाहिलें होतें. अजयाची ती तशीच मुद्रा पाहून त्याला विजय समजूनच, त्याच्यावर आरोप येणें सहनही न झाल्यामुळें तो तसें म्हणत होता. जय पटवर्धन या नांवानें गणूलाही चांगलेंच फसविलें.

सर्वांत जास्त आश्चर्य पोलिसांना वाटलें. प्रथम प्रथम त्याची मुळींच सम्मति नसतां गणूला एवढें पढवूनही आयत्या वेळेला तो असा फिरलाच ही गोष्ट होतीही तशीच !

त्यानें तें वाक्य उच्चारतांना न्यायालयांत दृष्टी टाकली. विजय त्याला दिसला. एक सारखे एक, असे ते चेहरे पाहून गणूही चपापलाच; परन्तु मग आपली चुकी दिसूं नये म्हणून तोही तसाच स्वस्थ राहिला.

सरते शेवटीं पोलिस सुपरिंटेंडेंट साक्षीसाठीं आले.

त्याची तपासणी तात्यासाहेबांनीं इंग्रजींतच घेतली.

" You hastened immediately to the spot ?" (" तुम्हीं लागलीच तिकडे गेलांत ना ? ") तात्यासाहेबांनीं विचारलें.

"Yes !" (" हो !") पो. सु. उत्तरले.

" तुम्हांला तिथें एक कागद सांपडला ? "

" हं ! "

" हाच ना तो ? " एक मळका कागद त्यांच्या हातांत देत तात्यासाहेबांनीं विचारलें.

" होय. "

" वाचा पाहूं तो मजकूर ? "

पोलिस सुपरिंटेंडेंटनीं तो वाचला "Ajay Patwardhan; Kunjaniwas, Vikaspur !" (" अजय पटवर्धन; कुंजनिवास; विकासपूर ")

" कुठें सांपडला हा तुम्हांला ? याच्या स्थितिमध्यें तुम्हीं कांहीं फरक केला आहे ? "

" हल्ल्याच्या जवळच शेतांत सांपडला तो. मुळींच नाहीं. जसाचा तसा आहे तो ! "

" अजय त्या रात्रीं शेतांत आला होता हें म्हणण्याला तुमचा हाच पुरावा ना ? "

" हो ! " या प्रश्नांत तात्यासाहेबांचा कांहीं स्वार्थी मुद्दा नाहीं ना ? अशा संशयानें पोलिस सुपरिंटेंडेंट म्हणाले.

" तुम्ही असंही म्हणालांत, कीं तत्पूर्वी आरोपीला तिकडे फिरतांना कांहीं दिवस पाहिला होता त्या, हॉटेलच्या मालकांनीं ! "

" हं ! तसा जबाबच आहे त्यांचा ! "

वरील तऱ्हेच्या साक्षीपुराव्यानंतर तात्यासाहेबांनीं आपलें मुद्देसूद भाषण केलें; ते म्हणाले—' पट्टेवाला गणू ' जय पळालेल्या इसमांत असावे असं म्हणत नाहीं, एवढच नव्हे तर नसल्याचंही छातीठोकपणे सांगतो. तो पत्र्याचा कागद मळका आहे. हाताळून तो तसा झाला नाहीं हें पोलिस सुपरिंटेंडेंटच्या सांगण्यांत आलेलं आहे. उलट, तो प्रथमपासूनच मळका आहे म्हणजे हल्ल्याच्यानंतर दहा एक मिनिटांनींच त्यांना तो सांपडला, तेव्हांही तो तसाच होता असं ते म्हणतात. चिखलाचा कागद आपल्या खिशांत नि तोही नुसता पत्ता लिहिलेला इतक्याच महत्त्वाचा असता कोणी बाळगील कां ? जर त्याच रात्रीं अजयाच्याच खिशांतून तो पडला असता तर तो स्वच्छ, निदान चिखलांत मळलेला नको होता. परन्तु वरील सत्यस्थिति हेंच सिद्ध करते कीं, हल्ल्याच्या दिवसाचे अगोदर कांहीं वेळां अजय त्या ठिकाणीं जात असतां तो पडला असेलही. " पुराव्याचा सपशेल आपल्यातर्फे उपयोग करून घेत होते तात्यासाहेब ! ते म्हणाले—" याला दुसरीही बाजू आहे. ती म्हणजे नुसता तो पत्ता लिहिलेला कागद अजयाची उपस्थिति सिद्ध करणें ' शक्य असलं ' तरी असलंच पाहिजे असं नाहीं. कोणालाही आपला पत्ता त्यानें दिला असेल आठवणीकरितां अन् मग त्याच्या हातून तो तिथें पडला असेल. पण एवढं जरी सोडलं तरी पहिलं म्हणणंही त्याचेवरील तिथल्या उपस्थितीचा आरोप सिद्ध करीत नाहीं. अन् त्या पत्रांतील वृत्तांताची जी ' सुसंगति ' लावण्यांत आली आहे, ती तर औरच ! त्याच्या म्हणण्याप्रमाणें मग, ' तूं इथें माझेवर कुरघोडी चालविली आहेस ' याचा अर्थ " माझ्या ( अंगा ) वर तूं घोडी चालविली आहेस " असाही होऊं शकेल; तेव्हां तें म्हणणें, इतकं मूर्खपणाचं आहे, कीं त्यावर कांहींच न बोललं तरी चालण्यासारखं आहे. "

तात्यासाहेबांच्या भाषणाची चौकट वरीलप्रमाणें होती. त्याच्याच जोडीला,

त्यांचा वाक्प्रवाह, वेळोवेळचा उपहासगर्भ, निर्भयपांडित्य यांची जोड, मग काय पाहिजे—

अजयाच्या निर्दोषत्वाची सत्यता जोरानेंच प्रत्ययास येत होती! अल्पसा असा तो संशयित पुरावा अमान्य करून न्यायाधिशांनीं अजयास निर्दोषी ठरविलें.

विजयानें सांगितलेलें जुळया बंधुत्वाचें नातें अजयाला खोटें वाटणें शक्यच नव्हतें. कारण, त्यांच्यांतील विलक्षण साम्यच त्यांच्या नात्याच्या बाजुला उभें होतें! शिवाय एकमेकांची ताटातूट होणारी ती जागाही दोघांनींही बरोबर सांगितली. अजयाला सुरक्षितपणें वादविणाऱ्या आनंदस्वामींचीच अनुपस्थिति विजयाला थोडी असमाधानी करीत होती.

घरीं येण्यापूर्वी गणू पट्टेवाल्याजवळ जाऊन विजय म्हणाला,

"गणू!"

"हो! कोण विजयदादाच ना?"

"होय!"

"मग, मघाशीं कोण दुसरा तुमच्यावानीच दिसला तो दादा?" गणूनें विचारलें.

"माझाच भाऊ आहे तो, अजय त्याचं नांव!"

"अजय? अव ते तर गहाळ झाले व्हते ना?"

"हं, ते सांपडले आतां, अन् तुझी राईही!"

"काय म्हणतां? खरंच? चला, घेऊन चला मला तिच्याकडं; लई अपराध केला म्यां तिचा! तिची क्षमा मागतो अन् परत इनामगावालाच येतों आनंदांत! बरं झालं, आयता साहेब बी मेलाया; मी सुटाच आहे नाहीं तरी आतां!"

आधाशीपणानं गणूनें आपली मानसिक तळमळ व्यक्त केली.

गणूला वाटणाऱ्या त्या खुनाच्या फायद्याचें हसूंच आलें विजयाला!

"तूं नेरळला होतास ना?"

"हो. नाना गेले अन् मी अकडं साहेबकडे आलो!"

"शुभाताईची अन् माझी ओळख आहे. तिने तूं नेरळला होतास तें सांगितलं मला! तुला राईबद्दल वाईट वाटत होतें तेंहि मला कळलं तिच्याकडून!"

"असं कां? म्हणजे शुभाताई न् तुम्ही—" असें म्हणून गणू किंचित् स्तब्ध राहिला. त्याच्या मनांतील विचार विजयानें ओळखले, "वा छान! चांगलं होय! चांगलं!" तो म्हणाला आणि हसूं लागला.

"काय चांगलं आहे रे?" हंसत विजयानें त्याला विचारलें.

"कांहीं नाहीं! विजयदादा कांहीं नाहीं!" आपणांस जें काय म्हणायचें तें विजयाला समजावें अशा आनंदानें गणू उत्तरला.

दुसरे दिवशीं सकाळीं रमाकांताचें पत्र विजयाला मिळालें. त्यानें लिहिलें होतें—आपलं पत्र नि त्यांतील मजकूर विस्मयजनक खराच! पण आणखी एक वृत्त मी देत आहे तेंही तसंच आहे.

"मी टाण्याचे मेंटल हॉस्पिटलमध्य डॉ. आल्मेडा यांना भेटून परत जाणार, तोंच डाव्या हाताच्या दालनांत एक दुर्दैवी गृहस्थ पाहिले. परवांच वर्तमानपत्र वाचीत असतांना, 'जय' हे नाव वांचतांच त्यांनीं पटापट "शुभा ऽ ऽ, सुधी ऽ ऽ ऽ र अशा आरोळया मारण्यास सुरुवात केली. चवकशी अंतीं दोन अडीच महिन्यापूर्वीं मध्यरात्रीं एका आगगाडींत हे गृहस्थ पोलिसांना एका लोकलमध्यें आढळले नि त्यांनींच त्याना येथें पोंचविलें असं कळतं! साइडिंगला गेलेल्या गाडींतून त्याना वेडे म्हणून, इतर माहिती मिळाली नाहीं तेव्हां, इथं आणण्यांत आलं! तेव्हां आपल्या पत्रांतले नाना तर हे नाहींत ना? असा संशय येतो मला......"

पत्र वाचून झाल्यावर विजय म्हणाला— "नानाच असतील हे!"

"मलाही तसंच वाटतं!" शोभना म्हणाली!

प्रकरण २१ वें

# संमीलन

विकासपूरला नंतर लवकरच भरलेल्या युवकसमूहाच्या त्या सभेत अजया-सारख्या लोकप्रिय नायकाच्या पुनर्लाभाचा आनंद व्यक्तविण्यात औचित्याप्रमाणेच, त्या समूहाची भक्तिही होती. त्यांच्या हृदयाच्या अभूतपूर्व उत्साहानें अजयालाही अद्वितीय आनंद होत होता. त्याला पुष्पहार अर्पण करण्यात आला त्या वेळीं तो म्हणाला, " आजचा प्रसंग इतका भावनापूर्ण आहे कीं, मी फार बोलूं शकणार नाहीं. थोड्या गोष्टींचा उल्लेख—कीं ज्या यानन्तर आपल्या संस्थेनें आचरणांत आणायच्या आहेत त्या–करण्याचं मीं ठरविलं आहे. तुम्ही माझ्या गळ्यांत हे हार घातलेत त्याचा आनंद नाहीं मला इतका ! परन्तु तुमची वृत्ति पाहून मात्र समाधान वाटतं मला ! सांप्रदायिकपणाच्या आहारीं न जातां, वरील हल्लय.सारख्या प्रसंगाकडे आपण कोणत्या दृष्टीने पहाता तें समजल ! ही एक कसोटीच आहे, आपल्या वृत्तीची ! हा ' निंद्य प्रकार ' सोडला, तरी यापासूनचा बोध विसरू नका ! यातनांच्या सीमेची, परिणति सूडांत होते ! अन् सूड, अन्यायाची चीड येणाराच घेऊ शकतो ! ही अन्यायविरुद्ध हात उचलण्याची वृत्ति केव्हांहि राष्ट्राच्या जीवंतपणाचें द्योतक आहे ! इंग्रजांनीं आम्हांला जिंकल त्याचं इतकं दुःख नाहीं ! कारण जो पराभव पावण्यास कां होईना, पण लढत रहातो, तो दुसऱ्या वेळेस अजिंक्यही ठरतो ! राज्यकर्त्यांनीं आमची शस्त्रं घेतली याचंही इतकं वाईट वाटत नाहीं मला ! पण शस्त्र वागविण्याची इच्छा मारण्याचा उपद्व्याप करणाऱ्या वावदुकांची मात्र कींव येते मला ! शस्त्रावांचून स्वातंत्र्य मिळालं तर नको आहे कोणाला ? परन्तु इतिहास सांगतो, कीं त्या बळाशिवाय स्वातंत्र्याची प्राप्ती नाहीं ! अन् लढाऊ वृत्ती-

शिवाय शस्त्रबळ संभवतच नाहीं ! तेव्हां ती वृत्ति आपल्या राष्ट्रांत कशी वाढीस लागेल, याचा विचार करा ! तरुणांवर तर हा विशेष भार आहे. कारण, राष्ट्राचं चैतन्य प्रामुख्यानें तरुणांच्या उत्साहावर अवलंबून आहे हें विसरू नका ! आम्हांला अत्याचार थोडासुद्धां नको आहे. पण, त्याच वळेस आम्ही अशीही दक्षता घेऊ कीं, आम्हीही अत्याचाराला बळी पडणार नाहीं ! या विस्तीर्ण राष्ट्रांत ठिकठिकाणीं चैतन्य संचरवा अन् लढाऊ वृत्तीला ऐक्याची आवश्यकता आहे हें विसरू नका. विरोधापेक्षा ऐक्यावर भर द्या, हाच माझा आदेश आहे. आपण मजवर जं प्रेम व्यक्त केलत, त्याविषयीं मी आपला आभारी आहे ! "

मात्र अजयाचें वरील विवेचन मान्य असूनही आता संध्याकाळीं एका प्रासादाच्या तळमजल्यावर एका बाजूच्या खोलींत बसलेल्या विजयाला नि शोभनेला तें माहीत नव्हतें.

आरामखुर्चीवर विजय पडला होता त्या खुर्चीच्याच हातावर डाव्या बाजूला शोभना बसली होती. तिचा डावा पाय जमिनीला आधारलेला होता अन् दुसरा पाय हवेंत अधांतरीं तरंगता टेविला होता तिनें ! डाव्या हातानें खुर्चीच्या हातावर तिने जोर घेतला होता. त्या ताठ हाताच्या उघड्या दंडावरील ताणही स्पष्ट दिसत होता. त्याच्या गप्पा चालू होत्या तरी शोभना मात्र मधून मधून उजव्या हातानें विजयाच्या केंसाशीं खेळत होती.

" किती विचित्र घटना ही ? " विजय म्हणाला.

" विचित्र ! कसे दिवस काढले मीं आत्याकडे माझं मलाच माहीत. तुमच्या वियोगानें रोज माझं मस्तक भणाणून जाई ! परत मला वाटे, तुम्हीं मला भेटायच टाळावत कां ? त्या सर्व प्रश्नांचं उत्तर न मिळाल्या-मुळें वैतागून मी एकदां पाण्यावरही गेलें होतें. पण पाणी पाहिलं अन् परत फिरलें. म्हटलं नको. अजून थोडी वाट पाहूं ! आत्महत्या हा भेकडांचा मार्ग आहे ! "

" ती पाण्यावर जाण्याची वेळ आज येणार आहे. " विजय उद्गारला. त्याचा मतितार्थ कांहींच कळेना शोभनेला.

" संध्याकाळीं पोहायला जायचा विचार आहे माझा ! " विजय म्हणाला.

" सांगू का सर्वांना ! पहायला मिळेल तुमचं कौशल्य !

" अं ! "

" कां ! "

" तू अन् मीं ! दोघच जायचं आहे. "

सायंकाळीं, विकासपूरच्या शहराचे उत्तरेस जो एक पोहण्याचा तलाव होता त्यावर जवळच्या वृक्षांच्या छाया पसरल्या होत्या ! जणू, तलावांतील एका सुंदर मुलीला प्रेमभरानें आलिंगन देण्याकरितां उत्सुक अशा सखी-जनांप्रमाणेंच त्या मुलीच्या अंगाला त्या स्पर्श करीत होत्या. किंचित् नीळसर जलसंचयाचा तो तलाव अस्तायमान सूर्याच्या तेजामध्यें चंचल तेजाची प्रभा सभोंवार फेंकीत होता. पाण्याच्या गारव्यालाही मधूनच एकाद्या जोराच्या झुळुकेसरशी अधिक तीव्रता येत होती. तलावांत हेतुतः सोडलेले चित्रविचित्र मासे मधूनच चमकून जात. त्या वेळेस नावेच्या मागील दर्शिकेप्रमाणं पाण्याचा तरंग बराच वेळ मागें राही.

मंद वाऱ्याच्या त्या रोमांचकारक लहरींत तलावाच्या कांठावरच शोभना पाण्यांत पाय सोडून बसली होती. तिच्यासमोरच पाण्यात आपल्या दोन्हीं हातांनीं दोहोंव जूचें पाणी हालवीत विजय उभा होता. पाण्याच्या सूक्ष्म लाटेची उसळी नि सूर्यकिरण यांचा संगम होई व कांही वेळां तो कवडसा शोभनेच्या चर्येवर पडत असे. दिपलेल्या नेत्रांनीं थोडी मान वेळावून ती पाही अन् तो प्रकाश गेल्यावर परत पहिल्याप्रमाणें बोलावयास लागे तिच्या प्रियकराशीं. त्या तिच्या वेळोवेळच्या मुरडीचें विजय मनांत कौतुक करीत होता. आपल्या प्रेमदेवतेच्या अर्धनग्न शरीराकडे तो टक लावून पाही. तिच्या भरीव पोटऱ्याकडे त्याचं लक्ष गेलं. तिच्या अर्धवट ओल्या जलवेष्टित पदकमलांचें निरीक्षण त्यानें केलें. आणि आपल्या हातानें एक पाण्याचा फवाराही तिच्या अंगावर त्यानें उडविला. ती मात्र जरा तोंड फिरवून परत पहिल्याप्रमाणेंच पाण्यावर पाय आपटीत राहिली.

बद् बद् आवाज होत होता त्यामुळें !

त्यांच्यांतील प्रश्नोत्तरांची नोंद घेण्यास एकादा वृद्ध गृहस्थ नजीकच नव्हता म्हणून बरें झालें; नाहीं तर त्यांच्या त्या प्रीतिचेष्टा पाहून त्याच्या स्वतःच्या आयुष्यांतील तसल्याच प्रसंगांची (अर्थात् असल्यास!) त्याला आठवण झाली असती! त्या प्रेमपूर्ण तरुण युगलाच्या आपापसांतील कोट्या नू हास्य ऐकून त्यानें म्हटलें असतें, "काय आनंदांत आहेत हीं मुलें! आयुष्याच्या अमोलिक आनंदक्षणांपैकीं प्रेमभराचा क्षण हाही एक आहे!" नि कदाचित् त्यांच्या यौवनसाध्य आनंदाचा हेवाही वाटला असता त्याला! आतां त्यांना त्यानें फाजील सलगीचे प्रसंगही म्हटलें असतें किंवा पाणचट-पणाचे चाळे म्हणूनही त्यांचें वर्णन केलें असतें, परन्तु मनांत मात्र कांहींतरी अनुपम असें वाटलें असतें त्याला! फार काय? ईश्वरानें जर तसें त्याला विचारलें असतें, तर मोठ्या खुषीनें आपल्या आल्हादायक तारुण्याचा पुन्हा स्वीकारही केला असतां त्यानें!

"हं चल लवकर आटप ! आंत ये."

तोंडांत घेतलेल्या पाण्याचा चूळ लांब उडवीत विजय म्हणाला शोभनेला; आपला स्वैर केशभार त्यानें मागें सारला. अन् पाण्याच्या पृष्ठभागावर हात मारीत तो शोभना बसली होती त्या काठावर आला.

त्याच्या त्या याचनेवरही शोभना जेव्हां ऐकेना नि तशीच त्याच्याकडे पहात बसली तेव्हां विजय हात मारीत झपाट्यानें तीरासारखा कांठाकडे सरकला; तोंड फिरवून मागें पळून जात असलेल्या शोभनेचें डावें मनगट त्यानें धरलें. आपली शक्ति एकवटून तलावाचे विरुद्ध दिशेला जाण्याची ती खटपट करीत होती. विजयाच्या हातांत असलेलें आपलें मनगट सोडविण्या-करितां तिनें उजव्या हातानें त्याचीं बोटें सोडविण्याचा प्रयत्न केला. त्यासरशीं तोही तिचा हात विजयानें पकडला. दोन्ही पायांनीं मागें ओढ घेत होती ती! अन् तोंडावर नकाराची छटा पसरली होती तिच्या, परन्तु तिला तसेंच ओढून खसकन् पाण्यांत पाडलें विजयानें. अगदीं असाच आवाज झाला होता त्या दिवशीं, शोभनेच्या नेरळच्या स्वप्नांत! तो तिला आठवला.

माञ त्या दोहों आवाजानन्तरच्या तिच्या स्थितींत बराच फरक होता. त्या वेळेस ती एकटीच बिछान्यावर तळमळत पडली होती नि आतां विजयाच्या दणकट हातावर ती होती अन् सूक्ष्म बलवीचींनीं तिची पाठ हुळहुळत होती. प्रेमातुरता न् भय याची चिन्ता त्या वेळेला तिच्या मनःपटलावर आपलें प्राधान्य लादत होती न् आता प्रेमसफलता अन् समाधान यांनीं तिचें मन पूर्णपणें भारून टाकलें होतें! तिच्या प्रत्येक कृतींत निराशा वास्तव्य करीत होती त्या वेळेस, परन्तु तिची वाणी न् प्रत्येक कृति आता या वेळेस प्रेमोन्मादानें भरली होती! त्या वेळेस विजयाबद्दलचे विचार तिला नीट झोंपही येऊं देत नव्हते तर विजयाच्या हव्याशा वाटणाऱ्या सहवासांत आतां या वेळीं एक अर्धवट ग्लानि आली होती तिला. त्या वेळेस तिचें निरुपद्रवी मन चिंतिताच्या भरारीवर फार लाब लांब फेऱ्या मारून येत होतें, तर आनंदाशिवाय कसलीच भावना तिच्या मनांत नव्हती आतां! विजयाच्या स्पर्शसुखानें अवर्णनीय सुखाचे रोमांच तिच्या अंगावर उठले. पराकाष्ठेच्या गाढ आनंदोर्मी तिच्या सर्व कायेभर धावत होत्या. मानसिक समाधानाची अंतिम मर्यादा गाटत होती ती!

विजयाच्या हातावर पडल्या पडल्याच तिच्या मनांत विचार आला—"मी किती भाग्यवान्! प्रथमदर्शनींच प्रेमाचा अनुभव कित्येकांना असेल. परन्तु, त्याचं अक्षयत्व फारच थोड्या जणांच्या भाग्यात असतं! व्यक्तिमत्वाच्या अन् सुंदर पुरुषाच्या अंतःकरणाचा जिव्हाळा फार कमी लोकांना मिळत असेल, मग त्याच्या नुसत्या बाह्य प्रेमाचा अनुभव पुष्कळ जणांना लाभत असला तरी काय उपयोग? वर्तमानकाळात प्रेमदेवतेची पूजा बांधणारे पुष्कळ भेटतील, परन्तु विरहकालांतही व्यथित अंतःकरणानें तिच्याच चिंतनांत पुनर्भेटीची उत्सुकता अतीवतेनें असणारे माझ्या विजयांसारखे फारच थोडे! तोंडावर आपल्या प्रियेची तोंडी तारीफ करणारे पुष्कळ भेटतील, पण या धूसरशा जलपृष्ठावर आपल्या प्रीतिदेवतेस डौलानें हातावर फिरविणारे विजय—माझे विजय! खरोखरच असामान्य प्रेमाचा सांठाच आहेत ते!"

कांठाकांठानें उथळ पाण्यांत शोभनेला तशीच दोन्ही हातांवर तोलून धरीत, पाण्याच्या विलोल पृष्ठभागावर बरीच फिरविल्यानन्तर, तिच्या अर्धोन्मीलित नेत्रकमलांकडे विजयानें दृष्टि टाकली. सूर्यप्रकाशांत तिच्या त्या काळ्याभोर पापण्या थरथरत होत्या. केशपाश ओला झाला होता. तिच्या किलकिलीत नेत्रांमधूनही अदृश्य प्रेमगंगा ओसडत आहे, असा त्याला भास झाला ! शोभनेची रेखीव वक्र भुकुटींपाशीं थोडीशी चिंचोळी असलेली अरुंद नासिका अल्पसें निम्ननत बांक घेऊन जिव्हणीपाशीं अल्पांशानें रुंद झाली होती तो त्यानें निरीक्षिली; तिच्या नाकपुड्या जोराच्या श्वासोच्छ्वासानें फुगल्या थोड्याशा; अन् जलवेष्टित कर्णभूषणें दोलायमान पाण्यात जरा अस्पष्ट आकृत्या धारण करीत होती. या निरीक्षणाबरोबर तन्मय विचाराच्या हिंदोळ्यावरून क्षणभर तो थांबला. शोभनेनें आपले डोळे एकदां उघडले.

तिच्या भृगनील भरगच्च पापण्यांची हालचाल झाली !

पाण्यात खालीं सोडलेल्या एका ओल्या हातानें तिनें आपल्या मुखकमलावरून हात फिरविला. सुकुमार नि कोमल अशा तिच्या कायेला सायंकाळचे ते बोचट किरणही असह्य झाले जणू ! कारण त्यामुळें हस्तशीलतेनें मिळालेलें समाधान दर्शविण्याकरितां तिनें एक मनोरम स्मित केलें; आकर्षक रक्तछटा तिच्या मुद्रेवर पसरली ! त्या भरांत तिच्या त्या सौंदर्यानें भारावलेला विजय प्रेमानें शोभनेच्या हृदयाचा टाव घेणारे असे नेत्रकटाक्ष टाकीत खालीं वांकला.

"अ हं ऽऽ !" असें म्हणून त्याच्या गालावर उलट्या केलेल्या डाव्या तळव्याच्या मागील बाजूनें तिनें बोटांचा एक मृदु आघात करून, त्याचें तोंड शोभनेनें दूर लोटलें.

यावर प्रेमपूर्ण अस्पष्ट आवाजांत तो गुणगुणला कांहींतरी !

शोभनेनें काहींच उत्तर दिले नाहीं !

पुन्हां एकदां तिनें दोन्ही हात विजयाचे तोंडावर न् गालांवर फिरविले नि परत तशीच आपली मान पाण्याच्या हलत्या संचयावर टाकून ती स्वस्थ पडली !

सूर्यास्ताचें दृश्य आकाशाच्या सरसीमेवर उमटूं पहात होतें. आपली सपन्नता नि वैभव दाखविण्याकरितां आपल्या रत्नमहालांत विधात्यानें रजनीकांतास नेलें, अशा काव्यमय प्रसंगींच शोभना व विजय तलावाचे बाहर आलीं.

त्याच दिशेंत तीं थोडीं चालत गेलीं.

संमीलनाच्या उल्हासमय वातावरणांत तीं हिंडत होतीं.

रस्त्यापासून किंचित् दूर अशा एका शेताच्या बांधावर तीं बसलीं.

जरा वेळापूर्वींच खेळलेल्या प्रेमचेष्टांमुळें विश्रांतीची मार्गप्रतिक्षा करीत होतीं त्यांचीं शरीरें ! मनें मात्र त्यांच्या वाचेकरवीं आपली अंतःस्फूर्ति जास्तींत जास्त गाजवू पहात होतीं. काय बोलावे नि काय नाहीं तेंही महत्प्रयासानेंच तीं ठरवीत होतीं दोघेंही ! नाना प्रकारचे विषय, प्रसंग, गोष्टी, व्यक्ति, डोकावून जात होत्या त्यांच्या संभाषणामध्यें !

विजयाकडे तीक्ष्णपणें डोळे रोखून शोभना म्हणाली,

" विजय, माझं स्वप्न खर ठरलं बर का ? "

" कोणतं ? "

" नेरळला पडलेलं ! आपली पुन्हा भेट झाली तेव्हां सांगितलं होतं तें !

" हं ! "

" आपल्याला कधीं निघायचं इथून आतां ? "

" तू म्हणशील तेव्हां ! "

" मी वाटेल तेव्हा निघेन ! पण तुम्हीं निघायला पाहिजे ना ! "

" मलाही तिकडेच घाई नाहीं का ? एक क्षणही तुझ्या वियोगांत रहायचं म्हणजे माझी अरसिकता दाखवितो आहे मीं, असंच मला वाटतं शुभा ! ' माझ्या नेरळची मजा तुम्ही याल तेव्हां पहाल ' असें म्हणत आहेस ना तूं ? रमाकांताच्या त्या मनुष्याचा निकाल फक्त पाहायचा आहे, बाकी ते नाना असंच मला निश्चित वाटतं ! अन् मग नाना परत नेरळला येतील तेव्हांच नेरळला मी येईन ! परन्तु तत्पूर्वी या वेळीं मात्र तूं इनामगांवलाच यायचंस ! माझ्या कार्याचा गौरव तुझ्याकडून एकण्यास

मी उत्सुक आहे ! प्रेम हें केव्हांही निर्विशेष असत नाहीं ! आयुष्यांत ज्याला कांहीं कर्तव्य आचरायचं आहे, त्याचाच निर्व्याज प्रेमप्राप्तीवर विशेष हक्क असं मला वाटतं ! शारीरिक सौख्य हा प्रेमाचा आत्मा कधींच होऊं शकत नाहीं मुख्यत्वेंकरून ! तो एक अंश आहे या अत्युच्च आनंदाचा ! अन् तूं माझी प्रेमदेवता या नात्यान एकदां माझं कर्तृत्व वाखाणलंस कीं, दुप्पट जोरानें कार्य करण्यास उमेद येईल मला; तुमही सहकार्य मिळवीन अन् अशा दोघांच्या एक हृदयाच्या अन् प्रेमाच्या कार्यानें आयुष्यांत करतां येईल तेवढी देशाची सेवा करूं आपण. ”

“ मला वाटतं जावं आपण आतां ! चंद्रकोर सुद्धां उगवली ! ”

विजयानें कोटाचा खिसा चांचपला.

तो स्वस्थ कां बसला हें शोभना विचारणार होती तोंच त्यानें आपल्या उजव्या हाताची अंगुली नि तर्जनी यांमध्यें एक सोन्याची आंगठी धरीत म्हटलें, “ चंद्रकोरीहूनही सुंदर आहेस तूं शुभा ! ”

“ हें सांगण्याकरितांच आतांची स्तब्धता होती वाटतं ! मला वाटतं, पुरुषांना स्त्रियांची स्तुति करण्याची उपजत देणगी असावी ! ”

“ हं ! आणि स्त्रियांना ! ”

“ स्त्रियांना काय ? ” उजव्या बाजूलाच अंगालगद बसलेल्या विजयाकडे शोभनेनें पाहिलें.

“ ती ऐकतांच हुरळून जाण्याची ! होय ना ? ” तिचें तोंड आपल्याकडे करीत विजयानें प्रश्न केला.

त्यानें आंगठीचा हात वर केला.

“ काय आहे तें ? ”

“ आंगठी ! आपल्या पुनर्मीलनाची भेट आहे ती ! ” तिच्या हाताच्या बोटात आंगठी चढवीत तो म्हणाला.

त्या हाताच्या बोटाकडे तिनें पाहिलें. तें वर उचलून उलट सुलट फिरविलें न् मग ती म्हणाली,

“ इश्श ! पण, माझ्याजवळ कांहींच नाहीं तुम्हांला द्यायला ! ”

"नाही कसं? आहे!"

"तें काय?"

तिच्याजवळ तो सरकला.

आपल्या डाव्या हातानें तिच्या कमरेभोंवती विळखा टाकून, तिला आपल्या अंगाजवळ विजयानें ओढलें. तिचे दोन्हीं हात, एका हातांत घेऊन त्यानें तिचे स्वैर केस दुसऱ्या हातानें मागें सारले. असें करतांना तो किंचित् तिच्या बाजूला बसल्याबसल्याच वळला. आपल्या खांद्यापर्यंतच असलेल्या तिच्या मुखाकडे पहात त्यानें म्हटलें—"हें आहे तें!"

नि असे म्हणून तिच्या सम्मतीची वाटही न पहातां, एका हाताने तिच्या मस्तकास एक अल्पशी पार्श्वगामी कलाटणी देत अन् तिच्या दुसऱ्या खांद्यावरील आपल्या हाताच्या बोटांची हालचाल करीत तिच्या मस्तकाच्या एका प्रदीर्घ चुंबनांत तो गढून गेला. शोभनेनेंही मुळींच आडकाठी केली नाहीं!

तिचा ऊष्ण आणि कोमल श्वास त्याच्या गालावर हुळहुळला, गुदमरल्याप्रमाणें तिचा हुंकारही त्यानें ऐकला!

मृदु स्पर्शसुखाच्या अपूर्व आनदांत ती डुंबत होती!

वृक्ष आपलीं पर्णपुटें हालवीत होता.

वारा वांवत होता.

अन् तृणांकुर अधीरतेनें डुलत होते.

सर्वत्र सृष्टीची सौख्यमय शोभा पसरली होती!